


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

हीरक वर्ष आरंभ विशेषांक

ऑक्टोबर-नोव्हेंबर २००६

'उत्तर-नव' भारत

विकासाची विविध प्रतिमाने

# विचारशील आणि समाज परिवर्तन

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# सा अलका नगरी

'अलका' नगरीचा मार्ग एका यक्षाने
तुला सांगितला आहे.
अस्पष्ट, धूसर, धुक्याआड लपलेल्या पर्वतराजींच्या
सहसा न दिसणाऱ्या खुणांचा
हिमशिखरांचा, हिमनद्यांचा
हिमालयाच्या कोसळणाऱ्या कड्यांचा

'क्षुरस्य धारा निशिता' -
खड्गाच्या धारेवरची वाटचाल याहून बिकट
नसते.
याहून 'दुरत्यया' - ओलांडण्याला कठीण तर नसतेच
नसते.

तरी तू या प्रवासाला निघालास? का?
'अलका' नावाची एक अद्‌भुत नगरी
एका अज्ञात अद्‌भुत प्रदेशात आहे,
या एका यक्षाने दिलेल्या आश्वासनावर विसंबून?

अरे, तो यक्ष एक वेडा असेल, स्मृतिभ्रष्ट असेल,
राक्षसी वृत्तीचा परवंचक असेल
अशा शंकांचा स्पर्शही तुझ्या मनाला
कधी झाला नाही?
ही मूर्खता की वीरवृत्ती ?
मला तर काही काहीही कळत नाही.
मला कळते ते एवढेच,
की ही मूर्खता माझ्यात नाही.
(आणि का कोणास ठाऊक
माझ्या शहाणपणाची मला लाज वाटते.)
मला कळते ते इतकेच, की
मी इतका साधाभोळा नाही.
(सुरक्षित कोषात स्वतःला गुंडाळून घेणारा
एक लिबलिबित लोळागोळा आहे)

तुझ्या ज्वालेची धग मला स्पर्शही करू शकणार नाही
अशा निःशेष शून्य तपमानाच्या केंद्रबिंदूवर मी उभा आहे.
(परंतु तरीही अधूनमधून वाटते -
धग धग म्हणजे काय हे
कधीतरी कळले असते तर
बरे झाले असते)

तुझे भाग्य
तू या संदेहांच्या पार गेलेला आहेस.
पुढचे उचललेले पाऊल हे
कदाचित अखेरचेच ठरेल या भीतीने
तुझी पाऊले आजवर कधी कुठे थबकली नाहीत.
ईश्वर करो आणि अलकानगरीत
तुझी पाऊले उमटोत.
आणि समज-
'अलका' नावाची नगरीच कुठे अस्तित्वात नसली तर?
- तरीही तू काहीच हरला नाहीस
तुझी प्रवासी प्रेरणा
हेच तुझे खरे श्रेय आहे
रक्त, स्वेद, अश्रूंचे हार
तुझ्या तनूवर झळकत आहेत.
धुळीने माखलेल्या तुझ्या मुखावर
एक अनोखेच तेज विलसत आहे.
श्रेयश्रेय ते याहून दुसरे काहीही नसते.
काही विफलतातच खरे साफल्य असते.
(आम्हाला हे समजते - क्षमा कर
पण उमजत नाही)

**- देवदत्त दाभोलकर**

२०००
स्फुरण : Ithaca (एक ग्रीक कविता)
मुक्त रूपांतर
पूर्वप्रसिद्धी : साधना

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६० । अंक १-२ । ऑक्टोबर - नोव्हेंबर २००६
अश्विन-कार्तिक शके १९२८
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.






**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

---

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

---



अनुक्रमणिका








## अनुक्रमणिका


नवभारत प्रथम वर्ष-प्रथम अंक
ऑक्टोबर १९४७

मनोगत ५
❖ शंकरराव देव (संचालक)

महात्मा गांधींना अभिवादन ७
❖ वि० म० बेडेकर (संपादक)

शास्त्रीजींची पत्रे ९

नवमानवतावाद ११
❖ मे० पुं० रेगे

गांधीवाद आणि नवमानवतावाद १३
❖ मानवेंद्रनाथ रॉय
(अनुवाद : इंदुमती पारीख)

विचारवंत आणि समाज १७
❖ वसंत पळशीकर

सामाजिक प्रयोगातील सर्जकता व प्रयोगाच्या मर्यादा २६
❖ वसंत पळशीकर

समाज-कार्यकर्त्यांची भूमिका ३३
❖ देवदत्त दाभोलकर

'आणीबाणी'चा विचार करण्यासाठी आचार्य विनोबांनी बोलावलेले आचार्य संमेलन ३५
❖ यदुनाथ थत्ते
❖ देवदत्त दाभोलकर

रसेलचे आत्मचरित्र ४५
❖ देवदत्त दाभोलकर

आपले कर्तव्य ५४
❖ बर्ट्रांड रसेल

अर्थशास्त्र की अनर्थशास्त्र? : प्रस्तावना ६४
❖ जॉन रस्किन
(अनुवाद : आचार्य शं० द० जावडेकर)

तळातून नियोजन ६८
❖ अण्णासाहेब सहस्रबुद्धे

ग्रंथपरिचय
शंकरराव मोरे - एका सजग मनाची वाटचाल ७१
❖ विश्वास नाईकनवरे

डोंगरापल्याडचे डोंगर ७४
❖ सुलभा नाडकर्णी

महाराष्ट्रातील आद्य शिक्षण संस्था : पूना कॉलेज १८२१ ८१
❖ डॉ० नीळकंठ बापट

एका राजकीय कार्यकर्त्याची अस्वस्थता ८६
❖ शरद पवार

हिंदुत्ववादी आणि सामाजिक समरसता ८८
❖ देवदत्त दाभोलकर











# अतिथी संपादकीय

## देवदत्त दाभोलकर

'नवभारत' या अंकाबरोबर आपल्या हीरक वर्षात पदार्पण करीत आहे. 'नवभारत'चे वाचक, लेखक, हितचिंतक या सर्वांनाही या घटनेचा आनंदच होईल.

अनेक दृष्टींनी भारतात आजकाल नव्याने नव कालखंडाला सुरुवात झाली आहे. या कालखंडाचे परिणाम भारताच्या भविष्यकालीन घडणीवर अत्यंत दूरगामी असे होणे अटळ आहे. या एकदोन दशकांच्या कालावधीत तरी तीव्र वितंडवाद, आंधळे संघर्ष, आतंकवाद, हिंसा, धर्मांधता, क्रूरता यांनी भरलेल्या वातावरणात भारताला अंतर्गत व आंतरराष्ट्रीय स्तरावर आपली मूलभूत मानवतावादी भूमिका जतन करावयाची आहे. जोपासावयाची आहे.

एक मुक्त व्यासपीठ ही 'नवभारत'ची प्रथम अंकापासूनची भूमिका आहे. ती आजवर 'नवभारत'ने कसोशीने सांभाळली आहे. 'उत्तर-नव भारता'त 'नवभारत'ला तीच भूमिका पार पाडावयाची आहे. समविचारी लोकांचे उत्स्फूर्त सहकार्य 'नवभारत'ला यासाठी मिळत राहील असा विश्वास वाटतो.

मुक्त व्यासपीठामागे मुक्त विचार असावे लागतात व ते मोकळेपणाने निर्भयपणे मांडले जाऊ शकतील असे वातावरण अस्तित्वात असावे लागते. फ्रेंच राज्यक्रांतीचा प्रेरक विचारवंत व्होल्तेर (Voltaire) आपल्या कट्टर विरोधकाला उद्देशून म्हणाला होता, 'तू सांगतोस तो प्रत्येक शब्द मला अमान्य आहे परंतु तो सांगण्याचा तुला अधिकार नाही असे कोणी म्हणेल तर तुझ्या भाषण स्वातंत्र्यासाठी मी तुझ्या बाजूने प्राणपणाने लढेन ' (I disagree with every word that you say but I will defend to death your right to say it.) ही वृत्ती दुर्मिळ आहे, आणि तुम्ही जर आमच्या बरोबर नसाल तर तुम्ही आमच्या विरोधात आहात असेच आम्ही समजू असे जनमानस असण्याच्या कालखंडात ही भूमिका घेण्यासाठी लागणारे धैर्य तर याहून दुर्मिळ आहे.

'नवभारत'च्या आजवरच्या संपादकांच्या विचारांचा आलेख गेल्या काही अंकातील लेखातून आलेला आहे. या अंकातही त्याचे काही आरेखन आहे. विचारशीलांची भूमिका हा आजवर जगातील अनेक क्रांति-परिवर्तनात क्रांतीचा कणा राहिलेला आहे. भारतात आज व उद्या हा काळीचा प्रश्न राहणार आहे. तांत्रिक रचना कितीही कसोशीने केली तरी प्रेरक ऊर्जेचाच जर अभाव असेल तर ती रचना काय करू शकेल?

या समस्येच्या काही अंगांना या अंकात स्पर्श केलेला वाचकांना आढळेल. अनेकांना अनेक विचारांचे पैलू व कृतीच्या शक्यता लक्षात आणून देता येईल. या प्रक्रियेला गती मिळावी म्हणून हा अंक 'विचारशीलां'चे कर्तव्य या विषयावर केंद्रित केला आहे. हे विचारमंथन व्यावहारिक दृष्टीने कसे करता येईल या विषयीही काही कल्पना या अंकात अन्यत्र आहे.

आजवरच्या अंकांना आलेला या पद्धतीचा कृतिशील प्रतिसादही मनाला काही समाधान देणारा आहे. असो, पाहू या.

रसेलने एके ठिकाणी लिहिले आहे : 'Beyond all reason I firmly believe that humanity will survive.'

'माझी बुद्धी मला काही वेगळं सांगते, परंतु मानवजातीचा संपूर्ण नाश कधीच होणार नाही अशी माझी श्रद्धा आहे.'

अग्रगण्य बुद्धिप्रामाण्यवादी रसेलची ही श्रद्धा आपणा सर्वांनाच दिलासा देणारी आहे.

**- देवदत्त दाभोलकर**










# चर्चासत्रांविषयी

## 'उत्तर-नव' भारत
## विकासाची विविध प्रतिमाने

संयोजक : नवभारत मासिक, प्राज्ञपाठशाळा, वाई
अलदा निकेतन, सातारा (अलदा : अच्युत लक्ष्मण दाभोलकर, १८९३-१९५५)
(या खेरीज अन्य कोणा व्यक्तीचे, संघटनेचे उत्स्फूर्त सहकार्य आल्यास त्याचाही साभार स्वीकार करण्यात येईल.)

१. आधी केलेल्या प्रकटनाप्रमाणे दि० २०,२१ ऑगस्ट रोजी 'श्रीदा प्रयोग परिवार : दहा गुंठे प्रयोग' यावरील चर्चासत्र सातारा येथे उत्तम रीतीने संपन्न झाले. ज्यांना तपशील हवा असेल त्यांनी प्रा० देवदत्त दाभोलकर यांच्याशी संपर्क साधावा.

२. पूर्वीच्या प्रकटनाप्रमाणे 'गांधीजी - विनोबा विचारधारा व आजचे संदर्भ' या विषयावरील चर्चासत्र दि० २९, ३० सप्टेंबर रोजी वाई येथे संपन्न झाले.

३. 'आपण (प्रथमपुरुषी एकवचनी) आणि नवभारताची जडणघडण' या संदर्भात विविध विषयांचा आढावा घेणारे कृति-चर्चासत्र पूर्वी प्रकट केल्याप्रमाणे १ व २ ऑक्टोबर रोजी सातारा येथे होईल.

४. 'श्रद्धा-विवेक आणि समाज' या विषयावरील चर्चासत्र वाई येथे दिनांक २८ डिसेंबर रोजी होईल. डॉ० सुनीती देव, नागपूर या त्यात सहभागी होतील.

५. या अंकातील 'विचारशील आणि समाजपरिवर्तन' या विषयावरील कृति-चर्चासत्र 'सातारा' येथे दि. ३० जानेवारी २००७ रोजी सकाळी ११.०० ते सायंकाळी ५.३० या वेळात होईल.

कोणत्याही चर्चासत्रात सहभागी होऊ इच्छिणाऱ्यांनी आधी शंभर रुपयांची मनिऑर्डर सचिव, प्राज्ञपाठशाळा यांच्याकडे केल्यास त्यांना चर्चासत्रविषयक टिपणे पाठविली जातील.

संपर्कासाठी पत्ते -

**प्रा. देवदत्त दाभोलकर**
**निवास :** शांतिनिकेतन
४३, गुरुकृपा हौ. सो.
शाहूनगर, सातारा ४१५००१
दूरध्वनी : (०२१६२) २२०३७८
E-mail : ndabholkar@rediffmail.com

**प्रा. यशवंत कळमकर**
**निवास :** २४१०-क, सोनगीरवाडी,
दूरध्वनी कॉलनी रस्ता, वाई ४१२८०३
दूरध्वनी : (०२१६७) २२२७०४
**कार्यालय :** सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई
दूरध्वनी : (०२१६७) २२०००६



अनुक्रमणिका

('नवभारत' प्रथम वर्ष प्रथम अंकातून, ऑक्टोबर १९४७)

# मनोगत

शंकरराव देव
संचालक 'नवभारत'

कल्पनासृष्टीतील वस्तू व्यावहारिक सृष्टीत उतरलेल्या पाहून माझ्या मनाला अतिशय आनंद होत आहे. मला अशी खात्री आहे की, 'नवभारत' जेथे जाईल तेथे सात्विक सुखाची व शांतीची दिवाळी उजाडेल. 'बहुजनहिताय बहुजनसुखाय' अशा जीवनात जे सत्य, शिव, सुंदर आहे, त्याला प्रकाशित व प्रगट करून त्याचा साक्षात्कार करून घेण्याला महाराष्ट्रातील स्त्री-पुरुषांना मदत करणे हे 'नवभारता'चे कार्य आहे. या महान् व मंगल कार्यात 'नवभारता'ला अनुभवी विद्वानांशी आपले सहाय्य व सहकार्य द्यावे अशी मी या कार्याला आरंभ करीत असताना त्यांना श्रद्धापूर्वक विनंती करतो.

मानव पशुत्व व देवत्व यांच्या सीमेवर उभा आहे. त्यांच्यात जे पशुत्व आहे, त्यांची जीवनाच्या वेदीवर आहुती देऊन संपूर्ण अमरत्वाची प्राप्ती करून घेणे मानवाचे अंतिम ध्येय आहे. 'न धनेन न प्रजया त्यागेनैके अमृतत्वमानशु:।' 'धनप्राप्तीने अगर पुत्रप्राप्तीने नव्हे तर केवळ त्यागाने अमरत्वाची प्राप्ती होते' असा उपनिषत्कालीन ऋषींचा सानुभव सिद्धांत आहे. व्यक्तींचा विकास व समाजाची धारणा यांचा समन्वय संयमधर्मातच होऊ शकतो. व्यक्ती व समष्टी यांचा संबंध काय? व्यक्तीला स्वातंत्र्य आहे काय? असले तर त्याची मर्यादा कोणती? समष्टीसाठी व्यक्तीने आपले स्वातंत्र्य व आपले सुख यांचा होम करावा काय? हे एकप्रकारे शाश्वत प्रश्न आहेत व त्यांची उत्तरे शोधून काढण्यात सर्व शहाण्यांची बुद्धी सदा लागलेली आहे.

जसजशी जिवाची कर्मशक्ती अधिकाधिक प्रकट व फलदायी होत जाते, तसतसा तो जीव अधिक सुखी होत जातो. ह्या कर्मशक्तीचा प्रवाह व व्यापार संयमित करून त्याचा शिवाशी संयोग करण्याची शक्ती ज्यामुळे माणसात येते, ते शिक्षण. जेव्हा व्यक्ती समष्टीसाठी सर्व सुखेच्छेचा त्याग करण्यास समर्थ होते तेव्हा ती बुद्ध होते व तेव्हाच ती खरी स्वतंत्र होते. 'सा विद्या या विमुक्तये.' मात्र हा त्याग वा संन्यास सक्तीचा असता कामा नये. सक्तीने जो संन्यासी असतो तो मनाने भोगी व मिथ्याचारी असतो. आत्मस्वरूपाच्या सत्यज्ञानांतून जो संयम स्फुरतो तोच जिवाची व शिवाची भेट घडवितो. संयमित भोगाने मिळणाऱ्या इंद्रियांच्या समाधानातूनच शनैः शनैः वैराग्य प्रकट होते आणि या वैराग्यातूनच जीव-शिवाच्या एकत्वाचे दर्शन होऊन समष्टीच्या कल्याणासाठी कर्मव्यापार करण्याची अनासक्त वृत्ती उदय पावते.

व्यक्तीचा विकास, समाजाची धारणा व उत्कर्ष ह्यांचा समन्वय घालून जीवनातील जे सत्य, शिव व सुंदर त्यांचा साक्षात्कार करून घेण्याचा मार्ग कोणता, ते दाखविण्याचा यथामति, यथाशक्ती प्रयत्न करणे हे 'नवभारता'चे नियोजित कार्य आहे. 'नवभारत' हे पवित्र कार्य 'सर्वेषां अविरोधेन' करीत राहील. सर्व सत्पुरुषांच्या शुभाशिर्वादाची कामना आहे. कर्मयज्ञ होईल तर तो मिळेल अशी श्रद्धा आहे.

'सत्यसंकल्पाचा दाता भगवान्'

### महाराष्ट्रीय विचारवंतांपुढील समस्या

समाजाचा विकास त्याच्या संस्कृतीत प्रतिबिंबित झालेला असतो. मनुष्यमात्राच्या अंतःकरणात सत्य, सौंदर्य, साधुत्व या मूल्यांच्या अंतिम प्रेरणा सतत उसळत असतात. त्यांमधून संस्कृतीचे स्वरूपही विकसित होत जाते. या सांस्कृतिक मूल्यांचा वाढता पगडा सामाजिक जीवनाच्या सर्व क्षेत्रांत अधिकाधिक कसा पडत डाईल हे पाहण्याचे काम सर्व समाजसेवकांना सतत करीत रहावे लागते. सामाजिक जीवन कितीही गुंतागुंतीचे असले तरी त्यामध्ये एकजीवपणा असतो. ह्या एकजीवितेची सतत वाढ करीत गेल्याने सामाजिक जीवनाला समृद्धी लाभते. संस्कृतीला हळूहळू उमलत जाणाऱ्या सहस्रदल कमलाची उपमा देता येईल. समाज-जीवनाच्या वाढत्या विकासाचे हे स्वरूप ध्यानी घेऊन समाजातील सर्व प्रेरणांचा आणि सर्व चळवळींचा शक्य तेवढा समन्वय

अनुक्रमणिका








करीत राहिले पाहिजे. महाराष्ट्रात अनेक प्रकारच्या चळवळी चालत असतात. अनेक बुद्धिमंत अनेक विषयांवर चिंतन करीत असतात. शास्त्र, कला, धर्म, राजकारण, शिक्षण आणि व्यापार इत्यादि विविध क्षेत्रांत विविध प्रकारची शक्ती खर्च होत असते. या सर्व प्रवृत्तींचा एक व्यापक भूमिकेवरून समन्वय करता आला तर महाराष्ट्राचे सांस्कृतिक सामर्थ्य अधिक वाढेल. निष्कारण विरोधामुळे वाया जाणारी शक्ती वाचविता येईल आणि मतभेद राखूनही सामाजिक सुधारणेच्या कामात सहकार्य वाढवता येईल. महाराष्ट्राचे भौतिक दारिद्र्य आणि सामाजिक विषमता यामुळे महाराष्ट्रातील सामाजिक शक्ती वाढणे शक्य नाही. यासाठी महाराष्ट्रातील सर्व विचारवंतांनी एकत्र येण्याची आवश्यकता आहे. महाराष्ट्राचे सारे सत्पुत्र संस्कृतीचे उपासक म्हणून एकत्र येऊ शकतील असा आमचा विश्वास आहे.

पाश्चात्त्य आक्रमणामुळे सर्वस्वी गुलामगिरीत पडलेल्या हिंदुस्थानची परतंत्रता जाऊन त्याला आर्थिक स्वातंत्र्य प्राप्त झालेले आहे. पाश्चात्त्य संस्कृती आपल्या अंतर्विरोधामुळे जगाच्या सांस्कृतिक मूल्यांत भर टाकील किंवा सामान्य जनांना शांती व सुख देईल ही आशा फोल ठरू पाहत आहे. आशियातील मागासलेल्या राष्ट्रांना पुन्हा वैभवाची स्थिती प्राप्त होणार अशी चिन्हे दिसत आहेत. नवे जग, नवा मानव आणि नवीन संस्कृती निर्माण करण्याची भाषा सर्व जगभर सुरू झालेली आहे. लोभी व्यापारी आणि ढोंगी मुत्सद्दी यांच्या सर्वस्वी आहारी गेलेल्या इंग्लंड अमेरिकेच्या हातून किंबहुना केवळ एकट्या रशियाच्या हातूनही या नव्या जगाची, नव्या मानवाची आणि नव्या संस्कृतीची निर्मिती होऊ शकेल असे आम्हाला वाटत नाही. ही नवी संस्कृती हिंदुस्थानातच निर्माण होऊ शकेल अशी आम्हाला दृढ आशा वाटते. नवी संस्कृती राजकीय स्वातंत्र्य, आर्थिक समता, सामाजिक बंधुता या अध्यात्मिक मूल्यांतून निर्माण होणार आहे. या मूल्यांचा व्यावहारिक आविष्कार यशस्वी रीतीने कसा करता येईल हीच येथल्या विचारवंतांपुढील समस्या आहे. जागृत झालेल्या हिंदुस्थानात महाराष्ट्राने आपले योग्य स्थान मिळवावे अशी आमची उत्कट इच्छा आहे. महाराष्ट्राचा प्राचीन इतिहास जितका उज्ज्वल आहे तितकाच त्याचा भावीकालही उज्ज्वल व्हावा अशी आपण दक्षता बाळगली पाहिजे. यासाठी आपल्या परंपरेतील तेजस्वी तत्त्वाच्या आश्रयाने आधुनिक काळाच्या गरजा आणि उच्चतर संस्कृतीची हाक यांचा विचार करून पुढचा रस्ता सुधारला पाहिजे. या भावी संस्कृतीच्या निर्मितीसाठी नानाविध भौतिकशास्त्रांचे ज्ञान, आर्थिक संघटनांची विद्या आणि लोकशाहीचे तंत्र आपणास हस्तगत करावे लागेल. महात्मा गांधींचा सत्याग्रह, मार्क्सचा समाजवाद आणि युरोपांतील बुद्धिवाद, तसेच व्यक्तिस्वातंत्र्य, लोकशाही इत्यादी तत्त्वे या सर्वांचा महाराष्ट्रीय विचारवंतांनी ऊहापोह केला पाहिजे. मात्र या तत्त्वांना तेथे जडलेली विकृती नष्ट करून त्यांच्या मूलभूत स्वरूपातही ती महाराष्ट्रात पेरली जातील व शुद्ध स्वरूपात विकास पावतील असा प्रयत्न झाला पाहिजे. आणि महाराष्ट्राच्या संस्कृति-विषयक विचारांत योग्य दिसेल ती भर घातली पाहिजे. या विचारांनी प्रेरित होऊन आम्ही या मासिकाच्या प्रकाशनाला प्रारंभ करीत आहोत. विशिष्ट सांप्रदायिक दृष्टी न ठेवता सांस्कृतिक उपासनेची व्यापक दृष्टी राखण्याचा आम्ही निर्धार केला आहे. या कार्यात महाराष्ट्रातील सर्व विचारवंतांचे सहाय्य मिळेल अशी आम्हास आशा आहे.

### नवभारतची भूमिका

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतूपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संग्रहित केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

ह्या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा ग्रंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि










प्रत्येकाचे व्यक्ती-वैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टिनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

चालू विषयासंबंधी जे विचार प्रसिद्ध होतील, त्यांवर जेव्हा सही नसेल तेव्हा कार्यकारी संपादकाचे वैयक्तिक मत ते विचार प्रकट करितात असे मानले जाईल.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.



प्रथम वर्ष - प्रथम अंक

## संपादकीय

## महात्मा गांधींना अभिवादन

वि० म० बेडेकर

या ऑक्टोबर २ रोजी महात्मा गांधींना ७८ वर्षे पुरी होत असून ते ७९ व्या वर्षात पदार्पण करीत आहेत. या त्यांच्या वाढदिवशी प्रत्येक हिंदवासीयाचे अंतःकरण त्यांच्याविषयीच्या शुभेच्छेने उचंबळून आल्याशिवाय राहणार नाही. ऑगस्ट १५ ला हिंदुस्थान स्वतंत्र झाला. त्या दिवशी हिंदी संघराज्याच्या घटनासमितीत व बाहेर वृत्तपत्रातून आणि व्यासपीठावरून सर्वत्र एकमुखाने महात्मा गांधींचा 'हिंदी स्वातंत्र्याचे विधाते वा जनक (The Architect or Father of Indian freedom)' म्हणून जो अंतःकरणापासून गौरव झाला, त्याची आपली आठवण अजूनही अगदी ताजी आहे. भारताच्या स्वातंत्र्यप्राप्तीची घटना हिला जगात तोड नाही, असे तज्ज्ञांकडूनही म्हटले जाते. चाळीस कोटी लोकांना इतके शांततामय व सदिच्छापूरक सत्तासंक्रमण ही गोष्ट जगाच्या इतिहासात अभूतपूर्व अशी आहे. या घटनेला जागतिक परिस्थिती, ग्रेट ब्रिटनची सध्याची स्थिती व त्या स्थितीतही दिसून येणारा ब्रिटिशांचा सूज्ञपणा ही जशी कारणे आहेत त्याचबरोबर हिंदुस्थानने प्रचंड प्रमाणावर आचरून दाखविलेला अनत्याचारी शांततामय प्रतिकार हेही एक प्रभावी कारण होय, हे कोणालाही कबूल करावे लागेल. या अनत्याचारी प्रतिकाराची प्रेरणा, योजना व यशस्वी आचार प्रामुख्याने गांधीजींनी करून दाखविला आहे. यांतच त्यांची असामान्य थोरवी आहे.

हिंदी स्वातंत्र्यप्राप्तीमुळे महात्मा गांधींचे एक जीवनकार्य सफल झाले असूनही आज दुर्दैवाची गोष्ट अशी की, त्यांना व हिंदी जनतेला या साफल्याचा आनंद अनुभवायला मिळत नाही. गांधीजी स्वतः दुर्दम्य आशावादी आहेत, तरी त्यांच्याही जीवनात या वैफल्याची कटु जाणीव उत्पन्न होणे अस्वाभाविक नाही. परकीय सत्तेने आपल्या स्वार्थाकरिता उठविलेले धर्मांधतेचे, जात्यंधतेचे, यादवीचे भूत आज भारताच्या मानगुटीवर बसले असून आज भारतीयांचे डोके ठिकाणावर नाही. मुस्लीम लीगने केलेला धर्मांध प्रचार, त्यामुळे ऑगस्ट १९४६ पासून माथेफिरूंनी माजविलेले अत्याचार, त्याचा इतर माथेफिरूंनी घेतलेला सूड, त्यांच्या पुन्हा क्रिया-प्रतिक्रिया, या घटनांनी देशातील वातावरण बिघडून गेले आहे. अशांततेने, धर्मांधतेने गजबजलेल्या वातावरणात महात्मा गांधींची माणुसकीची 'पुकार' ऐकू येईनाशी झाली आहे. मध्ययुगीन अमानुषतेची आठवण करून देणारी धर्मांधता थैमान घालीत आहे. पंजाबमध्ये झालेल्या घटनांनी मानवी मनावर इतका ताण पडला आहे की विचारी व सुसंस्कृत म्हणविणाऱ्यांचाही धीर सुटू लागला आहे.

अशा परिस्थितीत गांधीजींना आपल्या जीवन-दर्शनाच्या व जीवनकार्याच्या कसोटीची वेळ आली आहे, असे वाटत असल्यास नवल नाही. हिंदु-मुस्लीम ऐक्यासाठी, शांती प्रस्थापित करण्यासाठी ते आज आपली तपस्या व आपले प्राणही पणास लावावयास तयार झाले आहेत. हा सर्वत्र पेटलेला वणवा आपल्या अहिंसेच्या शान्त्युदकाने शमवावयास उद्युक्त झालेला हा एकाकी महात्मा सकृद्दर्शनी अव्यवहारी, स्वप्नाळू वाटत असल्यास नवल नाही. गांधीजींच्या जीवनात असे अव्यवहारित्व एकाकित्व अनेक वेळा जगाच्या निदर्शनास आले आहे. यासंबंधी जगद्विख्यात शास्त्रज्ञ आइनस्टाइन यांनी १९४४ साली गांधीजींच्या ७५ व्या वाढदिवसाच्या निमित्ताने गांधीजींच्या जीवन-कार्याविषयी जे अत्यंत मार्मिक उद्गार काढले आहेत त्यांची आठवण होते. आइनस्टाइन गांधीजींविषयी म्हणतात -

अनुक्रमणिका






'A man who has confronted the brutality of Europe with the dignity of simple human being and thus at all times risen superior. Generations to come, it may be, will scrace believe that such a one as this even in flesh and blood walked upon this earth.' 'युरोपच्या संघटित पाशवी वृत्तीविरुद्ध ज्याने साध्या माणुसकीच्या प्रभावाच्या बळावर सामना देऊन आपली उच्च भूमिका सदैव कायम राखली आहे, असा हा मनुष्य! काय सांगावे भावी पिढ्या कदाचित् विश्वासही ठेवणार नाहीत की असा मनुष्य - खरोखरी हाडामासाचा मनुष्य - पृथ्वीतलावर होऊन गेला म्हणून.' हल्लीच्या काळी संस्कृतीची मानवी मूल्ये कशी उफराटी झाली आहेत व माणुसकीचा कसा अधःपात झाला आहे ही हृदयविदारक गोष्ट आइनस्टाइनने किती मार्मिकपणे सुचविली आहे?

आणि गांधीजींच्या असामान्यत्वाचे रहस्य त्यांच्या सकृद्दर्शनी वाटणाऱ्या या अव्यवहारित्वात, 'एकलेपणात' साठविलेले आहे. या 'अमानुष' काळात पुन्हा माणसकी प्रस्थापित करून तिचा उत्कर्ष करणे हे त्यांचे जीवितकार्य आहे. याच उच्च नैतिक भूमिकेवरून त्यांनी परकीयांशी देशाच्या स्वातंत्र्याचा यशस्वी लढा आतापर्यंत चालविला होता. याच भूमिकेवरून आज ते स्वकीयांच्या अमानुष प्रवृत्तींना धीरगंभीरपणे तोंड देत आहेत. आणि या लढ्यात ते यशस्वी होतील याची चिन्हे स्पष्ट दिसू लागली आहेत. कलकत्ता व बंगालमध्ये प्रस्थापित झालेली शांती अत्यंत आशादायक आहे. पश्चिम बंगालमध्ये 'चक्रवर्ती' राजगोपालाचार्य यांनी म्हटल्या-प्रमाणे जो भडका पंजाबमध्ये सरकारचे मोठे सरहद्द-सैन्यदलही लवकर शमवू शकले नाही, तो भडका बंगालमध्ये गांधीजींसारख्या एकट्या शांतिसैनिकाच्या (one man - boundary - force) च्या किमयेने शांत झाला आहे.'

गांधीजींचा आशावाद दुर्दम्य आहे. केवळ हिंदुस्थानातच काय सर्व जगात शांती प्रस्थापित करणे हे त्यांच्या जीविताचे ध्येय आहे. ते ध्येय साध्य करण्याकरिता आपण १२५ वर्षे जगावे अशी त्यांची इच्छा आहे. हिंदुस्थानचे स्वातंत्र्य संपादन हा त्यांच्या जीवितकार्याचा एक टप्पा संपला आहे. पुढील टप्पे साध्य करण्याकरिता गांधीजींना परमेश्वराने निदान १२५ वर्षे आयुरारोग्य द्यावे अशी प्रार्थना करणे प्रत्येक हिंदवासियाचे कर्तव्य आहे.



## हीरक वर्ष
## 'उत्तर-नव भारत' सहचिंतनासाठी

'उत्तर-नव' भारताच्या घडणीत 'नवभारत' ला रस आहे. आणि आपल्या हीरक वर्षात (ऑक्टोबर ०६ ते सप्टेंबर ०७) 'नवभारत' या दृष्टीने काही प्रयत्न प्रयोगही करू इच्छितो : त्याच्या तपशीलाच्या चर्चेसाठी सर्वांचे स्वागत आहे. परंतु प्रारंभिक म्हणून खालील गोष्टी केल्या जातील.

आपण असे काही लेखन केले आहे असे कोणाला वाटत असल्यास त्याने महाराष्ट्रातील विविध विचार सरणींच्या समकक्ष लोकांशी संपर्क साधून वाद-विवेचनासाठी त्यांच्या सविस्तर प्रतिक्रिया मिळवाव्यात. त्या सर्व नवभारत एकत्रित करील. या एकूण प्रक्रियेसाठी कूरिअर आदि काही खर्चाची आवश्यकता असेल तर ती तरतूदही या वर्षापुरती करण्यात आलेली आहे. यासाठी 'नवभारत'वर काही ताण पडल्यासही आनंदच आहे.

जिज्ञासूंनी माझ्याशी थेट संपर्क साधावा. आपला संपूर्ण पोस्टाचा पत्ता व दूरध्वनी संपर्क क्रमांक कळवावा. याविषयीचे आपले चर्चाप्रवर्तक सविस्तर टिपण माझ्या कडे पाठवावे. पंधरा दिवसांच्या आत याविषयीचा निर्णय त्यांना कळविण्यात येईल.

लेख सुवाच्य हस्ताक्षरात असावा. स्थळप्रत आपल्याकडे ठेवावी.

- देवदत्त दाभोलकर

# शास्त्रीजींची पत्रे

**श्री. पन्नालाल सुराणा यांना लिहिलेले पत्र**

आज वृत्तपत्रात वाचले की, तुम्ही जनता पक्षाचा एक क्रांतिकारक कार्यक्रम आखून अमलात आणू इच्छित आहात. फारच चांगली कल्पना. या कार्यक्रमाच्या संदर्भात मला असे म्हणायचे आहे :

१. प्रथम हाती आले ते चांगले पक्के करावे. ज्या सागरपट्टीच्या जिल्ह्यामध्ये वा अन्यत्र जनता पक्ष विजयी झाला ते जिल्हे अधिक जागृत, मजबूत करावे. ग्रामपंचायती, पंचायत समिती, जिल्हा परिषदा यांना आर्थिक, सांस्कृतिक व राजकीय कार्यक्रम देऊन तेथील स्थानिक कार्यकर्त्यांना वैचारिक क्रांतीचे शिक्षण देणे आवश्यक आहे.

२. कोणताही कार्यक्रम सर्वेक्षण तपशीलवार करून त्यांच्या आधारावर रचावा.

३. घेराव, बंद, संप, सत्याग्रह इत्यादी उपाय हे निरुपाय होईल म्हणजे उघड मोठे अन्याय दिसतील तेथेच योजणे योग्य.

४. विधानसभा व विधान परिषद येथे सहकार्य व विरोध या दोन्ही प्रवृत्तींचा समतोल राखणे आवश्यक गदारोळ शक्यतो टाळणे दूरदर्शीपणाचे लक्षण ठरेल.

५. सत्तेवर असणाऱ्या पक्षापेक्षा विरोधी पक्षात राहणारे निकोप लोकशाही प्रवृत्ती अधिक चांगल्या रीतीने रुजवू शकतात; लोकशाही प्रथा निर्माण करू शकतात.

६. केंद्रीय जनता पक्षाच्या नव्या व्यापक धोरणांमध्ये फार मौलिक तत्त्वे गृहीत धरलेली आहेत. त्यांना अनुसरूनच कार्यक्रम असावा. कुंतीचे महाभारतातील एक वचन महात्मा गांधींच्या प्रार्थनेमध्ये म्हणत असत.

विपदो नैव विपदः संपदो नैव संपदः।
विपद्विस्मरणं विष्णोः संपन्नारायणस्मृतिः।।

आपत्ती आपत्ती नव्हेत व संपत्ती - म्ह. यश, समृद्धी - समृद्धी नव्हेत, विष्णूचे विस्मरण विपत्ती व विष्णूचे स्मरण संपत्ती होय.

या ठिकाणी विष्णूच्या ठिकाणी 'उच्च ध्येय' वा 'क्रांतीचा मार्ग' असा अर्थ घ्यावा.

७. श्री जयप्रकाश नारायणांच्या समग्र क्रांतीचा ध्यास घेण्यानेच यशाचा मार्ग मिळू शकेल.

८. लेनिन म्हणतो - ''क्रांती ही मागणी नोंदून घडत नसते.'' तिची तिथी अगोदर ठरत नसते हे ध्यानात असेलच.



**श्री. रत्नाकर गणवीर ह्यांना शास्त्रीजींनी दिलेले उत्तर**

डॉ. बाबासाहेबांनी मनुस्मृती जाळल्यावर मी त्यांना मुंबईस भेटलो. त्यांना म्हटले की, मनुस्मृती आपण जाळली तेथील रक्षा मी बरोबर आणली आहे. ती आपल्या व माझ्या कपाळास मी लावतो. बाबासाहेबांनी म्हटले की, जरूर लावा. मी रक्षा लावल्यावर त्यांनी विचारले की, मनुस्मृतीबद्दल तुमचे काय मत आहे? त्यावर मी सविस्तरपणे बोललो. मी म्हटले की, ''मनुस्मृती हा ग्रंथ प्राचीन भारतीय समाजाच्या सामाजिक व धार्मिक जीवनाचा आदर्श दाखवितो. ती समाजरचना विषमतेच्या व पिळवणुकीच्या तत्त्वावर आधारलेली होती म्हणून समतेचे नैतिक उच्च मूल्य ध्यानात धरून आज जी भारतीय समाजाची रचना करावयाची आहे त्यास मनुस्मृतीचा विरोध आहे. म्हणून मनुस्मृती जाळणे हे लाक्षणिक अर्थाने योग्य आहे. परंतु भारतीय प्राचीन समाजाच्या धार्मिक, सामाजिक, आर्थिक जीवनाचा इतिहास समजण्याचे ते एक उत्कृष्ट साधन आहे. म्हणून त्याची उपयुक्तता कायम मानली पाहिजे.'' या माझ्या म्हणण्यावर बाबासाहेब म्हणाले की, ''या बाबतीत तुमच्यामध्ये व माझ्यामध्ये मतभेद असण्याचे कारण नाही, परंतु माझ्या विद्यालयीन शिक्षणात संस्कृत हा विषय नव्हता. त्यामुळे मी इंग्लीशमधील विद्वानांनी लिहिलेली धर्मग्रंथाची भाषांतरे व विवरणे वाचतो. मनुस्मृती मला मुळातून वाचता आली असती तर बरे झाले असते.''

त्यावर मी म्हटले की, "मनुस्मृतीत न जळणारी अशी काही तत्त्वे आहेतच. इतिहासामध्ये जुन्या जगातील पुष्कळ बाद करण्यासारखे भाग असतात. परंतु काही अबाधित असेही राहते." यावर बाबासाहेब म्हणाले की, "मी मनुस्मृती वाचलेली असली तरी अशा अबाधित विचारांकडे लक्ष गेले नाही." त्यावर त्यांना मी मनुस्मृतीतील सुखदुःखांची व्याख्या सांगणारा श्लोक म्हणून दाखविला. त्यांना तो एकदम आवडला. नंतर मी मनुस्मृतीतील अंतर्विरोध दाखवून दिले. ही चर्चा पुष्कळ वेळ चालली व चहा घेऊन मी परतलो.



**श्री. यशवंतराव चव्हाण ह्यांना लिहिलेले पत्र**

मी गेल्या ३० जुलैला जर्मनीहून भारतात परतलो. वाईस आल्यावर आपले पत्र पाहिले. त्याची प्रत मला जर्मनीतच मिळाली होती. आमदार श्री. पी. बी. साळुंखे यांनी 'जोतिनिबंध' पुन्हा मुद्रित करण्यास माझी संमती आहे व तसे मी श्री. साळुंखे यांना कळवीत आहे.

१. आपला इंदिरा काँग्रेस प्रवेश लांबलेला दिसतो. आपल्या प्रवेशाच्या संकल्पावरच्या प्रतिकूल प्रतिक्रिया मी येथून जर्मनीस जाण्यापूर्वीच सुरू झाल्या होत्या, आता हा प्रवेश लांबल्याबद्दल म्हणजे प्रवेश न मिळाल्याबद्दल अनेकांचे मत अधिक प्रतिकूल झाले आहे. जे अनुकूल होते तेही विषण्ण झाले आहेत. अनेक महत्त्वाच्या व्यक्ती खाजगी रीतीने माझ्यावरही फार जोराची टीका करीत आहेत. मी फार चुकीचा सल्ला देऊन प्रमाद केला आहे असेही म्हणतात. अनेक मित्रांना असे वाटते की, महाराष्ट्राला एक फार चांगला समंजस, धोरणी, चिंतनशील, विवेकी, राजकारणी, मुत्सद्दी यशवंतरावांच्या रूपात योगायोगाने लाभला होता; परंतु या नव्या इंदिरा काँग्रेस प्रवेशाच्या संकल्पामुळे आणि विशेषतः इंदिराजींनी प्रवेश न देता अपमानित केल्यामुळे या महाराष्ट्राच्या सुपुत्राचे महान यश कलंकित झाले आहे.

२. यश आणि अपयश, मान आणि अपमान या द्वंद्वांना विशेष महत्त्व नाही. त्यांना महत्त्व आहे ते केवळ आपल्या स्वतःच्या आचरणाचे व कृतीचे मूल्यमापन करण्याकरिता. हा दृष्टिकोण मला भगवद्‌गीतेपासून मिळाला आहे. कारण भगवद्‌गीता ही राजनीती शास्त्रातून निघालेली परमार्थ नीती होय. राजनीती शास्त्राचे अधिष्ठान असलेली परमार्थ नीती त्यात सांगितली आहे. ख्रिस्ताने म्हटले आहे, "दार ठोठवा म्हणजे उघडेल." यावर माझे म्हणणे असे की, "दारापर्यंत जावे, दार ठोठवावे. नाही उघडले तर उघड्यावर बसावे." महाराष्ट्राची हवा समशीतोष्ण असल्यामुळे उघड्यावर बसले तरी हरकत नाही.

३. राजकारणाच्या दृष्टीने पाहिले असता असे दिसते की, भारतीय लोकशाहीने आतापर्यंत बेबंदशाही किंवा हुकुमशाही किंवा अधिकारशाही टाळली आहे आणि याचे श्रेय गेल्या दीडशे वर्षांच्या भारतीयांच्या राजकीय इतिहासाला आहे. दादाभाईंपासून नेहरूंपर्यंतच्या नेतृत्वामध्ये लोकशाही जीवनमूल्यांचे संदेश प्रकट झाले आहेत. इंदिराजीदेखील या परंपरेशी निष्ठेने वागण्याचा प्रयत्न करीत आहेत. परंतु परिस्थितीच्या शक्ती इतक्या विलक्षण व जबरदस्त आहेत की, त्यामुळे ही महान लोकशाही टिकवून धरणे हे त्यांना दिवसेंदिवस अधिकाधिक कठीण होणार आहे. अधिकारशाही, हुकुमशाही किंवा लष्करशाही हे भारताचे दुर्दैवच ठरेल. हे दुर्दैव टाळता येण्याची शक्ती भारतीय माणसाला आहे की नाही याची अग्निपरीक्षा होण्याची वेळ येऊनच ठेपली आहे.

४. आजच्यासारख्या परिस्थितीत आपल्यासारख्या अनुभवी, मुरब्बी व्यक्तीचे सहकार्य हे फार मोलाचे ठरेल याची इंदिराजींना जाणीव असावयास पाहिजे. तशी ती जाणीव आहे की नाही हे नजीकचा कालच ठरवील. तरुणांना संधी द्यावी, हेही योग्य होय. परंतु 'तारुण्य' हे शहाणपणाचे मूल्यमापक नव्हे. तरुणाला संधी देताना फार काळजी घ्यावी लागेल. ज्ञानवृद्धत्व हेच खरे शहाणपणाचे मूल्यमापक ठरते. ज्ञान म्हणजे अनुभवजन्य प्रज्ञा.

(नवभारत जानेवारी-फेब्रुवारी-मार्च १९९६ मधून सामार.)



**याः तेषाम् स्वैराः कथाः**
**तानि एक शास्त्राणि ।**



अनुक्रमणिका

# नवमानवतावाद

नैतिक आणि सांस्कृतिक मूल्यांवर आधारलेली समाजव्यवस्था घडविण्यासाठी संसदीय लोकशाहीचे तत्त्वज्ञान आणि मार्क्सच्या अनुयायांनी त्याच्या विचारांपासून विकसित केलेले अधिकृत म्हणून मांडलेले तत्त्वज्ञान या दोहोंकडून एका वेगळ्या सामाजिक आणि राजकीय तत्त्वज्ञानाची आवश्यकता होती. मानवी प्रकृतीची घडण, तिच्यात समाविष्ट असलेल्या मूलगामी शक्ती आणि प्रेरणा व मानवाची समग्र परिस्थिती ह्यांच्या सम्यक आकलनावर हे तत्त्वज्ञान आधारलेले असले पाहिजे. 'नवमानवतावाद' ह्या नावाने रॉय ह्यांनी डिसेंबर १९४६ मध्ये हे तत्त्वज्ञान सुप्रसिद्ध बावीस सूत्रांच्या स्वरूपात जगापुढे मांडले.

(१) माणूस हा नियमबद्ध आणि सुसंवादी अशा निसर्गव्यवस्थेचा घटक आहे आणि ह्या स्वरूपाच्या निसर्गातून त्याचा उदय झाला आहे; म्हणून मूलतः किंवा स्वभावतःच विवेकी (रॅशनल) आहे. विवेक म्हणजे अनुभवांमध्ये सुसंवाद साधण्याची प्रेरणा आणि शक्ती. नीती ही विवेकावर आधारली आहे किंवा नीती ही विवेकाचे व्यावहारिक स्वरूप आहे; कारण नीती म्हणजे व्यक्तीव्यक्तींमध्ये सुसंवादी संबंध असणे, मानवाची विवेकशीलता आणि त्याची नैतिक प्रेरणा म्हणजे नियमबद्ध निसर्गाचे मानवी जाणिवेत पडलेले प्रतिबिंब होय. तेव्हा विवेकाला आणि नीतीला वैश्विक अधिष्ठान आहे. (२) नवमानवतावादाचा दुसरा मूलभूत सिद्धांत असा की, व्यक्ती हे समाजाचे मूळ आहे. समाज व्यक्तींचा बनलेला असतो आणि सुख, ज्ञान, स्वातंत्र्य इ. सर्व मूल्ये व्यक्तीत वसत असतात. समूह ही प्राथमिक वास्तवता आहे आणि समूहाचा अविभाज्य घटक म्हणूनच व्यक्तीला अस्तित्व आणि मूल्य असते, असा दृष्टिकोण हेगेलच्या प्रभावामुळे मार्क्समध्ये आढळतो. नवमानवतावादाला तो पूर्णपणे अमान्य आहे. व्यक्ती मूलभूत आणि प्रधान आहे आणि राष्ट्र, वंश, वर्ग इ. सर्व प्रकारचे समूह गौण व दुय्यम आहे. स्वतंत्र, सार्वभौम व्यक्तींनी परस्परांशी सुसंवादी आणि परस्परांना हितकर असे संबंध प्रस्थापित करून घडविलेला समाज म्हणजे आदर्श समाज; तेव्हा कोणत्याही समूहाच्या, वर्गाच्या किंवा राष्ट्राच्या कल्याणासाठी किंवा महिम्यासाठी व्यक्तींच्या हिताचा बळी देणे अनैतिक आहे. माणसात स्वातंत्र्याची प्रेरणा म्हणजे स्वतः असण्याची प्रेरणा. इतर प्राण्यांमध्ये स्वतःचे अस्तित्व टिकवून धरण्याची एक मूलगामी प्रेरणा माणसाच्या ठिकाणी असते आणि ह्या प्रेरणेचे सुजाण रूप म्हणजेच स्वातंत्र्याची प्रेरणा. तेव्हा आपल्या स्वातंत्र्यात सतत वाढ करीत राहणे, ही माणसाची सर्वंकष प्रेरणा आहे असे मानावे लागते. तसेच आपल्या परिसराचे यथार्थ ज्ञान करून घेऊनच आपण आपले अस्तित्व टिकवून धरू शकतो आणि म्हणून ज्ञानाची इच्छा ही एक मूलभूत प्रेरणा आहे. आपल्या परिसराला तोंड देऊन आपले अस्तित्व टिकवून धरायला ज्ञान - म्हणजेच सम्यक ठरलेल्या कल्पना - उपयुक्त असतात आणि म्हणून ज्ञानाला मूल्य आहे; पण माणसाने एकदा ज्ञान मिळवले की ते स्वतःच्या स्वभावधर्माला अनुसरून - अनुभव आणि तर्क यांच्यावर आधारलेल्या नियमांना अनुसरून विकास पावते आणि ह्या वाढत्या ज्ञानाचा उपयोग करून माणूस आपल्या भौतिक आणि सामाजिक परिसराला आणि स्वतःलाही वळण देऊ शकतो. म्हणून माणूस आपल्या भवितव्याचा शिल्पकार असतो. माणसाची जाणीव, त्याचे विचार हे उत्पादनपद्धतीवर आधारलेल्या सामाजिक संबंधांचे त्याच्या मनात पडलेले केवळ प्रतिबिंब असते, विचार हे सामाजिक व विशेषतः आर्थिक परिस्थिती घडवीत नाहीत, तर सामाजिक आणि विशेषतः आर्थिक परिस्थिती विचारांना घडविते, काही अनिवार्य ऐतिहासिक नियमांना अनुसरून उत्पादनपद्धती विकसित होत जाते आणि ह्या विकासाचे प्रतिबिंब म्हणून मानवी जाणीव विकसित होत जाते, हा मार्क्सचा ऐतिहासिक भौतिकतावादी सिद्धांत नवमानवतावाद सदोष मानतो. त्याऐवजी सामाजिक, आर्थिक परिस्थिती व विचार हे तुल्यबळ असतात; कित्येकदा सामाजिक, आर्थिक परिस्थिती विचारांना घडविते. त्याच्या उलट कित्येकदा विचार हे सामाजिक, आर्थिक परिस्थितीला घडवितात; ते परस्परावलंबी आहेत, असे नवमानवतावाद मानतो.

ह्या सिद्धांतावर आधारलेल्या सामाजिक,

अनुक्रमणिका






आर्थिक आणि राजकीय पुनर्रचनेच्या कार्यक्रमांचे स्वरूप असे राहील; माणूस आपल्या ज्ञानाच्या आणि नैतिक प्रेरणेच्या बळावर आपल्या स्थितीला आणि भवितव्याला इष्ट ते वळण देऊ शकत असल्यामुळे विज्ञानाचा, विज्ञानाधिष्ठित तत्त्वज्ञानाचा आणि नीतीचा - म्हणजे परस्पर सहकारावर आणि सुसंवादावर आधारलेल्या नीतीचा - समाजात प्रसार केला पाहिजे; हे सामाजिक शिक्षण. सहकाराच्या तत्त्वावर आधारलेली इतरांच्या पिळवणुकीला थारा न देणारी अर्थव्यवस्था निर्माण केली पाहिजे. व्यक्तींना स्वतःच्या स्वातंत्र्याचा आणि सार्वभौमत्वाचा प्रत्यय येईल अशा लहान स्वायत्त समूहात संघटित केले पाहिजे. म्हणजे जेथे व्यक्ती इतरांशी विचारविनिमय करून आपल्या समूहाविषयी स्वतः निर्णय घेऊ शकतील, अशा स्वायत्त समूहात संघटित केले पाहिजे. अशा समूहांच्या प्रतिनिधींची मंडळे, ह्या मंडळांच्या प्रतिनिधींची मंडळे अशी पिरॅमिडसारखी रचना करून राज्यसंस्थेला आकार दिला पाहिजे. अशा समाजात खरीखुरी लोकशाही असेल; कारण त्यातील सर्व व्यक्ती बऱ्याच प्रमाणात स्वयंशासित असतील. कित्येक वर्षांनी आपला प्रतिनिधी निवडून त्याच्याकडे आपले सार्वभौमत्व संक्रांत करून इतरांनी घेतलेले निर्णय ह्या व्यक्ती पाळणार नाहीत; तर स्वतःच्या प्रत्यक्ष जीवनात आपल्या स्वातंत्र्याचा आणि सार्वभौमत्वाचा प्रत्यय त्यांना वाढत्या प्रमाणात येईल.

सारांश, सर्वच नियोजनाचे उद्दिष्ट व्यक्तीची निर्णयशक्ती अधिकाधिक प्रगल्भ करणे आणि तिचा स्वतःच्या सामाजिक जीवनात अधिकाधिक उपयोग करायला अवसर देऊन स्वातंत्र्यात वाढ करणे हे असले पाहिजे.

**- मे० पुं० रेगे**

['मराठी विश्वकोश खंड - ८' मधून साभार. (पृ० ३५२-३५३)]



या टिपणाचे एक विशेष महत्त्व आहे. मानवेंद्रनाथ रॉय यांनी डिसेंबर १९४५मध्ये आपले हे तत्त्वज्ञान मांडले. हे 'नवभारत'च्या 'मानव तितुका एकच आहे' ही विचारधारा गंगायमुनाप्रमाणे सरमिसळ वाहतात, हेही या टिपणात व्यक्त होते. प्राज्ञपाठशाळेचे अध्वर्यु तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री व्यवहारतः इंडियन नॅशनल काँग्रेसच्या या दिशेने जाणाऱ्या धोरणांचे पुरस्कर्ते व काही प्रमाणात मार्गदर्शकही होते. ते व प्रा. गोवर्धन पारीखही याच वृत्तीचे होते. दोघेही मानवेंद्रनाथ रॉययांचे निकटचे व्यक्तिगत स्नेहीही होते. तिसरे वैशिष्ट्य असे की तर्कतीर्थ मराठी विश्वकोशाचे प्रमुख संपादक म्हणून ही नोंद स्वतः न लिहिता प्रा. मे. पुं. रेगे यांच्या 'गागर मे सागर' शैलीचाही प्रत्ययही वाचकांना आल्याखेरीज राहणार नाही.

**- देवदत्त दाभोलकर**



राजकीय क्षेत्रातील रॉय यांची ही तर्कशुद्ध विधायकता शास्त्रीबुवांच्या हृदयाला भिडली. त्याचप्रमाणे रॉय यांचा सामाजिक दृष्टिकोन हाही शास्त्रीबुवांना जसा विचारप्रवर्तक तसा मूलगामी वाटला. रॉय हे नुसते पाखंडी नव्हते. ते खरेखुरे मूर्तिभंजक होते. हे देवादिकांचे आणि देवस्वरूप व्यक्तींचे शाडूंचे काम त्यांनी निधडेपणाने वेळोवेळी उघड केले. अंधश्रद्धा, दैववाद, गतानुगतिकत्व रॉय यांना कधीच मान्य झाले नाही. तर्क आणि विवेक यांची कास धरूनच जीवन जगले पाहिजे. हा रॉय यांचा आग्रह असे. राजकीय ध्येयधोरण ठरविताना त्यांनी विवेकालाच प्राधान्य दिले. भावनात्मक दृष्टिकोनातून त्यांनी राजकारणातील डावपेच टाकले नाहीत. सामाजिक दृष्टिकोन ठेवतानाही त्यांनी चिकित्सक भूमिकेचा अंगीकार केला. माणूस हाच जीवनाच्या मध्यभागी असतो आणि या विश्वाचा व्यापार-व्यवहार नियंत्रित करण्याचे सामर्थ्य माणसाने संपादन केले पाहिजे; त्यासाठी सतत निसर्गाला आव्हान देण्याचे आणि जीवनाला कलाटणी देण्याचे कार्य माणसालाच केले पाहिजे ही रॉय यांची श्रद्धा होती.

**- द्वा० भ० कर्णिक**
(नवभारत)



# गांधीवाद आणि नवमानवतावाद

मानवेंद्रनाथ रॉय
स्वैर अनुवाद : इंदुमती पारीख

महात्मा गांधींनी आपल्या सहकाऱ्यांबरोबर केलेल्या शेवटच्या चर्चेचा अहवाल श्री. प्यारेलाल यांनी नुकताच प्रसिद्ध केला आहे. ही चर्चा १९४७ सालच्या डिसेंबर महिन्याच्या पूर्वार्धात म्हणजे गांधीवधापूर्वी दीडएक महिना झाली. त्यांना आपल्या मृत्यूची चाहूल लागली होती की काय न कळे. 'देव आपल्याकरवी अनेक गोष्टी करवून घेतो अशी नितांत श्रद्धा असलेल्या गांधीजींसारख्या संवेदनशील माणसाला अशी सूचना मिळणे अशक्य नाही. ही गोष्ट प्रत्येकाच्या मानसिक प्रकृतीवर अवलंबून असते. ते काहीही असले तरी या चर्चेत मांडलेले विचार त्यांनी अंतःकरणापासून मांडले होते हे निर्विवाद! त्यामुळे या विचारांना गांधीजींचे 'मृत्युपत्र' म्हणण्यास हरकत नाही.'

या मृत्युपत्राचे मूल्यमापन करण्याचा माझा आज तरी इरादा नाही. ते काम इतिहासासाठी. सत्यान्वेषणासाठी केव्हातरी करावे लागेल. पण प्यारेलाल यांच्या या अहवालामुळे मला अनेक वेळा विचारल्या जाणाऱ्या प्रश्नाचे - गांधीवाद व नवमानवतावाद यांतील फरक काय? - या प्रश्नाचे उत्तर देणे सोपे झाले आहे. बायबलमधील 'टिंगल करायला आला आणि प्रार्थनेत सामील झाला' अशी माझी परिस्थिती झाली नाही हेही उघड करता येईल.

वरील प्रश्नाचे उत्तर देणे मी अनेक वेळा टाळले आहे. प्रश्न विचारणारासच त्याचे उत्तर शोधण्यास मी सांगत असे. काही वेळा या दोहोंत फारसा फरक नाही असा निष्कर्ष कोणी काढल्यास मी वादातही पडत नसे. पण मी नेहमी गांधीवादाचा टीकाकार होतो व गांधीवाद हा एकच विचार मानवाचे 'आशास्थान' आहे या विधानाबद्दल सतत शंका घेत होतो. माझ्या शंका खोट्या ठरल्या असत्या तर गांधीजींच्या प्रार्थनेत मी आनंदाने सामील झालो असतो. मी गांधीवादाबद्दल कधीही गैरसमज करून घेतले नाहीत. त्याबद्दल मनात किल्मिष बाळगले नाही किंवा त्याची टिंगलही केली नाही. माझ्या शंका चुकीच्या होत्या असे सिद्ध झाले तर अजूनही मी प्रार्थनेत सामील होईन. पण त्या खोट्या ठरल्या नाहीत. यशस्वी झालेल्या राष्ट्रवादाचा कार्यक्रम वा प्रत्यक्ष कृती यात व गांधीवादात फार तफावत आहे, फरक आहे असे सिद्ध करण्याचा प्रयत्न करणाऱ्या गांधीवाद्याबद्दल मला नितांत सहानुभूती वाटते. या अनुयायांची आपल्या ध्येयाशी एकनिष्ठ राहण्याच्या धडपडीबद्दल सहानुभूती वाटते; पण त्याचा अर्थ गांधीवाद व नवमानवतावाद एकच आहेत असा मला शोध लागला आहे असा होत नाही.

महात्मा गांधी.नैतिक मूल्ये मानणारे होते व त्यांचे विचार मानवतावादाकडे झुकलेही होते. म्हणूनच मी त्यांना श्रद्धांजली अर्पण करीत आहे. पण ते मानवतावादी नव्हते तर भूतदयावादी होते. या दोहोंची अनेक वेळा गल्लत केली जाते. माणसामाणसांत भेदभाव न करता सर्वांचे भले करण्याची इच्छा स्तुत्य आहे. पण त्याचा अर्थ माणसाचे माणूस म्हणून श्रेष्ठत्व मान्य करणे किंवा 'माणूस' हे मूल्य मानणे असा होत नाही. महात्माजींनी 'माणूस' हे मूल्य मानले नाही; तर माणसाला देवाच्या इच्छा पुऱ्या करण्याचे साधन मानले. यात काहींना जीवनाबद्दलचा पराकोटीचा उच्च दृष्टिकोन दिसू शकेल. पण या दृष्टिकोनामुळे माणसाच्या सर्जनशीलतेतील श्रेष्ठत्वास आणि स्वातंत्र्यास बाध येतो. म्हणून तो मानवतावाद होऊ शकत नाही. दैवी शक्तीपुढे स्वीकारलेल्या शरणागतीमुळे माणूस आपल्या कृत्यांच्या जबाबदारीतून मुक्त होऊ शकतो पण माणूस स्वतंत्र आहे असे मानणारांना ही पळवाट शिल्लक राहत नाही.

आपल्या अखेरच्या दिवसांत सत्य अहिंसा यांच्या मार्गापासून आपण दूर जात आहोत याची जाणीव गांधीजींस होत होती. पण दैवी शक्तीपुढे संपूर्ण शरणागती पत्करल्यामुळे आपल्या कृत्यास आपण जबाबदार नाही असा त्यांचा दृष्टिकोन होता. पण मानवतावादी माणसाला आपल्या सर्व कृत्यांची जबाबदारी स्वीकारावी लागते. त्यामुळे आपण






स्वीकारलेल्या मार्गावरून च्युत न होण्याची 'हमी'पण मानवतावादात असते. त्यात माणसाचा स्वातंत्र्य हा हक्क मान्य करताना त्याबरोबर येणारी जबाबदारीही स्वीकारावी लागते. उलट गांधीवाद स्वतःच्या कृत्यांच्या जबाबदारीतून माणसाला सोज्वळपणे मुक्त करतो. दैवी शक्तीच्या चरणावर स्वातंत्र्याची आहुती देऊन माणूस स्वतःच्या निर्णयाची व कृत्यांची जबाबदारी दैवी शक्तीवर टाकून मोकळा होऊ शकतो.

श्री. प्यारेलाल सांगतात की पश्चात्तापदग्ध भाषेत गांधीजी म्हणाले, 'ब्रिटिशांशी लढताना मी जो अहिंसेचा आहे असे समजून मार्ग स्वीकारला तो खराखुरा अहिंसेचा मार्ग नव्हताच. देवानेच हेतुपुरस्सर माझे डोळे बंद केले होते. कारण त्याला माझ्याकरवी महत्त्वाचे उद्दिष्ट साधावयाचे होते. ते साध्य झाल्यानंतर त्याने माझी दृष्टी मला परत दिली आहे.' या दृष्टिकोणामुळे माणूस आपल्या कोणत्याही दुष्कृत्यांची जबाबदारी टाळू शकेल. यामुळे आपण देवालाही व्यावहारिक पातळीवर उतरवतो व देवाचे मार्गदर्शनही 'चांगले साध्य कोणत्याही मार्गाने साधावे' या शंकास्पद म्हणीनुसार असते असे समजतो. देवावरील श्रद्धा हा गांधीवादाचा पाया आहे. त्यामुळे अनेक श्रद्धावान माणसे गांधीवाद मानवतावादापेक्षा श्रेष्ठ आहे असे मानू शकतात. पण सर्वांनाच तसे वाटणार नाही. अनेकांचे मत वेगळे असू शकेल. मला मांडावयाचा मुख्य मुद्दा असा की, 'चांगले साधन गाठण्यासाठी कोणतेही साधन वापरावे' हे तत्त्व खुद्द देवानेच मानले असेल तर गांधीवाद ते कसे झिडकारेल? देव करतो ते चांगलेच असते, चांगल्यासाठीच असते या म्हणीचा गांधीवादाने व्यवहारात त्याग केला आहे असा अनेक गांधीवाद्यांचा दावा आहे. याबद्दल मात्र माझे मन नेहमीच साशंक आहे. माझ्या शंकांचे निरसन खुद्द गांधीजींनीच केले हे बरे झाले.

गांधीवादाचे पहिले तत्त्व म्हणजे 'माणूस देवाची इच्छा पुरी करीत असतो.' या तत्त्वामुळे राजकारणात नैतिकता आणण्याचा, राजकारणाची शुद्धी करण्याचा गांधीजींचा प्रयत्न फसला. तसा तो फसला हे त्यांनी स्वत: व त्यांच्या अनेक निकटच्या सहकाऱ्यांनी मान्य केले आहे. याच तत्त्वाला मान्यता दिल्यामुळे वेगवेगळ्या काळात व देशात होऊन गेलेल्या धार्मिक नीतिवेत्त्यांनी-प्रेषितांनी-आयुष्यभर केलेला नैतिकतेबद्दलचा उपदेश त्यांच्या अनुयायांनी व्यवहारात धाब्यावर बसविलेला दृष्टीस पडतो. वरवर पाहता गांधीवादी व मानवतावादी यांची 'साधनशुचिते'बद्दल एकवाक्यता आहे असे दिसले तरी मानवतावादी राजकारणातील शुद्धतेबद्दल तडजोडीस तयार नाहीत व जोपर्यंत राजकारणाचे मुख्य 'आमिष' किंवा आकर्षण सत्ता हेच आहे तोपर्यंत राजकारणी माणसांकडून नीतिमूल्याची जोपासना होणार नाही असा त्यांचा दावा आहे.

गांधीवादाने सत्तेचे राजकारण झिडकारले आहे असा एक समज आहे. या गोष्टीवरही श्री. प्यारेलाल यांचा अहवाल चांगलाच प्रकाश टाकतो. या शेवटच्या चर्चेच्या ओघात गांधीजी म्हणले, बलवान माणसाचे अहिंसा हे मोठे शस्त्र आहे ही कविकल्पना किंवा स्वप्न ठरण्याची शक्यता आहे. अहिंसेच्या मार्गाने मिळवलेली सत्ता टिकविण्यासाठी किंवा तिचे संरक्षण करण्यासाठी जर त्या मार्गाचा वापर करता आला नाही तर 'जागतिक शांततेचा अग्रदूत' म्हणून अहिंसेला जगाच्या राजकारणात भविष्य उरणार नाही. थोडक्यात म्हणजे सत्तेच्या राजकारणाला मार्गदर्शन करण्यासाठी अहिंसेचा उपयोग करता आला नाही तर अहिंसेला राजकारणात स्थान असणार नाही. यावरून गांधीवाद सत्तेच्या राजकारणाविरुद्ध नाही हे मात्र सिद्ध होते. प्रत्यक्ष राजकारणात भाग न घेता मार्गदर्शन सहज करता येईल. अहिंसा हे सत्ता मिळविण्याचे साधन तर झालेच आहे पण ती टिकविण्याची वा तिचे संरक्षण करण्याची ताकद अहिंसेत आहे हे अजून सिद्ध व्हावयाचे आहे. यावरून असे म्हणावे लागेल की, गांधीवाद सत्ता मिळविण्यासाठी कराव्या लागणाऱ्या कार्यक्रमांना मान्यता देतो. म्हणजे 'साधनशुचिते'बद्दल गांधीवादाला आग्रही भूमिका घेता येणार नाही.

या चर्चेच्या वेळी गांधीजींच्या काही अनुयायांनी (सत्ताधारी काँग्रेसजनांव्यतिरिक्त) आपण शासनात-सरकारात-शिरावे व अहिंसेवर आधारलेली समाजरचना उभारावी असे सुचविले. पण गांधीजी त्यांच्याशी सहमत झाले नाहीत. त्यांनी 'नयी तालीम' (गांधीवादावर आधारलेले नवे शिक्षण) कार्यक्रम हातात घेऊन अहिंसावादी समाजरचनेसाठी वातावरण निर्माण करण्याचा सल्ला आपल्या अनुयायांना दिला. नवमानवतावादी पण हेच करू इच्छितात. (पण त्यांचा

शैक्षणिक कार्यक्रम 'नयी तालीम' पेक्षा वेगळा आहे.) मग ते गांधीजींच्या पावलावर पाऊल टाकीत आहेत असे होत नाही का? याचे उत्तर गांधीजींच्या पुढील वाक्यात मिळते. 'अहिंसेचा दुरुपयोग करून पण देवाच्या मर्जीनुसार सत्तेवर आलेल्या मंडळींना मी क्षमा केली आहे. माझी खात्री आहे की, मी जर त्यांच्याजवळ सत्ता मागितली तर ती मला तत्काळ मिळेल. पण ती ती मागणार नाही.' सत्ता सहज हाती येणे शक्य असताना ती नाकारणे म्हणजे स्वार्थत्यागाची पराकोटी किंवा परमसीमाच म्हणता येईल. पण कदाचित या गोष्टीकडे पाहण्याची दुसरीही दृष्टी असू शकेल. गांधीजी सर्वशक्तिमान होते. त्यापेक्षा मागून मिळालेल्या सत्तेची शक्ती कमी असण्याची शक्यता त्यांना समजत होती!

'नयी तालीम' या कार्यक्रमाचा परिणाम काय होईल यावर झालेल्या चर्चेमुळे तर गांधीवीद्यांचा सत्तेच्या राजकारणाबद्दलचा दृष्टिकोण आणखीनच स्पष्ट होतो. 'सत्ता पराङ्मुख होऊन आपण मतदारांची सेवा करीत राहिलो तर आपले त्यांच्यावर वजन तर पडेलच पण त्यांचे मार्गदर्शनही करू शकतो. त्यामुळे शासनात सामील न होता आपल्या हाती कितीतरी जास्त सत्ता येईल! कदाचित एक अशीही वेळ येईल की, तुमच्याखेरीज दुसऱ्या कुणाच्याही हातात सत्ता असता कामा नये असे लोक म्हणू लागतील. त्यावेळी काय करावयाचे ते पुढे पाहता येईल. सरकारची सूत्रे हाती घेऊ शकेल अशी व्यक्ती संघ (गांधी सेवा संघ) सहज निर्माण करता येईल त्यावेळी भारत एक नमुनेदार राज्य बनलेले असेल.' गांधीजींच्या या उद्‌गारावरून त्यांच्या सत्तेविषयीच्या दृष्टिकोणाबद्दल कोणताही संदेह राहत नाही.

गांधीजी म्हणतात, 'आपण सरकारात न जाता पाहिजे त्या व्यक्तींना त्यात पाठवू शकू. आता आपलेच सरकार आहे. वयात आलेल्या प्रत्येक व्यक्तीला मतदानाचा हक्क आहे. आपल्यात दम असला व आपले मतदारांवर पाहिजे तेवढे वजन असले म्हणजे म्हणू ती माणसेच निवडून आणू.' याहीपुढे ते असे म्हणतात, 'समजा तुम्ही सत्ता स्वीकारली नाही पण मतदारांवर ताबा मिळविलात तरीही आपल्याला पाहिजेत तेच लोक निवडून येतील. जोपर्यंत मतदार तुमच्या हातात आहेत तोपर्यंत पक्षाचे (काँग्रेस) सभासदत्व विसरा.' गांधीजींचा शेवटचा संदेश सांगतो, 'तुम्ही राजसत्ता ताब्यात घेण्याची कल्पना डोक्यातून काढून टाका. तुम्ही राज्यसत्तेला मार्गदर्शन करून तिला योग्य मार्गावर ठेवू शकाल.'

याचाच अर्थ कुणासही राजा बनविण्याची ताकद अंगी असता राजा होऊन राज्याची जबाबदारी कशाला स्वीकारावी? 'सर्वशक्तिमानत्व' बेजबाबदार असते. (Almightiness is irrisponsible). ते मिळविण्याची आकंक्षा व सत्तापराङ्मुखता एक नव्हेत एवढेच. 'आपली माणसं निवडून आणणे, मतदारांना ताब्यात ठेवणे किंवा सत्तेला मार्गदर्शन करणे' हे शब्दप्रयोग अपघाती नाहीत. कारण ही विचारप्रणाली - तत्त्वप्रणाली - मांडावायाची असते. त्याला योग्य अशीच भाषा वापरावी लागते. प्यारेलाल यांच्या म्हणण्याप्रमाणे या चर्चेच्या वेळी गांधीजींनी मांडलेल्या विचारांना विशेष महत्त्व आहे. त्यावरून स्वतंत्र भारतातील समाजउभारणीसाठी गांधीवाद्यांनी करावयाचे कार्य व सत्तेचे राजकारण यांतील संबंध स्पष्ट होतो व गांधीप्रणीत नमुनेदार राज्याचे ओझरते स्वरूपही आपणास पहावयास मिळते. 'लोकांवर आपली संपूर्ण पकड असल्यामुळे गांधीवाद्यांपैकी कुणीतरी एक (या वाक्यातील एकवचन लक्षात घ्यावे) राज्याची सूत्रे आपल्या हातात घेईल, सर्वजण त्याचे ऐकतील व तो सांगेल तसे वागतील.' अशी समाजरचना कदाचित अहिंसेवर आधारलेली असेल, पण ती मुख्यत्वेकरून मानसिक हुकमतीवर-जुलमावर आधारलेली असेल. (त्याखेरीज लोकांच्या मतावर संपूर्ण ताबा मिळवणे अशक्य आहे.) एवढे मात्र नक्की की, ही समाजरचना लोकशाही किंवा मानवतावादी असणार नाही. गांधीवादी समाजरचना ऐहिक हेतुवादी समाजरचनेचे प्रतिबिंब होय. हेतुवादी रचनेत माणूस अतिमानवी दैवी शक्तीचा हेतू तडीस नेण्याचे साधन असतो तर गांधीवादी रचनेत माणूस शासनकर्ता किंवा कल्याणकारी हुकुमशहाचा अंधानुयायी असतो. तथाकथित रामराज्याची ही पुनर्स्थापना का?

गांधीवादाचे पहिले तत्त्व म्हणजे स्वतःचा हेतू पूर्ण करण्याकरिता देवाने माणसाला निर्माण केले. याच तत्त्वावर माणसाची नैतिकता आधारल्यामुळे व्यवहारात ती अयशस्वी झालेली दिसते. याउलट, मानवतावादात ही नैतिकता माणसाच्या नैसर्गिक विवेकशक्तीवर आधारलेली आहे. माणूस हा माणूस आहे म्हणून तो

अनुक्रमणिका

नैतिक आहे असे मानवतावादाचे म्हणणे आहे. ही विवेकशक्ती अनेक माणसांत सुप्त असते म्हणून ती जागृत करून त्यानुसार माणसाचे वर्तन व्हावे यासाठी मानवतावाद प्रयत्नशील असतो. गांधीवाद माणूस हे अंतिम मूल्य न मानता साधन मानतो व त्यामुळे निर्णय घेण्याचे व त्याप्रमाणे वागण्याचे स्वातंत्र्य अनाकलनीय अशा दैवीशक्तीस बहाल करतो व या दैवी शक्तीवरील विश्वासामुळे तौ नैतिक वर्तन करील अशी अपेक्षा धरतो. मानवतावादी कोणतीही गूढ शक्ती मानत नाही. नैतिक वर्तन माणसाच्या स्वभावातच - निसर्गदत्त आहे असे मानतो.

राजकारण हे माणसाच्या व्यवहाराचे एक अंग असल्यामुळे इतर व्यवहाराप्रमाणे तेही नैतिक तत्त्वावरच चालवले पाहिजे अशी मानवतावादाची धारणा आहे. सत्तेच्या राजकारणावर मानवतावादाने केलेल्या बिनतोड व आग्रही टीकेचे पर्यवसान पक्षीय राजकारण झिडकारण्यात होते. भ्रष्टाचारास उद्युक्त करणारी सत्ताभिलाषा सोडली तरच राजकारणात नैतिकता आणता येईल असेही मानवतावाद सांगतो. सत्तेचा अर्थ लोकांचे भले करण्याचे सामर्थ्य असा घेतला तर त्यात भ्रष्टाचाराला फारसा वाव मिळत नाही हे खरे. पण सत्तेचे केंद्रीकरण मात्र धोक्याचे ठरेल. गांधीवादी नमुनेदार राज्यात 'कुणातरी एकाच्या' हाती सत्ता येईल. म्हणजे सत्तेच्या केंद्रीकरणाची परिसीमा गाठली जाईल. उलट प्रत्येक व्यक्तीत विवेकशक्तीवर आधारलेली, अनेकवेळा सुप्तावस्थेत असलेली विकसनशीलताही असते. त्यामुळे मानवतावाद सत्तेच्या विकेंद्रीकरणावर आधारलेली समाजरचना कल्पू शकतो - ती अस्तित्वात आणण्यासाठी प्रयत्नशील असतो. गांधीवाद व मानवतावाद यांतील हाच महत्त्वाचा व मुख्य भेद होय.



## मेपुरे - शास्त्रीजी संवाद

**मेपुरे :** रॉय यांचे भारताच्या संदर्भात काय विश्लेषण होते?

**शास्त्रीजी :** - प्रश्न असा आहे की, त्यावेळी रॉय मार्क्सवादी होते, पोथीनिष्ठ मार्क्सवादी नव्हते; पण त्यांची विचारसरणी, दृष्टिकोन मार्क्सवादी होता. आता मार्क्सवादाच्या दृष्टीने कोणत्याही ऐतिहासिक परिस्थितीत एक क्रांतिकारक वर्ग असतो. हा वर्ग क्रांती घडवून आणतो. रॉय यांचे भारतीय परिस्थितीच्या संदर्भात काय विश्लेषण होते? भारतात कोणता वर्ग क्रांतिकारक होता? कामगार वर्ग की शेतकरी वर्ग? की आणखी कोणता वर्ग? आणि हा वर्ग किंवा हे वर्ग बऱ्याच प्रमाणात काँग्रेसशी एकरूप झाले आहेत, काँग्रेस त्यांचे प्रतिनिधित्व करीत आहे असे त्यांचे विश्लेषण होते का?

- काँग्रेसच्या पाठीमागे जनता आहे पण तिला राजकीय शिक्षण देऊन जागृत केले पाहिजे हे त्यांच्या धोरणाचे सूत्र होते. ही जनता म्हणजे शेतकरी-कामकरी वर्ग आणि मध्यमवर्ग. जनतेचे हे थर क्रांतिकारक आहेत म्हणजे क्रांतिकारक बनण्याची क्षमता त्यांच्यात आहे असे त्यांचे निदान होते. इथला बुर्ज्वाजी (भांडवलदार वर्ग) आणि साम्राज्यशाही यांचे सूत जुळत चालले आहे असा दृष्टिकोन ते मांडीत होते. म्हणजे भारतीय भांडवलदार वर्गाची क्रांतिकारकता संपुष्टात येत चालली होती. ह्याबद्दल थर्ड इंटरनॅशनलमध्ये त्यांच्यावर टीका झाली होती. भारतीय भांडवलदार वर्ग आणि साम्राज्यशाही यांचे संगनमत घडून येत चालले आहे हा रॉय यांचा निष्कर्ष थर्ड इंटरनॅशनलच्या नेत्यांना अमान्य होता. थर्ड इंटरनॅशनलमध्ये रॉय यांना महत्त्वाचे स्थान होते पण ह्या मतभेदामुळे ते थर्ड इंटरनॅशनलमधून वगळले गेले.

- रॉय यांचे वैशिष्ट्य असे की, शेतकरी-कामगार-वर्गाप्रमाणे मध्यमवर्ग, म्हणजे सामान्य मध्यमवर्ग किंवा मध्यम-मध्यमवर्ग, पेटी बुर्ज्वा हाही एक सुप्तपणे क्रांतिकारक असलेला वर्ग आहे आणि म्हणून त्याचे राजकीय शिक्षण करून त्याची क्रांतिकारकता जागृत केली पाहिजे अशी त्यांची भूमिका होती. कार्ल मार्क्सच्या सिद्धांताप्रमाणे मध्यम-मध्यमवर्गीय काही क्रांतिकारक नव्हे. पण रॉय ह्यांनी त्याला क्रांतिकारकवर्ग हे स्थान दिले. जगातील कम्युनिस्ट पक्ष आणि भारतीय कम्युनिस्ट पक्ष यांची विचारसरणी आणि रॉय यांची विचारसरणी यांच्यात हा महत्त्वाचा भेद होता. दोघेही मार्क्सवादी. परंतु मध्यमवर्गाच्या क्रांतिकारक क्षमतेविषयीचे त्यांचे विश्लेषण वेगळे होते.

- मध्यमवर्ग जगात सर्वत्र वाढलेला आहे. ज्यांना भांडवलशाही देश म्हणून ओळखण्यात येते त्यांच्यातही तो वाढलेला आहे. तो काही संकोच पावत जाईल अशी लक्षणे नाहीत. मार्क्सवादामध्ये अधिक खोलात शिरून त्याच्यात त्यांनी ही भर घातली असे म्हणावे लागेल. ही भर म्हणजे मध्यमवर्ग क्रांतिकारक भूमिका वठवू शकतो हा सिद्धांत. रॉय यांच्या दृष्टीने क्रांतीचे नेतृत्व मध्यमवर्गाकडे असते. कामगारवर्ग क्रांतीचे नेतृत्व करतो हा मार्क्सवादी सिद्धांत खरा, पण वस्तुत: हे नेतृत्व मध्यमवर्गाचे असते असे रॉय यांचे म्हणणे होते. म्हणून वसाहतीमध्ये, जित देशांमध्ये जी क्रांती व्हायची होती तिच्यात मध्यमवर्गाचे स्थान अपरिहार्य आहे असा रॉय यांचा दृष्टिकोन होता.

(नवभारत : एम्.एन. रॉय विशेषांक, पृ.क्र. ५)

❖ ❖ ❖

# विचारवंत आणि समाज

## वसंत पळशीकर

आरंभालाच दोन प्रश्न मनात येतात. 'विचारवंत' हा शब्द कोणत्या शब्दाला प्रतिशब्द म्हणून आपण घडविला आहे? आणि, 'विचारवंत' कोणाला म्हणावे? हे ते दोन प्रश्न होत. ब्रिटिशपूर्व काळी हा शब्द नसावा. शास्त्री, पंडित, आचार्य हे शब्द त्या काळी वापरात असणार. विद्वान हा शब्दही प्रचलित असावा. मग या शब्दाचाच वापर करावयास हरकत कोणती? 'इन्टलेक्च्युअल्', 'थिंकर' या इंग्रजी शब्दांना मराठी प्रतिशब्द म्हणून 'विचारवंत' हा शब्द नव्याने घडविला गेला असे दिसते. नवा शब्द प्रचारात येण्याचे एक कारण दिसते. विवक्षित पद्धतीने विवक्षित ग्रंथांचा, शास्त्राचा, गुरू वा आचार्य यांच्याजवळ राहून अध्ययन केल्यावर, एक विशिष्ट पातळी - विद्वत्तेची व विवेचक मांडणीची - गाठल्यावर शास्त्री, आचार्य, पंडित या पदवीला व्यक्ती पात्र ठरत असे. त्यापेक्षा एका वेगळ्या पद्धतीने आणि वेगळ्याच ग्रंथांचा व शास्त्रांचा अभ्यास केलेल्या व त्या अभ्यासाच्या आधारे लेखन-भाषण करू लागलेल्या व्यक्तीला 'विचारवंत' म्हणून ओळखले जाऊ लागले. म्हणजे, इंग्रजांच्या राजवटीबरोबर आलेले नवे शिक्षण व त्या नव्या शिक्षणाच्या गाभ्याशी असलेली नवी शास्त्रे यांच्याशी या शब्दाचा संबंध दिसतो. इतिहास, समाजशास्त्र, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, तत्त्वज्ञान, साहित्य, मानसशास्त्र, मानवसंस्कृतिशास्त्र इत्यादी या नव्या सामाजिक शास्त्रांचे अध्ययन ज्याचे झालेले नाही - औपचारिकरित्या वा अनौपचारिकरित्या - त्याची 'विचारवंत' म्हणून आपण ओळख करून घेऊ का, त्याचा स्वीकार करू का? तसेच, एका विवक्षित बौद्धिक युक्तिवाद न करणाऱ्या व्यक्तीला उद्देशून 'विचारवंत'हा शब्द आपण वापरू का? युरोपात सतराव्या शतकानंतरच्या काळात धर्माधिष्ठित समाजाचे अवस्थांतर एका 'सेक्युलर' समाजात होत गेले. त्या स्थित्यंतराच्या घडोमोडीशी या शब्दाचा घनिष्ठ संबंध दिसतो.

'विचारवंत' कोणाला म्हणावे, या प्रश्नाचे उत्तरही या परिप्रेक्ष्यात देता येईल का? नव्या सामाजिक शास्त्रांच्या आधारे, बुद्धिप्रामाण्यवादी भूमिकेमधून साऱ्या समाजाच्या स्थितिगतिविषयी विवेचन करणाऱ्या व्यक्तीची ओळख 'विचारवंत' या शब्दाने आपणास पटते, असे आपण म्हणू शकू का? 'बुद्धिप्रामाण्यवादी' हा शब्द मी वापरला आहे. त्याचे थोडे स्पष्टीकरण करतो. समजा एक व्यक्ती स्वतःला धर्मनिष्ठ म्हणवीत असेल, व त्या भूमिकेमधून आपले विचार मांडत असेल; त्याच्या मांडणीला ती व्यक्ती नव्या सामाजिक शास्त्रांचा व त्यांच्या परिभाषेचा आधार देत नसेल, तर त्या व्यक्तीला आपण 'विचारवंत' म्हणून मान्याता देऊ का? महात्मा गांधींचे उदाहरण घेता येईल. 'इन्टलेक्च्युअल' म्हणून गांधींना आपल्या समाजात -विशेषतः इन्टलेक्च्युअल जगात - आजही मान्यता नाही. तसे म्हणावयाचे झाल्यास अनेकांना अवघड-ल्यासारखे होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची गांधींवरील टीका येथे आठवावी. 'बुद्धी हेच एकमेव प्रमाण आहे.' म्हणजे नेमके काय, हा प्रश्न तसा अडचणीत टाकणारा आहे. पण असा प्रश्न उपस्थित न करता बुद्धिप्रामाण्यवाद आपल्याकडे स्वीकारला गेला आहे. आणि म्हणूनच, गांधीचा प्रभाव मान्य करीत असतानाच - तो मान्य करण्या-खेरीज गत्यंतरही नव्हते म्हणा - त्यांना अगदी अलिकडेपर्यंत विचारविरोधी म्हटले जात आले. कारण काय, तर स्वतःच्या बौद्धिक युक्तिवादांना बुद्धिप्रामाण्यवादाची बैठक आहे असे ते म्हणत नव्हते व सामाजिक शास्त्रांचाही आधार घेत नव्हते.

या संदर्भात, दुसऱ्या बाजूला कार्ल मार्क्स व बर्ट्रांड रसेल यांची उदाहरणे आपण घेऊ शकू. विचारवंताचा आदर्श नमुना म्हणून महाराष्ट्रात एकदोन पिढ्यांतील अनेकांनी रसेल यांचे उदाहरण समोर ठेवले असे म्हटले तर ते वावगे ठरू नये. अत्युच्च कोटीचा विचारवंत म्हणून कार्ल मार्क्स यांचा लौकिक निर्विवाद

अनुक्रमणिका






आहे. या दोघांचेही सामाजिक शास्त्रांचे प्रगाढ अध्ययन होते व हे दोघेही बुद्धिप्रामाण्यवादी भूमिकेवर स्थिर होते.

'विचारवंत' या शब्दाची ही जी गृहीत व्याख्या आहे तीच तपासून घ्यायला हवी अशी आज निकड उत्पन्न झाली आहे असे मला सुचवायचे आहे. दोन उदाहरणे मीं घेतो. एक, न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांचे आणि दुसरे, महात्मा जोतीराव फुले यांचे. दोघांचीही थोरवी सर्वमान्य आहे. 'सर्वज्ञ' म्हणून ख्याती व्हावी इतकी विद्वत्ता न्यायमूर्तींपाशी होती. आणि त्यांनी लेखन केले, भाषणे दिली. त्यांचे संग्रह प्रसिद्ध आहेत. वरील रूढ गृहीत व्याख्येनुसार त्यांची गणना विचारवंत म्हणून होऊ शकते. पण बुद्धिवंतांमध्ये त्यांना विचारवंत म्हणून मान्यता आहे असे आढळत नाही. उदाहरणार्थ 'रानडे यांचा अर्थशास्त्रीय विचार', 'रानडे यांची नेमस्त विचारप्रणाली' या प्रकारचे विषय घेऊन जेव्हा लेखन होत नसते तेव्हा रानडे यांची दखल वैचारिक लेखनात किती घेतली जाते? त्यांची 'धर्मपर व्याख्याने' 'विचारवंता' कडून अपेक्षा केली जाईल त्या अपेक्षा पूर्ण करीत नाहीत असा निष्कर्ष बहुधा काढला जातो. पण तो काढण्याइतकीही त्यांची दखल विचारवंतांचा वर्ग घेतो असे आढळत नाही. महात्मा फुले यांनी तत्कालीन नाना अंधसमजुतींचा फायदा उठविणाऱ्या, लोभी ब्राह्मणांच्या भिक्षुकी कर्मकांड-प्रधान धार्मिकतेवर कठोर हल्ला चढविला. तो चढवीत असताना बुद्धिप्रामाण्यवादी भूमिका अंगिकारली असे म्हणता येईल. मात्र सामाजिक शास्त्रांचे त्याचे अध्ययन फार तर कामचलाऊ होते; त्यांचे युक्तिवाद फार सदोष होते. त्यांच्या समग्र वाङ्मयाचे पुस्तक वाचल्यावर त्यांच्या तर्कशुद्ध बौद्धिक युक्तिवादांनी काही आपण प्रभावित होत नाही. 'इन्टलेक्च्युअल' या कोटीत ते बसत नाहीत. जसे, उदाहरणार्थ, डॉ. बाबासाहेब आंबेडकर चपखल बसतात. या कारणाने फुल्यांचे समर्थन करणारे किंवा त्यांच्या विचारांचा मागोवा घेणारे विवक्षित लेखन सोडले तर ते तसे आजही उपेक्षित मानकरीच राहीले आहेत, 'विचारवंतां'च्या जगात समाजाच्या धारणेच्या, उन्नयनाच्या दृष्टीने विचार कोणी किती मोलाचा दिला या कसोटीवर मापल्यास हे दोघे श्रेष्ठ विचारवंत ठरतात ही गोष्ट मला उघड दिसते.

किंवा आपण सरळच पुढील प्रश्न विचारावा. ज्याने विद्यापीठीय चौकटीतल्या पद्धतीने सामाजिक शास्त्रांचे अध्ययन केलेले नाही आणि जो बुद्धिप्रामाण्यवादी नाही तो 'विचारवंत' या पदवीला पोचू शकतो की नाही? 'नाही' असे आपले उत्तर असेल तर, आपण एक निरूंद, विशेषीकृत (नॅरो, स्पेशलाईज्ड) व्याख्या करून बसू. तशी व्याख्या करायला आपण अर्थातच मोकळे आहोत. पण ते किती शहाणपणाचे होईल?

आणि जर आपण असे म्हटले की, सामाजिक शास्त्रांचे अध्ययन न केलेली, बुद्धि-प्रामाण्यवादाची कास न धरलेली व्यक्तीदेखील 'विचारवंत' असू शकते. तर मग त्याचे विचारवंतपण कशात असते याचा खुलासा करावा लागेल. नकारात्मक स्वरूपाची एक गोष्ट आरंभीच सांगता येईल. ती अशी की, जी व्यक्ती स्वत:चे म्हणणे सुसंगतरित्या मांडू शकत नाही, मांडणी न करता फक्त मते अभिव्यक्त करीत राहते तिला विचारवंत म्हणता येणार नाही. म्हणजे असे की, वागण्या-बोलण्यात एखादी व्यक्ती 'विचारी' असेल, पण 'विचारवंत' म्हणून पदवी प्राप्त होण्यासाठी तेवढी गोष्ट पुरेशी नाही. दुसरीही एक नकारात्मक गोष्ट अशी की, स्वत:च्या मांडणीद्वारे ती व्यक्ती ज्या वेगवेगळ्या गोष्टी, विचार, तत्त्वे प्रतिपादित असेल त्यांच्यात काही एक संवाद असावा, त्या साऱ्यांना पायाभूत अशी एक बैठक असावी. ती गोष्ट अर्थात सकारात्मकही आहेच; मांडणीबाबत असे म्हणता येईल की, मार्मिक युक्तिवादांच्या आधारे, विद्वत्तापूर्णरित्या केलेली ती मांडणी असावी अशी काही अट नाही. दृष्टांतांच्या आधारेही मांडणी होऊ शकते. जशी आचार्य दादा धर्माधिकारी यांची मांडणी असे. इतरही प्रकार संभवतात. विचारवंत, विद्वान, पंडित मोठे तल्लख, भेदक विश्लेषण तर्ककर्कशपणे करू शकणारा असलाच पाहिजे असे नाही, तर मग त्याचे विचारवंतपण कशात साठवलेले असते?

जगण्याच्या ओघात तो जे अनुभवतो - वाचन, श्रवण, दर्शन हेही अनुभवणेच - त्यापासून वैयक्तिक तसेच सामाजिक पातळीवर जीवनाच्या संदर्भात काय शोध हाती येतो, शहाणपणाची, भली, हिताची वा खरी म्हणून कोणती तत्त्वे, मूल्ये, कल्पना प्रकट होतात वा प्रतीत होतात, या स्वरूपाचे चिंतन नि:स्वार्थी, तटस्थ, अनासक्त वृत्तीने आतमध्ये घडते. यात विचारवंतपण









साठवलेले असते. वा तो त्याचा स्रोत असतो असे म्हणता येते का? दुसरी गोष्ट, विशिष्ट घटना-प्रसंगी, विशिष्ट व्यक्ती वा समूह वा समाज यांना उद्देशून काही सांगितले जात असले तरी, जे सांगितले जात असते ते सर्वसामान्यपणे लागू होणारे, तात्त्विक स्वरूपाचे, वैश्विक ( युनिव्हर्सल ) स्वरूपाचे असते हाही विचारवंतपणाचा एक भाग असतो असे म्हणता येते का?

तल्लख बुद्धीचा वकील जेव्हा त्याच्या पक्षकाराच्या बाजूने समर्थ युक्तिवाद करीत असतो तेव्हा तो विचारवंताच्या भूमिकेत बहुधा नसतो. काही वेळेस पक्षकारची बाजूही विचारवंताच्या भूमिकेतून मांडली जाते ही गोष्ट वेगळी. तात्पर्य, बुद्धीचा तल्लख, भेदक, प्रभावी वापर, तर्ककठोर युक्तिवाद यांच्या आधारे मांडणी करणारा प्रत्येकजण 'विचारवंत' या पदवीला पोहोचू शकत नाही. तसेच, एखाद्या विशिष्ट शास्त्राच्या चौकटीत तज्ज्ञ पंडित या नात्याने केलेली मांडणीही ती मांजणी करणाऱ्यास 'विचारवंत' या पदवीस पोचवू शकत नाही.

या सगळ्याचा एकंदर मथितार्थ काय? निःस्वार्थी, तटस्थ/अनासक्त भूमिकेमधून व्यक्ती व समाज यांच्याविषयीच्या सर्वसामान्य तत्वांचा, शहाणपणाचा, भल्याबुऱ्याचा, हिताहिताचा, खऱ्या-खोट्याचा शोध जीवनाच्या संदर्भात समग्र दृष्टी बाळगून जो घेतो व तसा तो घेत असताना व त्यासंबंधी मांडणी करीत असताना जो या सगळ्याची म्हणून एक अंगभूत शिस्त पाळतो तो विचारवंत या पदवीला पोचतो. नुसती बौद्धिक क्षमता यासाठी पुरेशी पडत नाही. किंबहुना रूढार्थाने उच्च कोटीची बौद्धीक क्षमता ही नीतिविवेकाच्या अभावी विचारवंत या पदवीला पोचण्याच्या आड येण्याचाच संभव अधिक. विवेक करता येण्यासाठी काही एक बौद्धिक क्षमता व शिस्त आवश्यक असते ही गोष्ट खरी. पण विवेक करता येण्यासाठी मुळात एक नैतिक भूमिका गरजेची असते.

या व्याख्येविषयी कदाचित वाद व्हायचा नाही. पण आज वेगवेगळ्या विषयांवर ज्या व्यक्ती व्याख्याने देतात, लेख लिहितात, त्यांच्या माध्यमातून काही बौद्धिक विश्लेषण, युक्तिवाद सादर करीत स्वतःची मते मांडतात त्यांचे नाव विचारवंत म्हणून समाजात प्रसृत होते. ही गोष्टही खरी की, महाविद्यालये व विद्यापीठे यांची संख्या वाढली, शिक्षणाचा प्रसार झाला आणि पदव्युत्तर वा त्याही पुढचे शिक्षण घेतलेल्या व्यक्तींच्या संख्येत अनेक पटींनी वाढ झाली, नित्य भरही पडत आहे. वेगवेगळी आधुनिक शास्त्रे शिकलेली, त्याच्यात पदव्या घेतलेली ही मंडळी जेव्हा 'विचारवंत' बनण्याची आकांक्षा बाळगतात, वा त्यांची कळत नकळत त्या दशेने वाटचाल होऊ लागते तेव्हा स्वाभाविकच सामाजिक शास्त्रांचे जे अध्ययन त्यांनी केलेले असते त्यांचा ते आधार घेतात. किंवा अन्य ख्यातनाम देशी विदेशी विचारवंतांच्या विवेचनाचा स्वतःच्या विवेचनासाठी आधार घेतात. अशा विचारवंतांच्या मांडणीत, विवेचनांतही एक नैतिक भूमिका व दृष्टी अध्याहृत असते, पुष्कळदा प्रच्छन्न असते. पण ते विचारवंत म्हणून नावाजले जातात ते त्यांच्या सामाजिक शास्त्रांमधील विद्वत्तेबद्दल, त्यांच्या विश्लेषक टीकाटिप्पणीबद्दल वा त्यांच्या कुशल व प्रभावी युक्तिवादामुळे. विचारवंत या कल्पनेचा यात संकोच होत असला तरी, ही एक वास्तविकता म्हणून स्वीकारणे जास्त शहाणपणाचे व व्यवहारी होईल.

पुष्कळ वाचन, सामाजिक व अन्य शास्त्रांचे अध्ययन, इतर नामवंत विचारवंतांच्या विचारांचा परिचय/अभ्यास, या गोष्टी ज्याच्या जमेला नाहीत तोही जगण्याच्या ओघात येणाऱ्या अनुभवांवर मूल्ये, तत्त्वे, श्रद्धा, संकल्पना यांच्या चौकटीत व त्या आधारे खोलवर, अगदी मुळांशी जाऊन विचार करू शकतो. अशी विचारी माणसे आढळतात. त्यातली काही प्रसंग पडला तर आपले म्हणणे व्यवस्थित मांडूही शकतात, वाद घालू शकतात. परंतु त्यांना कोणी विचारवंत मानीत नाही. ज्यांचे विचारवंत असणे वरील गोष्टींच्या पुंजीवर निर्णायक अर्थाने अवलंबून असते असा एक वर्ग आज आहे. ते समाजात बराच प्रभावीही आहे. कारण विचारवंत हा शिकलेला, नाना संदर्भ देऊ शकणारा, मोठमोठी नावे घेऊ शकणारा असावा अशी अपेक्षा बाळगलेली असते. महाविद्यालयीन व विद्यापीठीय शिक्षण जसजसे जनसामान्यातील पुष्कळांपर्यंत पोचत आहे तसतसे या कोटीतलेच विचारवंत बहुसंख्येने आढळू लागावेत हे स्वाभाविकही आहे.

अलिकडच्या काळात शिक्षणाच्या गुणवत्तेत, कसात जो सार्वत्रिक ऱ्हास झाला आहे व ही घसरण थांबण्याची शक्यता नजिकच्या भविष्यकाळात दिसत

नाही - त्यामधून काही गंभीर पेच निर्माण झाले आहेत याची इथे दखल घ्यायला हवी. वेगवेगळी आधुनिक शास्त्रे घेतली तर त्यांच्या क्षेत्रातील उत्तम ग्रंथ बव्हंशी इंग्लिश भाषेत आपल्याला उपलब्ध आहेत. (आपल्या दृष्टीने अन्य परकीय भाषांचा या संदर्भात विचार केला नाही तरी चालेल.) वेगवेगळ्या पातळ्यांवरील काम-चलाऊ वा बरी पाठ्यपुस्तके, स्फुट लेखांचे संग्रह वजा केले आणि कसदार चिंतन-विवेचन ज्यांमध्ये आढळते अशा मराठीतील शास्त्र ग्रंथांची यादी करावयाची म्हटली तर ती फार मोठी व्हावयाची नाही. पण जी काही चांगल्या दर्जेदार ग्रंथांची यादी होईल त्यातलीही किती महाविद्यालयीन/ विद्यापीठीय शिक्षणाच्या ओघात अभ्यासली जातात? हा प्रश्न न विचारलेला बरा अशी आज स्थिती आहे. इंग्रजी पुस्तकांबद्दलची स्थिती अशी अनुभवाला येते की, ते वाचून समजून घेण्याची क्षमता फार थोड्यांच्या ठायी शिकण्याच्या ओघात निर्माण होते. पण पदव्या हाती असल्याने व औपचारिक इंग्रजी वाचता येत असल्याने, ग्रंथ कळला अशी प्रामाणिक समजूत करून घेता येते. माझे पुढील विधान आढ्यतेचे द्योतक वाटण्याचा धोका ध्यानात घेऊनही मी ते करीत आहे. अनेक वर्षे वेगवेगळ्या विषयातील इंग्रजीमधून मराठी भाषांतरे तपासण्याच्या, संपादित करण्याच्या अनुभवामधून हाती आलेला चिंताजनक निष्कर्ष असा की, अनेक मान्यवरांचेही इंग्रजीत ते जे वाचतात त्याचे आकलन फार ढोबळ, गोळाबेरीज या स्वरूपाचे असते; काही वेळा तर ते सपशेल चुकीचे असते किंवा आपल्यासमोर असलेल्या संहितेचा अर्थ काटेकोरपणे स्वतःला पूर्ण कळून लावला नाही तर काय बिघडते, अशी तरी धारणा असावी. मराठीत कसदार असे वाचायचे म्हटले तरी फार नाही, जे आहे तेही वाचण्याचे कष्ट घेतले जात नाहीत, इंग्रजी वाचलेच तर ते पूर्ण ग्रहण होत नाही, इंग्रजीत वाचन आपल्याला फार अवघड जाते हे लक्षात आल्यावर त्या वाटेला जाणेच नको असा निर्णयही केला जातो. हे चित्र जर वास्तव असेल आणि ते तसे आहे असे मला दिसते, तर वेगवेगळ्या आधुनिक शास्त्रांचे सखोल वाचन - अध्ययन या स्वरूपात जी बैठक पक्की होणे विचारवंत बनण्यासाठी आवश्यक आहे तीच बहुतेकांची होत नाही असा त्याचा अर्थ आहे.

एकीकडे ही स्थिती तर दुसरीकडे ज्या अनेकानेक उपक्रमांसाठी 'वैचारिक घडामोड' (ॲक्टिव्हिटी) असा शब्दप्रयोग करता येईल अशा उपक्रमांचे फारच उदंड पीक आलेले आहे. वृत्तपत्रे त्यांच्या खास पुरवण्या, नियतकालिके, आकाश-वाणी, दूरदर्शन यांसारखी प्रसारमाध्यमे विचारवंत घडवीत असतात असेही म्हणता येण्यासारखी स्थिती आहे. परिसंवाद, चर्चासत्रे सतत होत असतातच, ज्यांमध्ये उत्साहाने निबंधावर निबंध सादर केले जातात. व्याख्यानमालाही अनेक पटीने वाढल्या आहेत. अलीकडे विषयवार प्राध्यापकांनी सामाजिक शास्त्रांच्या परिषदाही स्थापन केल्या आहेत. त्यांच्या वार्षिक अधिवेशनातही अनेक निबंध सादर होतात. यात गेल्या तीनचार वर्षांमध्ये विचारवेध संमेलनाची भर पडली आहे. म्हटले तर केवढे विचारमंथन महाराष्ट्रात सतत चाललेले असते!

वर निर्दिष्ट केलेल्या दुहेरी प्रक्रियेमधून समाजात ज्यांना पट्टीचे विचारवंत म्हणून मान्यता मिळते व जे स्वतःलाही त्या गोटात धरतात अशांची बऱ्यापैकी मोठ्या प्रमाणात निर्मिती होत आहे. म्हणजे, या एक प्रकारच्या अथक वैचारिक मंथनामधून नवविचारांचे नवनीत, गोळेच्या गोळे, हाती येत राहावयास हवे होते. तसे काही घडत असते तर निदानपक्षी उच्चशिक्षणाच्या स्तरावर कोणत्याही विषयाचे मराठी माध्यमामधून, व मराठीतील ग्रंथ व अन्य साहित्याच्या आधारे अव्वल दर्जाचे शिक्षण घेणे एव्हाना शक्य व्हायला हवे होते. पण तसे काही घडताना आढळत नाही. **समाजाचा वैचारिक स्तर उंचावण्याऐवजी वा खोल होण्या-ऐवजी, व्यापक व सूक्ष्म, दोन्ही होण्याऐवजी विचाराच्या नावे एक ढिसाळपणा, भोंगळपणा, उथळपणा व या सर्वांवर पांघरूण घालण्यास उपयोगी पडणारा अभिनिवेश माजला आहे असे दृश्य दिसते.**

अव्वल कसाचा विचार मराठीत मांडलाच जात नाही असे नाही. त्या कुवतीच्या काही व्यक्ती समाजात आहेत. पण त्या अपवादादाखल आहेत. मराठी समाजाची एकंदर लोकसंख्या विचारात घेता अशांची संख्या/प्रमाण अत्यल्प आहे.

आता, इतर परदेशीय समाजांचे काही मला माहीत नाही. पण आपल्या मराठी समाजाचे चित्र काय दिसते? ज्येष्ठ नि श्रेष्ठ विचारवंत म्हणून ज्यांचा प्रसंगी गौरव केला जातो त्यांचा वैचारिक प्रभाव समाजावर

कितीसा आहे असे म्हणता येईल? जनसामान्यांवरील प्रभावाचा मुद्दा तूर्त बाजूला ठेवू. सुशिक्षित, पांढरपेशा बुद्धिजीवी व्यावसायिकांचा वर्ग विचारात घेतला तरीही या व्यक्तींचा प्रभाव आढळतो असे दिसत नाही. सुशिक्षित बुद्धिजीवी वर्गामध्ये लोकप्रिय असलेले, प्रभाव असलेले विचारवंत आहेत ते पाहा, आठवा.



समाज आणि विचारवंत यांचा परस्परसंबंध कसा असतो? विचारमंथनातून जर सकस, अर्थपूर्ण विचारांचा अभावच जास्त प्रकट होत असेल तर, 'जसा समाज तसे विचारवंत', 'मागणी तसा पुरवठा' असे म्हणता येईल. असे समाज-शास्त्रीय विश्लेषण करणे शक्य आहे, व ते अधिक खोलात जाऊन करणे इष्ट, आवश्यक व उप-कारकही ठरेल. त्याच वेळी, उलटेही विश्लेषण करता येईल म्हणजे, 'जसे विचारवंत तसा समाज' असेही म्हणता येईल. दोन्ही अंगानी विचार व्हायला हवा.

समाजजीवनाच्या सर्व अंगांवर प्रभुत्व असलेला मराठी सुशिक्षित, पांढरपेशा, व्याव-सायिक, बुद्धिजीवी जो मोठा वर्ग आहे त्याला त्याच्या अस्तित्वासाठी, त्याचे कार्य पार पाडण्या-साठी मराठी भाषेमधून, स्वतंत्र वृत्तीने कसून विचार करावयाची गरज जाणवत नाही असे आढळते. याबाबतीत तो परावलंबी आहे आणि परावलंबी असण्याबद्दल त्याला खतही नाही. या वर्गाची वैचारिक - मानसिक जडणघडण ज्यामधून होते ते साहित्य कोणते व ते कोण लिहितो? ते परदेशी तरी असते वा परदेशीयांचे अनुवाद या स्वरूपाचे असते. सांस्कृतिकदृष्ट्याही हा वर्ग परावलंबी आहे. त्याला मराठीविषयी जे काही 'प्रेम' आहे त्याची जातकुळी कोणती आहे याची बऱ्यापैकी कल्पना मराठी भाषेच्या नावे होणाऱ्या संमेलना-वरून व सोहळ्यांवरून येते. 'वैचारिक' या सदरा-खाली मोडणारे साहित्यही त्याला हलकेफुलके, जाता येता वाचता येईल या स्वरूपाचे आवडते. मराठी सांस्कृतिक जीवनात दिवाळी अंक ही एक दखल घ्यायला हवी अशी मोठी, महत्वपूर्ण वार्षिक घडामोड आहे. या अंकामधील वैचारिक साहित्याची या दृष्टीने काटेकोर व परखड चिकित्सा करण्यासारखी आहे. विचारांना वाहिलेल्या नियतकालिकांची संख्या हातांच्या बोटावर मोजता येण्याइतकीच जेमतेम निघेल. ही नियतकालिके वर्गणीदार वाचकांच्या भरवशावर चालू शकत नाहीत हे सर्वज्ञात आहे. पण खरी शोकांतिका वेगळीच आहे. या नियतकालिकांच्या संपादकांची मुख्य तक्रार चांगले लेखन मिळत नाही ही राहिली आहे. एका किमान दर्जाचेच लेखन प्रकाशित करावयाचे असा आग्रह धरल्यास ती बंद पडतील, अशी स्थिती आहे. एवढी थोडी व फार पृष्ठे नसलेली नियतकालिके दर्जेदार लेखनाने भरण्याइतकेही पहिल्या - दुसऱ्या श्रेणीचे विचारवंत महाराष्ट्रात नाहीत, ही वस्तुस्थिती अद्याप तरी सुदैवाने नाही. पण यातल्या अनेकांना लिहिते करणे ही एक बऱ्यापैकी कष्टप्रद गोष्ट असते. हाही संपादकांचा अनुभव आहे. मराठी भाषेत लिहिणे ज्यांना नको वाटते वा जे इंग्रजीत लिहिण्यास जास्त महत्त्व देतात त्यांना मी सोडूनच देतो. ज्यांची अशी वृत्ती वा भूमिका नाही त्यांच्या-बद्दल मी म्हणतो आहे. यापुढची, व्यक्तिशः मला व्यथित करीत आलेली गोष्ट अशी की, मराठी भाषेमधून जे जे वैचारिक साहित्य, विशेषतः ग्रंथरूपाने प्रसिद्ध होत असते त्याचे कसून परीक्षण करणारे समीक्षात्मक लेखन करणे ही तिसऱ्या - चौथ्या श्रेणीची कामगिरी मानली जाते. अलिकडे, महानगरीय दैनिकांच्यामधून परीक्षणे/परिचयलेख लिहिण्यास मंडळी जास्त उत्सुक दिसतात. 'काहीच नाही त्यापेक्षा हे करताहेत ते तरी बरे' असे मी देखील म्हणतो. पण अशा ठिकाणी प्रसिद्ध होणाऱ्या लेखनाच्या मर्यादा फार मोठ्या असतात. अव्वल दर्जाच्या विचारवंतांनी केलेली समीक्षा, तीमधून समान दर्जाच्या पहिल्या - दुसऱ्या श्रेणीतल्या विचारवंतांमध्ये चालणारी चर्चा, वादंग याचे फार महत्त्व आहे असे मला दिसते. याचा मराठीत जवळपास अभाव आढळतो. अशीच अनेक वर्षे व्यथित करीत आलेली आणखी एक गोष्ट म्हणजे, कसदार वैचारिक लेखन करण्याची कुवत असलेल्या व्यक्ती अनेकदा मोठ्या खपाच्या दैनिकांमधून - साप्ताहिकांमधून स्तंभलेखन करण्याचा प्रस्ताव स्वीकारतात, पण त्या प्रकारचे त्यांचे लेखन जुजबी, चटपटीत, प्रदर्शनी होताना आढळते. आता, वृत्तपत्रांमधील लेखन त्यांचा सामान्य वाचकवर्ग डोळ्यासमोर ठेवून केले जाते याचे समर्थन करता येईल. माझी तक्रार अशी की, ही मंडळी स्वतःहोऊन, त्याचवेळी कसदार लेखन मराठीमधून सातत्याने करीत आहेत








आणि एक वैचारिक वातावरण निर्माण करण्याचीही जबाबदारी पार पाडीत आहेत असे दिसत नाही.

एका वेगळ्याच अंगाने एक मुद्दा मांडण्याचा धाडसी प्रपंच मी करणार आहे. समाजपरिवर्तनाला ज्यांची बांधिलकी आहे अशा तरुण- प्रौढ मंडळींचा एक मोठा वर्ग महाराष्ट्रात आहे. मार्क्सवादी, समाजवादी, सेक्युलर, पुरोगामी, आंबेडकरवादी असे त्यांचे वर्णन ते स्वतःही करीत असतात. यांनी परिवर्तनकारी अनेक चळवळी केल्या आहेत, कार्ये उभारली आहेत. महाराष्ट्रात या सर्वांची मिळून एक 'जमात' ही आहे असे म्हणण्याइतकी मोठी संख्या आहे. 'विषमता निर्मूलन परिषद' हे यांचे सामयिक व्यासपीठ अनेक वर्षे होते. अलिकडे 'विचारवेध संमेलन' भरत आहे ते मुख्यत्वेकरून याच मंडळींचे. देशातील व जगातील बदलत्या समाज-स्थितीमध्ये आमूलाग्र परिवर्तनाचे कार्य जोमदार-पणे चालून ते प्रभावी व परिणामकारक ठरण्या-साठी वैचारिक पुनर्मांडणी करण्याची निकड फार मोठी होती व आजही आहे. मार्क्स, फुले, आगरकर, आंबेडकर इत्यादी जे विचारवंत होऊन गेले त्यांच्या विचारांची खोलवर चिकित्सक समीक्षा, कसदार मांडणी याही मंडळीतल्या विचारवंत मानल्या गेलेल्या व्यक्तींकडून अपवादा-त्मकच झालेली आढळते. बहुतेकवेळा प्रचारकी, समर्थनपर लेखन होते किंवा या दिवंगत विचारवंतांच्या लेखनाचा अनुवाद (पॅराफ्रेज) स्वतःच्या भाषेत केलेला असतो.

'हिंदुत्ववादी' गोटातही काही वेगळी स्थिती आढळत नाही. भारतीय समाजाच्या उत्थानासाठी 'हिंदुत्वा'च्या अधिष्ठानावर समाजाची उभारणी करावयास हवी, असे मानणारा जो 'संघपरिवार' आहे त्याचेही वैचारिक लेखन वैचारिक कसाच्या दृष्टीने फार दुबळे आहे.

समाजकारण, राजकारण, अर्थकारण यांना जिवंत कसदार विचारांची बैठक फारशी नाही. भरवसा, लोकांची झुंडशक्ती वा आर्थिक सत्तेमधून हाती असणारी सत्ता वा राज्यसत्ता यांच्यावर मदार आहे, हे चित्र दिसते. यात मग काही नवल नाही. टीका गणपती वा सरस्वतीवर असो, फुले- आंबेडकरांवर असो, की शिवाजी महाराज, शाहू छत्रपतींवर असो वा सावरकर-गोळवलकरांवर असो, वैचारिक मुकाबला करण्यापेक्षा टीका करणाऱ्याचे तोंड बंद करण्याची व हातपाय कलम करण्याची भाषा पुढे येते हे आपण परत परत अनुभवले आहे.

'प्रस्थापित' ही वैचारिकदृष्ट्या परावलंबी व परिवर्तनवादीही परावलंबी. दोघेही वैचारिकदृष्ट्या दुबळे आणि वर आपले परावलंबित्व व दुबळेपण न ओळखणारे, आत्मसंतुष्ट असे एकंदरीत चित्र दिसते.



महाराष्ट्राला मराठीमधून विचार मांडणारे समर्थ विचारवंत पुरेशा संख्येने मिळाले असते तर मराठी समाजाला आजची सर्वांगीण अवकळा प्राप्त झाली नसती असे विधान करता येईल का? पण मग असेही मनात येते की, स्वातंत्र्य मिळाल्या-नंतरच्या पहिल्या वीस एक वर्षांमध्ये तरी समाजाला मार्गदर्शन करू शकणारे काही विचारवंत होतेच. अगदी मोजकी नावे द्यायची झाली, तर, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, आचार्य जावडेकर, आचार्य भागवत, धनंजयराव गाडगीळ, दि. के. बेडेकर, गं. बा. सरदार, गोवर्धन पारीख यांची नावे तरी समोर येतात. नवभारत मासिकाचे जुने अंक चाळले तर आणखी पंधरा- वीस नावांची तरी भर घालता येईलच. तरीही, संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतरच्या काळात विचारवंत निष्प्रभ का ठरत गेले? ते परिघावर का ढकलले गेले? संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर मराठी समाज व मराठी भाषा यांचे उत्थान घडून येण्याऐवजी, कर्तृत्वाला बहर येण्याऐवजी तिथून ऱ्हासाला सुरूवात झाली अशी भावना आज का होते? श्री० यशवंतराव चव्हाणांच्या नेतृत्वाखाली आणि सहकारी साखर कारखाने व एकंदरीत सहकारी चळवळ, शिक्षणाचा वेगाने प्रसार, पंचायत राज्याचा आरंभ, कारखानदारी उद्योग-धंद्यांची वाढ, शहरीकरणास प्राप्त झालेला वेग यांच्या रूपाने एका नव्या समर्थ महाराष्ट्राची उभारणी होत आहे असे चित्र १९६० नंतर आठदहा वर्षे निर्माण झाले. पण याच काळात समाजकारण, राजकारण, अर्थकारण आणि विचार यांचा अनुबंध तुटण्यास आरंभ झाला. भारतीय राज्यघटना हाताशी आहे, आर्थिक विकासासाठी पंचवार्षिक योजना आहेत, महाविद्यालये- विद्यापीठे - राष्ट्रीय प्रयोगशाळा यांची उभारणी होतेय, आता विचार-

वंतांचे कामच काय, असा काहीसा समज झाला, आणि जो काही विचार करायचा तो आपण, अशी सनदी नोकरशाही व विषयातील तज्ज्ञ मंडळींची भूमिका राहिली, असे म्हणता येते का?

प्रश्न असा पडतो की, विचारवंतांनी स्वतःला या परीघावर ढकलले जाण्याच्या, निष्प्रभ बनविले जाण्याच्या प्रक्रियेला संमती का दिली, बंडखोरी का केली नाही? खरी गोष्ट अशी की, आपणास मध्यवर्ती व महत्त्वाचे स्थान दिले जात आहे, आपण सत्तेच्या आश्रयाने का होईना पण, प्रभावी बनत आहोत अशीच या वर्गाची भावना झाली. आयोग, सरकारी समित्या, विद्यापीठे. योजना आयोग, राज्य व केंद्रीय प्रशासन, वेगवेगळी मंडळे यांच्यावर या वर्गातील मंडळींना सन्मानाने बोलावले गेले, पदे दिली गेली. महाराष्ट्रात यशवंतराव चव्हाणांनी राज्य पातळीवर साहित्य आणि संस्कृती मंडळाची स्थापना करून तर्कतीर्थांना अध्यक्षपद बहाल केले. पहिली काही वर्षे अनेक अग्रगण्य विचारवंत मंडळी या मंडळावर होती. विश्वकोश निर्मितीचा महाप्रकल्प हाती घेण्यात आला. हे एक ठळक उदाहरण. पण इतरही अनेक उदाहरणे देता येतील. पण मग याच प्रक्रियेचा विपरीत परिणाम का घडून आला?

दोन कारणे मला दिसतात. पण आणखीही असणार. एक विचारवंत राज्यसत्तेच्या आश्रयाला गेले; पण आश्रय हा शब्द खटकत असेल तर, राज्यसत्तेच्या द्वारा आपले कार्य पार पाडण्याचा निर्णय त्यांनी केला. त्यांनी स्वतःला विकले असे मला म्हणावयाचे नाही. तसे म्हणणे सत्याला धरून नाही. पण ही हातमिळवणी विचारवंतांचे सत्त्वहरण करणारी ठरली. सत्ता व पदे यांचे त्यांना महत्त्व वाटले आणि जेव्हा पं. नेहरूंच्या निधनानंतरच्या काळात विचारवंतांबरोबरचे समीकरण राजकारणी व नोकरशहा यांनी बदलले तेव्हा यांच्यापैकी फारच थोड्यांनी अर्थपूर्ण बंडखोरी केली. दुसरे कारण असे की, परदेशामध्ये झालेला व तिथे प्रतिष्ठित असलेला विचार भारतात प्रसृत करण्याचे, मुख्यतः वाहकाचे व प्रचारकाचे काम या काळात करणे महत्वाचे मानले गेले. मराठी विश्वकोशाचे कार्य गेली तीसपस्तीस वर्षे चालले आहे आणि एव्हाना पंधरा खंड प्रसिद्ध झाले आहेत. कोणत्याही मापदंडांवर मूल्यमापन केले तरी ही प्रचंड कामगिरी आहे. पण प्रश्न असे की, एवढे वैचारिक कार्य पार पाडूनही मराठी समाजाचा वैचारिक- बौद्धिक स्तर का घसरला? विचारवंत नावाची एक शक्ती या प्रक्रियेमधून का उदय पावली नाही? विचारवंतांचा एक समुदाय (कम्युनिटी) का आकारला आला नाही? विचारांच्या क्षेत्रात श्रेष्ठ मानदंड का प्रस्थापित झाले नाहीत? वैचारिक ऊर्जेचा स्फोट का झाला नाही? याचेही कारण वर सूचित केले ते नाही काय? इतकेच नाही, किंबहुना असेही म्हणता येईल की ज्या प्रमाणात या काळातल्या विचारवंतांचे कार्य प्रभावी व परिणामकारक ठरले तेवढा मराठी समाज वैचारिकदृष्ट्या जास्तच परावलंबी व दुबळा बनला आहे.



विचारवंत समाजाचे उत्थान घडवून आणू शकतात का? मोठी उलथा - पालथ घडवून आणू शकतात का? समाजाला वळण देऊ शकतात का?

अशी काही शक्ती साहित्यिकांच्या ठायी व साहित्यात नसते, समाज बदलविणाऱ्या शक्ती या मुख्यतः आर्थिक - राजकीय असतात, असे उत्तर आपणास परिचित आहे. आपल्याकडे इतके व असे गौणत्व घेणे साहित्यिकांना सोयीचे वाटते. विचारवंत वर्गाला तसे म्हणणे अवघड जाईल. कारण, विचारवंत असणे म्हणजेच समाजाचे मार्गदर्शक असणे ही त्यांचीही धारा असते व ही भूमिका ('रोल') त्यांना प्रिय वाटते. ती त्यांचे महत्त्वही वाढविणारी असते.

राज्यकर्ते, समाजधुरीण आपले मार्गदर्शन घेत नाहीत, आपला पुरेसा मान राखीत नाहीत अशी तक्रार असण्याची शक्यता जास्त. तसेच, या वर्गापैकी ज्यांची काही कारणाने राज्यकर्ते निवड करीत असतील त्यांच्याबद्दल हेवा, मत्सर वाटतो, असेही आढळण्याची शक्यता. तर्कतीर्थांच्या वाट्याला या गोष्टी एकेकाळी आल्या असणार.

ते असो, पण विचारवंत (साहित्यिक, कलावंत, शास्त्रज्ञही विचारवंत होऊ शकतातच, आणि इतरही अनेक) ही एक स्फोटक व प्रबळ शक्ती बनू शकते. याची उदाहरणे आपण आपल्या स्वातंत्र्यलढ्याच्या पर्वातीलही देऊ शकतो. पण पूर्व युरोप व सोविएत रशिया या देशांचे उदाहरणही देऊ शकतो.

विचारांची शक्ती असते तशी अविचारांचीही शक्ती असते. झुंडीचा, जमावाचा हिंस्त्र उन्माद वापरून घेणे सापेक्षत: सोपे झालेल्या लोकशाही-च्या काळात आज आपण वावरत आहोत. लोकशाहीचे हे रूप गेली दोनशे वर्षे जोपासले गेले आहे. अविचारी लेखन - भाषण करून, हिंस्त्र, उन्माद जागा करून स्वत:ची साध्ये गाठण्याचे समाजकारण - राजकारण आज लोकप्रिय आहे.

अशा समाज संस्कृतीत व वातावरणात विचारवंत ही समाजाचा क्रांतिकारक वा सुधारक विधायक पुरुषार्थ जागृत करणारी शक्ती असते यावर विश्वास बसणे, वा टिकून राहणे, कठीण आहे हे खरे. पण जर ही श्रद्धा नसेल व विचारांच्या कार्यावर निष्ठा नसेल तर मग अशी व्यक्ती विचारवंत उरत नाहीत.

विचारवंत ही भूमिका पार पाडून समाजात शक्ती उत्पन्न करावी, लोकांची बांधणी करावी, चळवळ उत्पन्न करावी अशी ईर्षा असलेल्या व्यक्ती आहेत. एरवी विषमता निर्मूलन परिषद वा विचारवेध संमेलन यासारखे उपक्रम होतेच ना.

इथे मला प्रा. भालचंद्र नेमाडे जो देशी-पणाचा आग्रह राखतात त्याचे महत्त्व जाणवते. आजही जर बारकाईने पाहिले तर, जे केवळ मराठी भाषा वापरीत नाहीत तर ज्यांचे विचार मराठी समाजाच्या व साहित्याच्या इतिहास परंपरेशी जैव नाते जोडून मांडले जातात त्यांना वेगळ्या पातळीवरून व प्रमाणात प्रतिसाद मिळतो असे दिसते. हे ओळखून एक चतुर, चलाखी डावपेच रणनीती म्हणून स्वत:च्या विचारांना धार्मिक - सांस्कृतिक पारंपरिक साज चढविणेही केले जात आहे. पण तरी वरील वस्तुस्थिती कायम राहते.

देशी विचारवंतांचे काही नमुने आपणासमोर आहेत. ते एकसारखे नाहीत. त्यांच्यात वैविध्य आहे. 'देशी' या शब्दाची अधिक स्पष्टता व्हावी या दृष्टीने यांचा विचार व्हावा. न्यायमूर्ती रानडे, लोकमान्य टिळक, कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे, महात्मा जोतीराव फुले, सुधारकाग्रणी आगरकर, आचार्य जावडेकर, दिं. के. बेडेकर, आचार्य विनोबा भावे, संत तुकडोजी महाराज, संत गाडगेमहाराज वगैरे. भारतीय पातळीवर स्वामी दयानंद सरस्वती, स्वामी विवेकानंद, कविवर्य रवींद्रनाथ टागोर, महात्मा गांधी, चक्रवर्ती राजगो[illegible]पालाचारी वगैरे. बौद्ध धर्माची दिक्षा घेऊन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी देशी विचारवंत होण्याचे आयुष्याच्या अगदी अखेरीस ठरविले हे भारताचे दुर्दैव होय.

वर जी नावे घेतली आहेत त्यापैकी बहुतेकांवर त्यांच्या काळात पाश्चात्य विचार प्रवाहांचा खोलवर प्रभाव पडला होता, त्यांचा त्या विचारप्रवाहाशी चांगला परिचय होता. ही गोष्ट त्यांच्या देशीपणाच्या आड आली नाही. उलट देशाला एका वेगळ्या मुशीत घडविण्यासाठी त्याचा उपयोग झाला.

देशी, देशीपण हे शब्द खुळखुळ्यासारखे वाजवीत राहण्यासाठी वापरावयाचे शब्द बनता कामा नयेत. यांची नेमकी व खोलवर स्पष्टता करून घेण्याची आवश्यकता व निकड आहे. देशीपणाचा एक भाग असा, की ज्या समाजाचे तुम्ही असता त्या समाजाच्या बांधणीविषयी एक आंतरिक जाण, सहानुभाव व आदर आत्मीयतेपोटी तुमच्या ठायी असतो. त्या समाजातील महत्त्वाच्या सामाजिक संस्था, रितीरिवाज, रूढी, श्रद्धा, अंधश्रद्धा इत्यादींवर प्रखर टीका करीत असता-नाही, त्या बदलण्याचे प्रयत्न करीत असतानाही तो इतिहासपरंपरा असलेला, संस्कृती असलेला समाज आहे व तो आपला आहे ही भूमिका कायम राहते.

**देशी म्हणजे पुनरूज्जीवनवादी, सनातनी, 'जुने ते सोने' म्हणणारा नव्हे; हे सांगावयास नको.**

**विचारवंत मंडळींचा मराठी समाजातील जनसामान्यांशी मनोमन असा आत्मीयतेचा, आदराचा, सहानुभवाचा संबंध आहे का असा प्रश्न पडतो. ग्रामीण भागातून आलेल्या, अद्यापिही अनेक अंगांनी गावंढळ राहिलेल्या, पण राज्यकर्ते बनलेल्या वा साखर कारखाने वा इतर उद्योगांच्या, बागायती शेतीच्या आधारे धनिक बनलेल्या पुढाऱ्यांचे विचारवंत प्रसंगी कौतुक करीत, त्यांना आश्रयदात्यांची भूमिका बहाल करतात, लाभ पदरात पाडून घेतात. पण एरवी मनापासून ते रमतात ते पांढरपेशा, सुशिक्षित वर्गात आणि या वर्गाने जनसामान्यांपासूनचे स्वत:चे अंतर वाढविण्याचीच गोष्ट चालविली आहे. इंग्रजी माध्यमाच्या शाळा, परदेशी जीवनशैलीचे जमेल तेवढे अनुकरण करणारी जीवनशैली, रंजनाची माध्यमे व प्रकार ही सर्व याची साधने आहेत.**



एकंदरीने, विचारवंत म्हणून ओळखले जाणारे व स्वत:ही स्वत:ला विचारवंत म्हणवून घेणारे, अशांचा जो वर्ग आहे त्याची स्थिती व अवस्था काही शोभादायक नाही. समाजाशी असलेले त्यांचे नातेही जुजबी व उपरे आहे. समजा ही सारी मंडळी लिहायचे- बोलायचे थांबली तर? सुशिक्षित, पांढरपेशा, उच्च मध्यमवर्गाचे काही बिघडेल? त्यांच्या पानातले एक तोंडी लावणे कमी झाले, किंवा एक प्रकारची करमणूक उरली नाही असे बहुधा होईल. राज्यकर्ते, समाजधुरीण यांना अलिकडे भाषणे लिहून द्यायलाही विचारवंत लागत नाहीत असे दिसते. जनसामान्यांपासून यांची नाळ तुटलेली आहे. अगदीच फटकळ माणूस असेही जर म्हणाला की, 'आजचा विचारवंतांचा वर्ग हवा कशाला, काय मोठे असे योगदान त्याचे समाजाला आहे', तर, काही सन्माननीय अपवाद वगळता, त्याचे म्हणणे खोडून काढणे शक्य आहे का?

ही काही चांगली स्थिती नाही. कारण विचारवंतांचा एक सक्रीय वर्ग नसला, समाजाला जागे करण्याचे, ठेवण्याचे काम करणारा, समाजात नीतीमत्तेचे, गुणवत्तेचे, सच्चेपणाचे मानदंड निर्माण करण्याचे व टिकवून धरण्याचे काम पार पाडणारा, समाजहिताचे प्रश्न व समाजापुढील आव्हाने सतत डोळ्यांपुढे धरणारा वर्ग नसला तर समाजाचा निश्चितच ऱ्हास होतो. तसा तो आपल्या डोळ्यां देखत झालेला आहे, त्याला एक वेगही आला आहे.

**विचारांच्या क्षेत्रात लहानमोठे कार्य करणाऱ्या, विचारांविषयी आस्था असणाऱ्या मंडळींनी विचारांच्या क्षेत्रातील शोचनीय परिस्थिती सुधारण्याचे काम अंतर्मुख होऊन प्रथमत: हाती घ्यायला हवे आहे. ही गोष्ट विचारवंतांची एक संघटना बांधून वा पक्ष स्थापन करून मागण्या सादर करून व त्या पदरात पाडून घेण्याचे राजकारण करून साध्य होणारी नाही. वैयक्तिक व छोट्या समूहांच्या पातळीवर चोख, कसदार विचार करायास लागणे हा एक मार्ग आहे. आपल्या सह-विचारवंतांच्या वैचारिक कृतींची चोख समीक्षा करणे, व एक अंतर्गत जिवंत चर्चा उपस्थित करणे हा दुसरा मार्ग आहे. लोकांमध्ये जाऊन विचार त्यांच्यासह करणे हा तिसरा मार्ग आहे.**

❖ ❖ ❖

## प्रलय-प्रभव

| | |
|---|---|
| जडातील | जीवातील |
| एक अणू | एक अणू |
| अणू अणू | अणू अणू |
| साधा अणू १ | साधा अणू १ |
| | |
| अणू आत | अणू आत |
| विश्वे सात | विश्वे सात |
| अणू आत | अणू आत |
| वज्राघात २ | जगन्नाथ २ |
| | |
| विभाजन | विभाजन |
| संयोजन | संयोजन |
| संयोजन | संयोजन |
| विभाजन ३ | विभाजन ३ |
| | |
| फुटे अणू | फुटे अणू |
| उठे रण | उठे मन |
| दारी उभा | दारी उभे |
| प्रभंजन ४ | संजीवन ४ |

**- देवदत्त दाभोलकर**
(पूर्वप्रसिद्ध : नवभारत)

**सहज**
**अनुस्मरण**
**११ सप्टेंबर**
**२००१ : अमेरिका**
**१९०६ : दक्षिण आफ्रिका**











# सामाजिक प्रयोगातील सर्जकता व प्रयोगाच्या मर्यादा

वसंत पळशीकर

सांसदीय लोकशाही आणि आर्थिक विकासाचे व कल्याणकारी कार्यक्रम यांच्या विषयीच्या भ्रमनिरासामधून १९७० च्या आसपास देशामध्ये तरुणांमध्ये नवे विचारप्रवाह निर्माण झाले. शासन आणि प्रस्थापित राजकीय पक्ष समाजवादाच्या प्रस्थापनेची भाषा बोलत असले तरी व्यवहारात तळागाळाच्या लोकांचे दैन्यदारिद्र्य वाढत आहे. त्यांचा सहभाग राज्यव्यवस्थेत मतांचा सौदा करण्यापुरताच आहे, आणि राज्यसत्ता काबीज करण्याच्या राजकारणातच क्रांतिकारी म्हणविणाऱ्या पक्षांचीही सारी शक्ती खर्ची पडत आहे, याचा विदारक प्रत्यय येण्यामधून हा भ्रमनिरास उत्पन्न झाला होता.

भूदान-ग्रामदानाच्या सर्वोदय आंदोलनाचा तरुणांमधील प्रभाव अतिशय क्षीण झाला होता; त्यांच्या लेखी ते आंदोलन बदनाम झाले होते असेही म्हणण्यास जागा आहे. सांसदीय लोकशाहीवर एकांतिक निष्ठा असलेल्या 'लिबरल' विचारप्रणालीचा भारतात कधीच प्रभाव नव्हता. घटनात्मक सनदशीर मार्गांच्या चौकटीत चळवळी चालवाव्यात, कायदा मोडणाऱ्या कृती करू नयेत ही आपली राजकीय संस्कृती नव्हती; गांधींच्या सत्त्याग्रहामुळे आणि त्यांच्या शिकवणुकीमुळे कायदेभंगास प्रतिष्ठित बनविणारी राजकीय संस्कृती येथे रुजलेली होती. या साऱ्या गोष्टी लक्षात घेता, १९६७-६८ नंतरच्या काळात मार्क्सवादी विचारप्रणालीचा प्रभाव परिवर्तनकारी समतावादी विचारांच्या तरुणांवर राहिला आहे या घटनेचे आश्चर्य वाटत नाही.

मार्क्सवादाचा प्रभाव होता (व आजही आहे) म्हणजे नेमके काय? तर, या देशात संसदीय लोकशाहीच्या - निवडणुकीच्या राजकारणाच्या - मार्गाने क्रांतिकारक परिवर्तन घडून येणार नाही त्यासाठी तळागाळाच्या लोकांचा व्यापक उठाव व्हावयास हवा, असा उठाव क्रांती घडवून आणील; आणि ही क्रांती अंतिमतः सशस्त्रच असेल, या तीन गोष्टी त्यांच्या मनात पक्क्या होत्या. चिनी क्रांती व माओने मार्क्सवादात केलेली सुधारणा यांच्या प्रभावाखाली हे तरुण होते. भारतात, ग्रामीण भागातील, तेही दुर्गम डोंगरी व जंगली भागातील पीडित व वंचित जनसमुदाय संघटित व समर्थ बनविता आले तर क्रांतीची वाट मोकळी होईल अशी हवा निर्माण झाली होती. पश्चिम बंगालमध्ये नक्षलवादी भागात जमीनदारांची कत्तल करून जमिनी बळकावण्याची, 'मुक्त क्षेत्र' स्थापना करणारी अल्पजीवी चळवळ या सुमारास झाली. फ्रान्समध्ये विद्यार्थ्यांनी बंड केले आणि क्षणिक काळ का होईना, द गोलसारख्या सर्वशक्तिमानाचा यशस्वी आभास निर्माण केलेल्या मुत्सद्यास नमविले, तेही याच सुमारास. जगभर विद्यापीठांमधून विद्यार्थ्यांच्या आक्रमक चळवळींना या दिवसांत उधाण आल्यासारखे झाले होते. अमेरिकेत निग्रोंच्या चळवळीने आक्रमक, सशस्त्र पवित्रा घेतला होता. भारतामधील प्रस्थापितां विरुद्ध बंडखोरी करू पाहणाऱ्या तरुणांचे मानस घडविण्यात या घटनांचा वाटा मोठा होता.

तत्कालीन राजकीय पक्ष वा संस्था, संघटना यांच्या कार्याचे या तरुणांनी विश्लेषण केले तेव्हा त्यांना असे आढळले की, (१) लोकांचा या कार्यामध्ये कर्तेपणाने सहभाग नाही. त्यांची भूमिका (रोल) मेंढरांची आहे : आदेशाचे पालन करावयाचे ; (२) लोकांच्या नावाने कार्य चालत असले तरी पक्ष वा पुढारी यांच्या सत्ताकांक्षेसाठी लोकांना वापरून घेणे या मर्यादेत ते चालते; (३) सर्व प्रस्थापित पक्ष व संघटना वृत्तीने मध्यमवर्गीय असलेल्या पुढाऱ्यांच्या हाती आहेत : खऱ्याखुऱ्या लोकक्रांतीची त्यांना धास्तीच आहे.

सरळ सरळ तळागाळाच्या लोकांमध्ये जाऊन त्यांची जागृती करून संघटना करण्याची आकांक्षा अनेक तरुणांनी बाळगली. मध्यम-वर्गामधून ते सहसा आलेले होते. मध्यमवर्गीय राहणीमान टाकून देऊन ज्यांच्यात आपण काम करणार त्या मजुरांचे, आदिवासीचें








राहणीमान पत्करण्याची, त्यांच्याशी समरस होण्याची उत्कटता त्यांच्यामध्ये होती. अशा तरुणांबद्दल लिहावयाचे म्हटल्यावर महाराष्ट्रात तरी, धुळे जिल्ह्यातील शहादे भागात १९७०-७१ साली व त्यानंतरच्या काळात गेलेल्या तरुणांची आठवण चटकन होते. त्यांनी आपल्या कामातून अनेक तरुणांना प्रेरणा दिली, एक नमुना समोर ठेवला. तेव्हा त्यांची आठवण व्हावी ही गोष्ट स्वाभाविकच आहे.

२

दलित, शेतमजूर, आदिवासी, शहरातून झोपडपट्ट्यांत राहणारे लोक, असंघटित कामगार, विद्यार्थी, स्त्रिया यांच्यात काम करणारे सत्तर-पंचाहत्तर किंवा अधिकच लहानमोठे गट महाराष्ट्रात आहेत. डाव्या विचारप्रणालीच्या पक्षां-विषयी, कामगारसंघटनांविषयी, मोठ्या संस्थां-विषयी यांपैकी बहुतेक गटांना अधिक जवळीक वाटते. तरीही आपली वेगळी अस्मिता मिटवून त्यांच्यात सामील व्हावे, त्याचाच एक भाग बनून जावे असे त्यांना वाटत नाही. वैयक्तिक पातळीवर पक्षामध्ये वा कामगारसंघटनेमध्ये प्रवेश केल्याची अर्थातच अनेक उदाहरणे आहेत. पण आजही परिस्थिती अशी दिसते की साहसी, लढाऊ वृत्तीच्या, अधिक चिकित्सक व डोळस तरुणांना आजच्या डाव्या पक्षांचे आकर्षण वाटत नाही, त्यांचे मन तेथे रमत नाही, त्यांच्या चिकित्सक बुद्धीचे समाधान होत नाही. आपल्यासारख्या आणखी चारसहा तरुणांना गोळा करून स्वतंत्र गट करावा आणि स्वतंत्रपणे काम सुरू करावे; ही गोष्ट त्यांना जास्त पसंत पडते.

दुसऱ्या बाजूला, विखुरलेले, फुटकळ गट असेच यांच्यापैकी बहुतेकांचे स्वरूप काही वर्षांच्या कामानंतरही राहते. समर्थ लोकसंघटन उभे राहिले आहे, क्रांतिकारक चळवळ आकाराला आली आहे, प्रस्थापित सामाजिक, आर्थिक व राजकीय जीवनावर त्या त्या ठिकाणचे गट प्रभावी आघात करत आहेत, असे चित्र आढळत नाही. स्थानिक पातळीवर लहान आकाराचे प्रश्न हाती घेऊन ते एका मर्यादेपर्यंत सोडविण्यात त्यांना यश येते. काही काही ठिकाणी व्यापक लोकक्षोभ उत्पन्न झालेला असताना, इतरांनी उपेक्षा चालविली असताना, योगायोगाने तरुणांचा गट जाऊन पोचला, स्थानिक नेत्याशी त्या गटाची तार जुळली आणि एखादा ज्वलंत प्रश्न हाती घेतला गेला असे घडले. शहाद्यात ग्राम स्वराज्य समिती/श्रमिक संघटना व ठाण्यात भूमिसेना जनआंदोलन उभे राहिले. पण तो प्रवेग पुढे राहिला नाही. एक सीमित क्षेत्रात संघटनेचा जोर राहतो, लोकांच्या उपयोगाचे कार्य ती करीत रहाते, पण तिचे स्वरूप स्थानिकच राहते, असे या दोन विशेष नामवंत उदाहरणांच्याही बाबतीत आजचे चित्र आहे.

दोनतीन उदाहरणांच्या आधारे हा पेच आपणास स्पष्ट करता येईल. मुंबईत लोक आता रस्त्यांवर झोपड्या टाकून राहू लागले आहेत. मुंबईसारख्या महानगरामधून झोपड्यांतून राहणाऱ्या लोकांची संख्या व तिचे महानगरातील एकूण लोकसंख्येशी असलेले प्रमाण वाढत आहे. पण या लोकांना घरे मिळवून देणे, एकंदरीतच या प्रकारे महानगरांची वाढ होण्याचे थांबविणे, हा प्रश्न कोणत्याही राजकीय पक्षाने प्रमुख प्रश्न म्हणून हातात घेतला असल्याचे दिसत नाही. हीच गोष्ट ग्रामीण भागांमधील रोजगार हमी योजनेची दिसते. रोजगार हमी योजनेची राबवणूक व तिच्या आधारे तळच्या शेतकरी - मजुरांचे संघटन व त्यांची चळवळ हे आपले एक मुख्य कार्य बनविण्यात राजकीय पक्षाला यश आलेले नाही, भारत सरकार नवे वनविधेयक लोकसभेत सादर करण्याच्या बेतात आहे. पण त्याहीविरूद्ध कोणता एक राजकीय पक्ष उभा आहे असे चित्र आढळत नाही. ही केवळ तीन उदाहरणे झाली. निवडणुका जिंकण्याच्या वा सत्ता राखण्याच्या वा पक्ष टिकवून धरण्याच्या राजकारणात सर्व पक्ष इतके फसलेले दिसतात की लोकांचे प्रश्न सातत्याने हाती घेऊन परिवर्तनाची चळवळ उभारण्याची सवड त्यांना नाही. पण इथेच मामला थांबत नाही. तळा-गाळाच्या लोकांचे - मग ते आदिवासी असोत की शेतमजूर असोत की दलित असोत की आणखी कोणी असोत - प्रश्न सातत्याने हाती घेण्यास राजकीय पक्ष असमर्थ ठरत चाललेले दिसतात. इतकेच काय पण मुंबईतील कापड गिरणी कामगारांचा संप आज इतके महिने कुजत पडलेला आहे. तेथेही राजकीय पक्ष हतबलच ठरले आहेत.

राजकीय पक्षाची चौकट व कार्यपद्धतीच ही असमर्थता निर्माण करते असे म्हणून, सरळ लोकांचे प्रश्न हाती घेऊन जनसंघटन व आंदोलन उभारण्यात गटही

असमर्थ ठरले आहेत. संसद-बाह्य अनौपचारिक, लढाऊ मार्गाचा अवलंब करूनही समाजव्यापी क्रांतिकारक परिवर्तनाच्या दिशेने पाऊल पुढे पडत नाही. 'आपण इतकी वर्षे काम करूनही स्थानिकतेच्या मर्यादा भेदून व्यापक बनू शकलो नाही, मग केंद्रीय राजसत्ता उखडणाऱ्या राज्यक्रांतीचे काय?' - असा प्रश्न भेडसावू लागल्याने काही गट स्वत:ला त्याच जुन्या वळणाच्या राजकीय पक्षांशी संलग्न करून घेण्यापर्यंत आले आहेत.

व्यापक, क्रांतिकारक परिवर्तनाचे साधन कोणते, याचा मार्ग कोणता ? याचा शोध तरुणांचे गट घेत आहेत. आपल्यातले प्रवाहीपण, चैतन्य, उल्हास कमी कमी होत आहे. आपलीही एक चाकोरी बनत आहे. याचे भान कार्यकर्त्यांना आहे.

राजकीय पक्ष व सत्तासंपादनासाठी निवडणुकांद्वारे त्यांचे चाललेले राजकारण यांच्यापासून कटाक्षाने वेगळे राहून परिवर्तनासाठी लोककारण करणारे गट हे विखुरलेल्या अवस्थेत, आपापल्या जागी एकेकटे काम करीत असल्याने त्यांचा प्रभाव समाजस्थितीवर पडत नाही असेही विश्लेषण अनेकांनी केले. अशा गटांना एकत्र आणण्यासाठी, त्यांच्या कार्यात सुसूत्रपणा आणण्यासाठी काही प्रश्नांवर त्यांनी संयुक्त कृती/चळवळ करून प्रभाव पाडण्याचा प्रयत्न करावा यासाठी गेल्या दोनतीन वर्षांमध्ये महाराष्ट्रात प्रयत्न केले गेले. पण या प्रयत्नांमध्ये आजवर यश आलेले नाही. आपापल्या स्वतंत्र अस्मितेच्या कोषातून बाहेर पडण्यात या गटांना यश येत नाही ; उलट, एका गटाचे तुकडे होऊन आणखी लहान गट निर्माण होण्याची प्रक्रिया आढळते.

३

परिवर्तनाच्या प्रक्रियेसंबंधीची या गटांची धारणा त्यांच्या कार्याच्या आड येत आहे असे प्रस्तुत लेखकास वाटते. हा मुद्दा स्पष्ट करण्याचा प्रयत्न उरलेल्या लेखात करण्याचे योजिले आहे.

आजवरच्या राज्यक्रांत्या आणि मार्क्सवादी विचारप्रणाली (त्यांना जशी समजली तशी) यांच्या प्रभावाखाली एक प्रक्रिया या तरुणांनी गृहीत धरलेली आढळते. देशव्यापी उठाव, राज्यसत्तेच्या सर्व प्रमुख केंद्रांवर ताबा आणि प्रतिक्रांतिकारक शक्तीचे उच्चाटन व निर्मूलन या प्रकारची राज्यक्रांती त्याना अभिप्रेत आहे. अशी राज्यक्रांती सशस्त्र होईल असा त्यांचा ठाम विश्वास आहे.

देशव्यापी उठाव म्हणत असताना त्यांच्या-समोर जनता पेटून उठल्याचे रोमँटिक चित्र डोळ्यासमोर असते. जागृत व संघटित जनतेचा शिस्तबद्ध देशव्यापी उठाव हे आजवरच्या कोणत्याही राज्यक्रांतीचे वैशिष्ट्य राहिलेले नाही. वेगवेगळ्या कारणांनी देशात उत्पन्न झालेल्या प्रक्षोभक परिस्थितीत ठिणगी पडून उद्रेक घडून आल्यावर संघटित शक्तींनी उद्रेकाच्या लाटेवर आरूढ होऊन सत्ताकेंद्रे ताब्यात घेऊन राज्य हाती घेतल्याची उदाहरणे आहेत.

लोकांचा उत्स्फूर्त उद्रेक राज्यक्रांतीला निमित्तमात्र ठरू शकत असला तरी, राज्यक्रांती एक संघटित अल्पसंख्य गट वा पक्ष यशस्वीपणे घडवून आणीत असतो आणि त्या प्रक्रियेच्या शेवटी केंद्रीभूत सर्वंकष सत्ता प्रस्थापित होत असते, या गोष्टी लक्षात घ्यायला हव्यात. ही केंद्रीभूत राज्यसत्ता जनतेचे नाव घेत असली, तरी जागृत वा संघटित जनतेचे स्वायत्त अस्तित्व ती खपवून घेत नाही. अशी जनता तिच्या अधिसत्तेला मूलत: आव्हान देणारी ठरत असल्याने स्वायत्त जन-संघटना निष्ठुरपणे चिरडून टाकणे हा नव्याने प्रस्थापित झालेल्या राज्यसत्तेचा पहिला कार्यक्रम असतो. ज्या जनसंघटना स्वत:स राज्यसत्तेच्या दावणीला बांधून घ्यावयास तयार होतात त्यांना सामावून घेतले जाते, पण मग त्या स्वायत्त रहात नाहीत.

यातली मुद्द्याची गोष्ट अशी आहे की, जागृत व स्वायत्त जनसंघटना ही स्वभावत: स्थानिक व विकेंद्रित शक्ती आहे. तिच्या आधारे केंद्रीय राज्यसत्तेचा लोकांशी संबंध मूलत:च विषम असतो. मग ती केंद्रीय राज्यसत्ता राजेशाहीच्या प्रकारातील असो की सांसदीय लोकशाही असो की क्रांतिकारक साम्यवादी राजवट असो.

सर्व राजकीय पक्ष हे तथ्य जाणून असल्याने ते कायम लोकांना वापरीत असतात; लोकांच्या जागृत व स्वायत्त संघटना उभारल्या जाणार नाहीत याची सदैव दक्षता बाळगतात.

राज्यक्रांतीद्वारा केंद्रीभूत, एकाधिकारवादी राजवट प्रस्थापित करण्यास बद्धपरिकर असणारे राजकीय पक्ष जनसंघटना बांधण्यासाठी लोकांमधे








समरस होऊन काम करण्याच्या सर्व प्रयत्नांना 'पॉप्युलिस्ट' असे संबोधून त्यांचे तीव्र खंडन करीत असतात. राज्यक्रांतीसाठी लोकांशी तादात्म्य पावावयाचे नसते, लोकांना कुशलतेने वापरून घ्यावयाचे असते; लोक जात्याच 'अराज्यवादी' वृत्तीचे असतात; त्यांना विचारप्रणालीची, पक्ष-शिस्तीची, देहदंडाची वेसण घालून कठोर नियंत्रणाखाली ठेवावयाचे असते, या गोष्टी ते जाणतात.

अल्पसंख्य संघटित गटांची सर्वंकष केंद्रीभूत राज्यसत्ता प्रस्थापित करणारी राज्य-क्रांतीची प्रक्रिया आणि जागृत व स्वायत्त जन-संघटनांची उभारणी यांचा परस्परसंबंध अहि-नकुलवत् आहे. त्यांच्यात विळ्याभोपळ्याचे सख्य आहे, ही गोष्ट जनसंघटना बांधण्यास निघालेल्या तरुणांनी पक्की उमगली पाहिजे. राजकीय पक्ष गोरगरीब सामान्य जनतेचे प्रश्न हाती घेऊन, जनतेला जागृत व संघटित करीत नाहीत; राजकीय पक्षांची कार्यपद्धती केंद्रीभूत नोकर-शाहीच्या कार्यपद्धतीशी जुळणारी आहे; हे त्यांचे दर्शन बरोबर होते. हे तरुण प्रांजळ व निरागस होते. त्यांच्या लक्षात आले नाही की, या दोन्ही गोष्टी राजकीय पक्षांनी स्वीकारलेल्या उद्दिष्टांशी अनुरूप अशाच आहेत.

राज्यक्रांतीद्वारा राज्यसत्ता काबीज करून परिवर्तन आणण्यासाठी राज्यसत्तेवरील पकडीचा वापर करून परिवर्तन आणण्यावर विश्वास असणाऱ्यांचे प्रधान लक्ष्य ज्यामुळे सत्ता आपल्या हाती चटकन येईल, कमीत कमी वेळात व परिश्रमाने हाती येईल, त्या मार्गावर व साधनांवर लक्ष केंद्रीत करण्याचे राहणार हे उघड आहे. सर्वसामान्य जनतेला नाही तर वेचक, मोक्याच्या जागी असलेल्या गटांना संघटित करण्यावर अशा संघटना/पक्ष आपली ताकद केंद्रित करीत असतात. समाजात आधीच जे गट शक्तिमान आहेत, वा नव्या बदलामुळे शक्तिमान बनत आहेत, मोक्याची क्षेत्रे व्यापत आहेत, त्यांना संघटित करण्याला स्वाभाविकपणेच अग्रक्रम मिळतो.

तळागाळाच्या, दुबळ्या, असंघटित जनतेची उपेक्षा भारतातील सर्वच डाव्या राजकीय पक्षांकडून सातत्याने होत राहावी ही गोष्ट सुसंगतच आहे हे ध्यानात येते.

तात्पर्य असे की, तळागाळाच्या लोकांमध्ये जाऊन त्यांच्याशी समरस होऊन त्यांच्या संघटना बांधू म्हणणाऱ्या तरुणांच्या गटांनी आपल्या उद्दिष्टांविषयी, भूमिकेविषयी स्पष्टता करून घ्यायला हवी. राज्यक्रांती आणि राज्यक्रांतीनंतर एका शिस्तबद्ध गटाच्या हाती सर्व सत्ता हे त्यांचे उद्दिष्ट असले तर ते चुकीच्या क्षेत्रात आहेत हे त्यांनी ओळखावे. आज महाराष्ट्रातील काही गट वा गटांमधील तरुण, अशी स्वतःची पक्षांबरोबर फेरजुळणी करण्याच्या प्रक्रियेत आहेत.

आत्मपरीक्षणानंतरही आपली निष्ठा लोकांच्या, स्वायत्त व जागृत जनसंघटनांच्या उभारणीला आहे असे ज्यांना आढळेल त्यांनी आजवरच्या राज्यक्रांत्यांचा मार्ग आपला नाही, सांसदीय लोकशाहीमधील निवडणुकांचा मार्गही आपला नाही हे जाणावे.

जागृत व संघटित लोकशक्तीच्या आधारे चालणारी क्रांतिकारक समाजपरिवर्तनाची प्रक्रिया कार्यकर्त्यांचा स्थानिक वा देशव्यापी गट/संघटना नियंत्रित करणार नाही याची कार्यकर्त्यांच्या मनात स्पष्टता नसते. जी संघटनेमार्फत नियंत्रित असते ती स्वायत्त व जागृत लोकशक्ती कशी असू शकेल? लोकशक्तीला 'जागृत' आहे की नाही हेदेखील संघटना ठरवीत असते असा प्रकार व्यवहारात आपण पाहतो. कार्यकर्ते व संघटना 'निधर्मी' असतील आणि लोक जर उत्साहाने नामसप्ताह साजरा करावयास मागत असतील तर लोक जागृत आहेत, क्रियाशील आहेत असे म्हणणे कार्यकर्त्यांना व संघटनेला अडचणीचे जाते. लोक जागृत असावेत, त्यानी स्वतःच्या पुढाकाराने व बुद्धीने परिवर्तनाचे काम करावे असेही म्हणायचे, आणि त्याच वेळी आपण ठरवू व सांगू त्या तालावर लोकांनी आपल्या मागून नाचावे अशीही अपेक्षा बाळगावयाची, असा आजचा प्रकार आहे. या बाबतीत वैचारिक व भावनिक निर्णय होणे फार आवश्यक आहे.

लोकांनी त्यांच्या विचारे, त्याच्या पुढा-काराने वेगवेगळ्या पातळ्यांवरच्या व्यक्तिगत व सामूहिक कृतींच्या द्वारा (ज्यांत आंदोलनेही समाविष्ट असतील) परिवर्तन घडवून आणावे अशी कार्यकर्त्यांची निष्ठा असेल तर, आपल्यापेक्षा लोकांचा विचार वेगळा होऊ शकतो, आणि त्यांचे ध्येय व मार्ग वेगळे असू शकतात, या गोष्टीस कार्यकर्त्याने मोकळ्या मनाने मान्यता द्यावयास अडचण पडू नये.

अनुक्रमणिका

४

वरील भूमिकेवर कार्यकर्ता व गट जर स्थिर असला तर त्याला आपली भूमिका (रोल) कशी दिसेल?

कार्यकर्ता वा कार्यकर्त्यांचा गट यांना स्वत:ची काही विचारप्रणाली व ध्येये असतात. समाजस्थितीचे त्यांचे काही एक विश्लेषण असते. परिवर्तन, तेही आमूलाग्र, का आवश्यक आहे याविषयी त्याचे काही म्हणणे असते. हे सर्व त्यांनी सोडून द्यावे, व 'कोरी पाटी' होऊन लोकांमध्ये काम करावयास जावे अशी अपेक्षा कोणी बाळगू शकत नाही. ती गोष्ट उचितही नाही.

एक क्लृप्ती म्हणून नाही तर निष्ठेचा भाग म्हणून लोकांशी समरस होऊन काम करण्यासाठी असा गट निघतो तेव्हा, लोकांविषयी त्याचा आदर, प्रेम व निष्ठा खऱ्या असतील तर, गटाची भूमिका (ॲप्रोच) काय राहणे आवश्यक आहे? वा स्वाभा-विकपणे गटाची भूमिका काय राहील?

कार्यकर्त्यांचा गट आणि लोक यांच्यात एक शैक्षणिक प्रक्रिया घडेल असे आपण म्हणू. पाऊलो फेअरे (Paulo Friere) यांनी आपल्या पुस्तकां-मध्येही प्रक्रिया काय राहील याची काही स्पष्टता केली आहे. त्याचे मर्म काहीसे पुढीलप्रमाणे सांगता येईल. लोकांच्या ठिकाणी विचारशक्ती असते, त्यांची काही अनुभूती असते, त्यांचीही मूल्यनिष्ठा असते, त्यांनाही ध्येयेआकांक्षा असतात. समाज-स्थितीचे त्यांचेही काही आकलन व विश्लेषण असते. अपले ज्वलंत व निकडीचे प्रश्न कोणते, व ते कसे सोडवले पाहिजेत याविषयी काही समज असते. वगैरे वगैरे. सारांश, त्यांच्यापाशी ज्ञान, दृष्टी, समज या गोष्टी असतात. अर्थातच त्या पूर्ण स्वरूपात नसतात. पण तशा त्या पूर्ण स्वरूपात कोणाजवळही नसतात. पण हे लोक जर तळागाळातले असले तर ते दडपलेले व भयग्रस्त असतात; त्यांनी कटू अनुभवांनी लाचारपणे जुळवून घेण्यातले व्यावहारिक शहाणपण जाणलेले असते. आपल्याजवळचे सारे काही खोलवर दाबून टाकून मूकपणे ते जगत असतात.

कार्यकर्त्यांच्या गटाचे काम दुहेरी असते असे म्हणता येईल. बरोबरीच्या नात्याने त्यांच्याशी संवाद साधणे व त्यांचा हुंकार, उद्‌गार प्रकट करणे, त्यांना बोलते करणे, एका अंगाने विचार केल्यास, त्यांना भयमुक्त करणे हे कार्यकर्त्यांच्या गटाचे एक महत्त्वाचे काम असते. भीती जशी कमी होते तसे खोलवर दाबून ठेवलेल्या भावना उसळी मारून वर येतात; त्यांच्या रांगड्या भाषेत परिस्थितीचे त्यांचे विश्लेषण समोर येते. इत्यादी. पण इथेच ही प्रक्रिया थांबून चालणार नाही. आपल्या भावना, विकार, आपल्या समजुती, आपले विचार, आपली मूल्ये, ध्येये व आकांक्षा, आपल्या चालीरीती व आपले व्यवहार - थोडक्यात प्रत्येकच गोष्टीकडे तटस्थ व चिकित्सकपणे बघून, ती तावून - सुलाखून घेण्याची प्रक्रिया घडली पाहिजे. हे काम कार्यकर्त्यांचा गट कसे पार पाडता याला फार महत्त्व आहे. कार्यकर्त्यांच्या गटाची सामाजिक - सांस्कृतिक पार्श्वभूमी गटाला प्रामाण्य व प्रतिष्ठा प्राप्त करून देणारी असते, कारण समाजाच्या वरिष्ठ थरांमधून सहसा ते कार्यकर्ते आलेले असतात. याचा फायदा उठवून ज्यांच्यात आपण काम करतो त्यांची डोकी धुऊन स्वच्छ करणे (ब्रेन वॉशिंग) आणि आपल्या गोष्टी डोक्यात भरणे शक्य असते व त्याचा विलक्षण मोह पडतो. तो टाळून ज्यामधून लोकांची विचारशक्ती स्वतंत्र राहून क्रियाशील बनेल अशी प्रक्रिया घडली पाहिजे. हे घडून यावयाचे असेल तर लोकांशी संवाद साधीत असताना, समान भूमिकेतून, लोकांचे ज्ञान, दृष्टी, समज, विश्लेषण, ध्येये, इत्यादी इत्यादींनी बनलेल्या विचारव्यूहातले अधुरेपण, त्रुटी, अज्ञान, इत्यादी दूर करण्यासाठी तटस्थ व चिकित्सक वृत्तीने, शिकण्याच्या भूमिकेतून लोकांशी भिडले पाहिजे. थोडक्यात, शैक्षणिक प्रक्रिया लोक व कार्यकर्ते या उभयतांसाठी आहे आणि संवाद ही त्याची पद्धती आहे.

ही शैक्षणिक प्रक्रिया चार भिंतींच्या आड वर्गात घडू शकत नाही. ती दैनंदिन जीवन जगण्याच्या, त्या ओघात उपस्थित होणाऱ्या प्रश्नांना सामोरे जाण्याच्या, ते सोडविण्याच्या ओघातच घडू शकते. लोकांचा विश्वास संपादन करण्यासाठी, त्यांचा विचारव्यूह समजावून घेण्यासाठी, त्यांना (व स्वत:लाही) भयमुक्त करण्यासाठी, आपले शिक्षण करण्यासाठी, आणि द्वंद्वात्मक संवाद प्रस्थापित करण्यासाठी कार्यकर्त्यांचा गट लोकांशी समरस होऊन, त्यांच्याबरोबर राहून त्यांचे प्रश्न हाती घेतो. या भूमिकेत कार्यकर्ते स्वत:लाही सर्वज्ञ समजत नाहीत वा लोकांच्याही ठायी सर्वज्ञता पहात नाहीत. लोक व कार्यकर्ते दोघांचाही स्वत:चा एकेक आरंभीचा

पवित्रा असतो व असणार ही गोष्ट गृहीत आहे. पण उभयतांच्या संवादामधून एक अधिक परिपूर्ण असा पवित्रा घेतला जाईल अशी धारणा हे या भूमिकेचे वैशिष्ट्य सांगता येईल.

लोक हे काही निर्जीव द्रव्य (dead matter) नव्हे. त्यामुळे त्या त्या स्थानिक क्षेत्रातील लोक आणि कार्यकर्त्यांचा गट यातील द्वंद्वात्मक संवादाच्या क्रिया-प्रतिक्रियेमधून (dialectical dialogical inter-action) ज्या स्वायत्त, जागृत जनसंघटना उभ्या राहतील त्यांचा विचारव्यूह अमूक एकच राहील, व तो कायम तसाच राहील अशी हमी कशी देता येणार?

दोन गोष्टींबद्दल आपण अधिक खात्री-लायकपणे सांगू शकतो. कार्यकर्त्यांच्या गटाची मूल्यनिष्ठा व ध्येयाकांक्षा आणि दडपलेल्या, वंचित तळागाळाच्या लोकांच्या ठिकाणची मुक्तीची व अभ्युदयाची आकांक्षा यांच्यातील क्रिया-प्रतिक्रिये-मधून निर्माण होणारी जागृती, संघटना व चळवळ ही समता, स्वातंत्र्य व बंधुभाव या मूल्यांच्या व ध्येयाच्या पूर्ततेच्या दिशेने समाजाला घेऊन जाणारी असेल, ही श्रद्धा कार्यकर्त्यांच्या गटांच्या ठिकाणी असावी लागेल.

५

आपापल्या स्थनिक क्षेत्रात लोकांबरोबर काम करणाऱ्या कार्यकर्त्यांच्या अशा अनेक स्वतंत्र व स्वायत्त गटांच्या कामामधून स्वायत्त व जागृत लोकचळवळी आकारास आल्या तरी कार्यकर्त्यांच्या गटांचे व अशा चळवळींचे देशव्यापी संघटन उभे राहिल्याखेरीज राज्यसत्ता क्रांतिकारक परिवर्तन-वाद्यांच्या हाती कशी येईल, आणि ती जर त्यांच्या हातात येणार नसेल तर नवा समाज साकार कसा होणार?

देशव्यापी संघटन, हाती राज्यसत्ता या दिशेने विचार सुरू झाला, पावले पडू लागली की केंद्रीभूत एकाधिकारवादी राज्यसत्तेच्या प्रस्थापने-चीच आपण शिफारस करीत असतो हे आपण वर पाहिले आहे.

तर मग, व्यापक देशव्यापी परिवर्तनाची आशा सोडूनच द्यावयाची काय?

स्वायत्त जनसंघटनांच्या आधारे नवसमाज-निर्मिती करू इच्छिणाऱ्या गटांनी वेगळ्याच दृष्टि-कोनाचा अंगिकार करण्याची गरज आहे.

आपले कार्य आणि सांसदीय लोकशाही व राजकीय पक्ष यांचा संबंध त्यांनी नीट जाणून घेणे त्यासाठी आवश्यक आहे. पहिली गोष्ट अशी की निकोप सांसदीय लोकशाहीच्या वातावरणात व चौकटीतच अशा गटांचे कार्य चालू शकते हे त्यांनी पक्के जाणले व स्वीकारले पाहिजे. सांसदीय लोकशाही व्यवस्था व तिच्यातील प्रक्रिया यांच्या-विषयी तुच्छभाव बाळगून, त्यांना झिडकारून जन-संघटनाधारित नवसमाजनिर्मितीचे कार्य पार पडू शकत नाही. एका अल्पसंख्य गटाने लष्करी सामर्थ्याच्या व दहशतीच्या जोरावर आपली केंद्रीभूत सत्ता लादून नवसमाजनिर्मिती व्हायला नको असेल तर, नवसमाजनिर्मिती ही आजच्या सांसदीय लोकशाही व्यवस्थेमध्ये आतून बदल होऊन घडून येईल व तशीच ती घडून यायला हवी ही दुसरी गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. कोणत्या तरी एका क्षणी उठाव, त्या क्षणी राज्यक्रांती, व नवसमाजाचा अवतार ही रोमँटिक प्रतिमा भ्रामक, घातक व त्याज्य आहे. जनांच्या स्वयंनिर्णयाने व अभिक्रमाने जर नवसमाजाची उभारणी व्हायला हवी असेल तर ती पुष्कळशी दृष्टिआड चालणार, कारण ती अगणित जागी, अगणित लोकांकरवी चालत राहणार हे समजून घ्यायला हवे.

एखाद्या क्षेत्रात कार्यकर्त्यांच्या गटाने लोकांबरोबर चालविलेल्या कामामधून लोकांची स्वायत्त व जागृत चळवळ उभी राहिली तर अशी चळवळ समर्थ बनत चालल्याचे प्रत्यंतर आपणास कसे येईल? धर्म, साहित्य, कला, शिक्षण, कौटुंबिक जीवन, स्त्री-पुरुष-संबंध, जातपात, आपापसातील तंट्यांचे प्रमाण व त्यांची सोडवणूक, अशा मानवी व्यवहारांच्या विविध क्षेत्रांमध्ये बदल होत असलेले जाणवू लागतील. या प्रभावातून प्रशासन, लोकप्रतिनिधिक संस्था, राजकीय पक्ष ही जीवनाची अंगेही सुटणार नाहीत हे नक्की. जुन्या वळणाने सरकारी कर्मचाऱ्यांना व अधिकाऱ्यांना नेहमीचे शासन वा विकास- योजना चालविता येणार नाही, लोकप्रतिनिधी म्हणून आजच्यापेक्षा वेगळी माणसे निवडून जातील, राजकीय पक्षांना आपली कार्यपद्धती बदलावी लागेल. असे बदल सतत होत राहणे हीच समाजपरिवर्तनाची व नवसमाज निर्मितीची प्रक्रिया आहे. या प्रक्रियेच्या ओघात, एका टप्प्यावर क्रमशः होत गेलेल्या बदलांचा परिणाम म्हणून आजच्या स्वरूपातील










केंद्रीभूत राज्यसत्ता, राजकीय पक्ष, सांसदीय लोकशाही न राहता वेगळीच, आदर्शाच्या अधिक जवळ अशी जनसत्ता प्रस्थापित होईल अशी आपण कल्पना करू शकतो. पण ती बरीचशी कल्पनेतील गोष्ट आज तरी राहणार. अगदी नजिकच्या काळातल्या विविध संभाव्यता आजमावून पुढचे एक पाऊल टाकण्याची कृती सतत करीत राहून परिवर्तनाची प्रक्रिया समता, स्वातंत्र्य व बंधुता साकार करण्याच्या दिशेने गतिमान राहील असा आपला प्रयत्न असावा इतके पुरेसे आहे. माणसाच्या ज्ञानाची व कृतीची ती मर्यादा आहे.

स्वायत्त व जागृत लोकशक्तीच्या अभि-क्रमाने नवसमाजाची उभारणी करण्यास आपण प्रतिबद्ध असलो तर आपणासाठी केंद्रीभूत एका-धिकारवादी ध्येयवादी राज्यसत्तेचा शॉर्टकट उपलब्ध नाही ही गोष्टही कार्यकर्त्यांच्या गटांनी डोळसपणे व मोकळ्या मनाने स्वीकारली पाहिजे. देशव्यापी परिवर्तनासाठी समान मूल्यनिष्ठेच्या आधारे काम करणारे स्वायत्त गट देशभर निर्माण होणे व त्यांनी सातत्याने व कार्यक्षमतेने काम करणे याला पर्याय नाही.

व्यापक आंदोलनांचे एक वेगळे, स्वतंत्र गतिशास्त्र असते ही गोष्टही कार्यकर्त्यांनी विसरता कामा नये. वेगवेगळ्या कारणांनी समाजात प्रक्षोभ उत्पन्न होऊन, कधी कधी तो शिगेला जाऊन पोचतो. अशा वेळी कोणी 'योग्य' आवाहन केल्यास कल्पनातीत सामर्थ्याची व्यापक चळवळ पाहता पाहता आकार घेते व समाज ढवळून काढते. चळवळीचा असा महापूर रोज येत नाही वा कायमचा टिकत नाही. लोकांचा रोजचा संसार असतो, पोटपाणी बघायचे असते.

कार्यकर्त्यांच्या गटाचे काम, स्थानिक क्षेत्रातील कायमस्वरूपी संघटना व त्यांची कार्ये, आणि व्यापक आंदोलने या तिन्हींमध्ये एक परस्पर-संजीवक व अन्योन्याश्रयी संबंध प्रस्थापित झाला तर समाजपरिवर्तनाचे काम विशेष वेग घेते. प्रक्रिया व्यापक बनते. असे घडण्यासाठी समाजाचे नेतृत्व करणारी व्यक्ती उदयास यावी लागेल. या अर्थाने नेतृत्वाचा घटक नेहमीच महत्त्वाचा राहिलेला आहे. पण नेतृत्व प्रभावी होण्यासाठी जागोजाग निष्ठावान व्यक्ती व क्षेत्रीय संघटन यांची गरज असते.

भारतात आज असे नेतृत्व समाजपरिवर्तनाच्या चळवळीस लाभलेले नाही. पण उद्या ते उदयास येणार नाही असे नाही. परिस्थितीही कधी एकदम स्फोटक व अनुकूल बनेल ते भविष्य वर्तविता येत नाही, पण या दोन्ही गोष्टींच्या तयारीत कायम सज्ज असावे लागते. आपापल्या क्षेत्रात अशी सज्जता करीत राहण्याची कामगिरी कार्यकर्त्यांच्या गटांवर येऊन पडत असते. आणि ती त्यांनी श्रद्धेने, चिकाटीने व जागरूकपणे पार पाडायाची असते.



'अथेन्सवासी जनहो,

तुम्ही आता आपापल्या घरी जाल. मी माझ्या फाशीच्या कोठडीकडे जाईन. अधिक चांगल्या मार्गाने कोण गेला हे कदाचित भविष्यकाळच सांगू शकेल.

- सॉक्रेटिस

थोरो व इमर्सन दीड शतकापूर्वीचे समकालीन विश्वविख्यात तत्त्वचिंतक. थोरो अधिक कृतिशील. अन्यायाविरुद्ध उभा राहणारा व शांत वृत्तीने तुरुंगवास सहन करणारा. थोरो असाच एकदा तुरुंगात होता. इमर्सन त्याला भेटावयास गेला.

इमर्सनने विचारले, 'थोरो, तू इथे का आलास?'

थोरोने उत्तर केले, 'मित्रा, खरा प्रश्न हा आहे की तू येथे का आला नाहीस?'

# आजच्या परिस्थितीत, बदलत्या संदर्भात सामाजिक कार्याचे स्वरूप आणि समाज-कार्यकर्त्याची भूमिका

देवदत्त दाभोलकर

मी या क्षेत्रातील अनुभवी कार्यकर्ता नाही, परंतु समाजचिंतक या सदरात मी कदाचित् काही प्रमाणात बसू शकेन. निदान 'साम्ययोग' च्या संपादकांना असे वाटत असावे असे त्यांच्या विनंतीपत्रावरून दिसते.

एरवी गेल्या सहा दशकांहून अधिक काळ माझा विविध स्तरांवरच्या विविध कार्यकर्त्यांशी जवळून संबंध आला आहे. त्यांच्याशी या संदर्भात सविस्तर चर्चाही झालेल्या आहेत. यात अनेकविध कार्यकर्ते आहेत. पुरुष आहेत, तशा महिलाही आहेत. उत्साहाने १९२० च्या आंदोलनात शिक्षण सोडून उतरलेले व नंतर अत्यंत हलाखीच्या परिस्थितीत खचलेले गतपिढीतील लोक मी पाहिले आहेत. 'जो जगदात्मा दशांगुळे उरला' अशी ज्याची ताकद असेल त्यानेच यात उतरावे असी हळहळ व्यक्त करणारे आहेत, त्याचप्रमाणे तशाच हलाखीच्या परिस्थितीत 'कष्टात अंतकाला। परिवार सेवनाला। जरि ना कुणी उशाला। तरिही सुखे मरू दे।' या भावनेने अर्धशतकाच्या तपश्चर्येनंतर शांतपणे मृत्यू स्वीकारलेलेही आहेत. या दोन टोकांच्या मधलेही असंख्य आहेत. त्यांचा तपशील व त्यांचे नामनिर्देश या ठिकाणी व अन्यत्रही करण्याचे कारण मला दिसत नाही. चंद्राताई किर्लोस्करांचा अखेरचा कालखंड मी जवळून पाहिला आहे आणि वसंतराव नारगोळकर यांच्याशीही गेल्या काही महिन्यांत मी संपर्क साधला होता एवढेच या ठिकाणी मी नमूद करतो.

मी स्वत: या क्षेत्रात उतरलो असतो तर नीटपणे टिकलो असतो व मला कधीही त्याबद्दल पश्चात्ताप झाला नसता असे मी सांगू शकत नाही. त्यामुळे ती ताकद असणाऱ्या लोकांविषयी काहीच विधान करावयाचा मला अधिकार नाही. परंतु ही ताकद असणारे लोक कमी असतात हे विधान मी करू शकतो. आणि आपल्यात ही ताकद आहे असे समजून उडी घेणारा कोणी भेटला तर मी प्रतिकूलच सल्ला देतो; निदान अतिसावधतेचा इशारा देतो.

असे तरुण मला भेटलेले आहेत. ज्या शिक्षणक्षेत्रात मी वावरलो त्या क्षेत्रातील शक्यतांमुळे व आप्तस्वकीयांत देखील.

मी देत असलेला सल्ला खालील स्वरूपाचा असतो व तो देण्यामागे माझ्या मनातील अनुभवातील बदललेले संदर्भ असतात. म्हणून माझी मांडणी त्या अंगाने करतो.

मी अशा युवकांना (व क्वचित युवतींना) सांगतो :

१. तुझी या वयातील उत्कटता व अननुभवी उत्साह खरा आहे असे समजू नकोस. त्याची कसोटी लागावी लागेल. तुला दुसऱ्याचा सल्ला घेणे आवश्यक वाटले हे चांगले आहे, परंतु तेच तुझ्या वृत्तीच्या कमकुवतपणाचेही गमक आहे.

२. आपल्या कुटुंबियांविषयीच्या जबाबदाऱ्या टाळून जर हे तू करत असशील तर तो पळपुटेपणाचाच भाग असण्याची नितांत शक्यता आहे.

३. अविवाहित राहून, विवाह करून अपत्यहीन राहून, किंवा लैगिंक स्वातंत्र्याच्या विकृत आकलनाने स्वतःच्या कौटुंबिक जबाबदाऱ्या निर्माणच करावयाच्या नाहीत किंवा वाढवायच्या नाहीत असे तू ठरवलेस तर त्यात व्यावहारिक अडचणी तर आहेतच, परंतु स्वतःच्या व इतरांच्याही मानसिक ताणतणावाचे तीव्र प्रश्न निर्माण होऊ शकतात.

४. विवाह आणि दोन अपत्ये ही तू आपली शारीरिक व मानसिक गरज म्हणून ओळखले पाहिजे. तुझी जीवनसाथीची निवड यशस्वी ठरली तर एक महत्त्वाचा भाग तू यशस्वीपणे पूर्ण केलास असे होईल.

५. साधी राहणी तर अपेक्षितच आहे, परंतु साधेपणाच्या कल्पनाही सापेक्ष असतात याचे व्यवधान ठेवावयास हवे. नाहीतर त्याचा प्रकृतीवर, कार्यक्षमतेवर व एकूण कार्यावरच परिणाम झाल्याखेरीज राहत नाही.

६. याहूनही अवघड गोष्ट आजच्या काळात अशी आहे की शिक्षण आणि आरोग्य यांचा योग्य स्तर







सांभाळण्यासाठी करावा लागणारा खर्च, याविषयीच्या आजच्या काळातील अपेक्षा वाढल्या आहेत व वाढत आहेत. याची अनेकविध कारणे आहेत.

७. स्वतःच्या बाबतीत व मुलांच्या बाबतीत हे सांभाळावे लागते. ते सांभाळता आले नाही की कुटुंबातच ताण सुरू होतात. ही स्थिती निर्माण होणार नाही अशी दक्षता घेणे व अशा अडचणीत 'कार्यकर्ता' म्हणून दुसऱ्यासमोर याचना करावी लागणार नाही इतके स्वतःसिद्ध स्वावलंबन मिळवणे ही ताठ मानेने शेवटपर्यंत जगण्याची अनिवार्य अट आहे. आज तर ती अधिकच अनिवार्य आहे, कारण समाजाचा सामाजिक कार्यकर्त्यांकडे पाहण्याचा पूर्वी जो कौतुकाचा-आदराचा भाव असे तसा तो आता राहिलेला नाही.

मग अशा वृत्तीच्या युवकांनी आजच्या परिस्थितीत काय करावे?

१. सत्य-असत्याशी केले मन ग्वाही। मानियले नाही जनमत।। ही आपली मनोभूमिका पक्की करावी. ही त्याची त्याला स्वतःलाच करावी लागेल व तो जागरूक असेल तर ती पुरेशी पक्की आहे की नाही याची कसोटीही कोणालाही न सांगता त्याला स्वतःची स्वतःच घेता येईल.

२. आपल्या व्यवसायक्षेत्रात आपला कस वाढवावा व त्यात उत्तम प्रतीचे यश मिळविण्याचा प्रयत्न करावा. हे तर सर्वच करतात, परंतु याचे वैशिष्ट्य हे राहील की तो यासाठी गैरमार्गाचा वापर करणार नाही व त्यामुळे काही व्यावसायिक नुकसान सोसावे लागले तरी आनंदाने सहन करील.

३. व्यवसायात तो कितीही यशस्वी झाला तरी त्याचे राहणीमान साधे असेल. याची सीमारेषा तात्त्विकदृष्ट्या सांगणे त्रयस्थाला कठीण असते. परंतु ज्याची त्याला समजू शकते. समजू शकत नाही अशी परिस्थिती आली की आपण आता पूर्वीचे राहिलो नाही हे ओळखावे. या वृत्तीतून बाहेर पडणे व पुन्हा मूळ ज्योत जागवणे अशक्य नसते. परंतु ती ज्योत मालवली याची वेदना वाटावी इतकी तरी जिवंतपणाची धुगधुग असावी लागते.

४. अनेक अशा वृत्तीच्या लोकांना असे आढळून येईल की हे सर्व केल्यानंतरही आपल्याकडे काही अधिक भाग शिल्लक राहतोच. 'इदं न मम' ही वृत्ती त्या भागाविषयी बाळगावी व तशी व्यावहारिक रचनाही करावी. प्रत्येकाने आपल्या रूचीप्रमाणे, प्रवृत्तीप्रमाणे क्षेत्र निवडावे. स्वार्थाचा लवलेश त्यात नसावा एवढीच अट राहील. विनोबाजींचे उद्‌गार मार्गदर्शक म्हणून उपयोगी पडतील.

विनोबाजी म्हणाले : 'माझ्याकडे जे आहे त्यातील समाजाकडून मिळालेले किती व माझे स्वतःचे किती असा विचार मी ज्यावेळी करतो त्यावेळी 'इदं न मम' असे वेगळे म्हणण्याचे मला कारणच उरत नाही.'

आजच्या बदललेल्या संदर्भात अशा वृत्तीच्या लोकांची बिरादरी निर्माण करण्याची आवश्यकता मला वाटते. ही बिरादरी जाति-पंथ-धर्म या सर्वांच्या पलीकडे जाणारी तर असेलच, परंतु राजकीय पक्षोपक्षांच्या गट-उपगटांच्याही पलीकडे जाणारी असेल.

ती आपापले व्यवसायक्षेत्र सांभाळात, आपापल्या आवडीच्या सामाजिक क्षेत्रातही कार्यरत राहील. एकत्रित काही रचना करून समाजकार्यात आपल्या जीवनाचे सर्वस्व झोकून देणाऱ्या कार्यकर्त्यांच्या मागेही ती कृतज्ञभावनेने व समर्थपणे उभी राहू शकेल. कार्यकर्त्यांच्या मनात अशा मदतीची अपेक्षा नसणे व अशा कार्यकर्त्यांना त्यांनी न मागता योग्य ती मदत, त्यांच्या मनात कोणतीही ओशाळेपणाची भावना निर्माण न करता. पोचविणे या दुहेरी कसावर या रचनेच्या यशस्वितेचे मोजमाप करता येईल.

संदर्भ बदलले आहेत. सामाजिक कार्य तर संपलेले नाही. समाज-कार्यवृत्ती व कार्यकर्ते सतत अस्तित्वात राहिले पाहिजेत. या दृष्टीने विचार करताना पुढे येऊ शकतील अशा अनेक समस्या मला दिसतात. त्यांची काही उत्तरेही सुचतात. त्या दिशेच्या कृतीसाठीच (केवळ चर्चेसाठी नव्हे) एकत्र बसावयाचे ठरल्यास त्यात मला रस आहे. ज्यांना असा रस आहे त्यांनी कळवावे. एक महिनाभर मी प्रतिसादाची अपेक्षा राखीन व नंतरचे आयोजनही करीन.

(साम्ययोग, १ फेब्रुवारी २००६ च्या सौजन्याने.)



याला प्रतिसाद अत्यल्प आला. पण आला तो चटका लावणारा होता.

- देदा

अनुक्रमणिका








‘आणीबाणी’चा विचार करण्यासाठी आचार्य विनोबांनी बोलावलेले

# आचार्य संमेलन

१.

## यदुनाथ थत्ते

संपादक ‘साधना’, पुणे

आचार्यांची बैठक विनोबाजींच्या सल्ल्याप्रमाणे श्रीमन्नारायण यांनी ता. १६, १७ व १८ जानेवारीला बोलावल्याचे समजले तेव्हा थोडे कुतूहल चाळवले.

खरे म्हणजे २५ डिसेंबरच्या मौनसमाप्तीबद्दल सर्व देशभर खूपच उत्सुकता होती. तशी यावेळी फारशी नव्हती. तो दिवस अपेक्षाभंगाचा ठरला होता. तेव्हा नव्याने अपेक्षा करायला मन तयारच नव्हते.

आचार्य कोण आणि कोणाला ठरवणार, हाही प्रश्नच होता.

श्रीमनर्जींना पत्र पाठवून एक जानेवारीला मी पृच्छा केली. त्यांचे ३ जानेवारी १९७६ ला तत्पर उत्तर येते. ते लिहितात, 'आचार्य संमेलनात अशाच व्यक्तींना आमंत्रण देत आहोत की ज्या कोणत्याही राजकीय पक्षात नाहीत किंवा सर्व सेवा संघातील वर्तमान विवादातही या किंवा त्या गोटात नाहीत. कुलगुरुंतील काही अशा व्यक्तींची निवड करीत आहोत की जे निर्भय आणि निष्पक्ष आहेत. आचार्य संमेलनात सामील होणारी मंडळी सर्व दृष्टींनी निर्भय, निर्वैर आणि निष्पक्ष असावी अशी पूज्य विनोबाजी आणि मी पूर्ण दक्षता घेत आहोत. निवडक जवळपास २०-२५ व्यक्तींनाच निमंत्रित करीत आहोत.'

पुण्यातून आचार्य वि.प्र.लिमये जाणार असतात आणि प्रा. देवदत्त दाभोलकर यांनाही निमंत्रण असते.

अच्युतराव पटवर्धन यांनाही बोलावणे असल्याचे कळते पण त्यांचे जाण्याचे अनिश्चित आहे असेही समजते.

काही मंडळी मलाही त्या वेळी वर्ध्याला जाण्याची सूचना करतात. आचार्य कुलाचे कार्य करणारे प्रा. गुरुशरण, प्राचार्य राम शेवाळकर, श्री. दि. ह. सहस्त्रबुद्धे, मामा क्षीरसागर यांपैकी कोणाचेही नाव या संदर्भात घेतले जात नाही. आचार्य दादा धर्माधिकारी, आचार्य राममूर्ती इत्यादींचाही कुठे उल्लेख नसतो. मला आमंत्रण येण्याचा सवालच नसतो. आचार्य कुलाच्या प्रारंभीची बैठक आणि समारोपाची बैठक या पत्रकार व इतरांना खुल्या राहतील असे जाहीर झालेले असते. कारण या बैठकीपुढे विनोबा भाषण करणार असतात.

एकूण सर्वच मामला फार जरतारी असल्याने फारशी उत्सुकता नसते. पण जमले तर १८ जानेवारी १९७६ च्या समारोपाच्या वेळी हजर रहावे असे मी ठरवतो.

अकोल्याहून सकाळी नागपूर मेलने निघायचे ठरवतो. डॉ. प्रमिलाताई जैन यांना नागपूरला जायचे असल्याने धावपळ करीत आम्ही दोघे स्टेशन गाठतो तोच मेल फलाटावर येऊन धडकते. कसाबसा एका डब्यात आम्ही शिरकाव करतो आणि सुटकेचा श्वास सोडतो. गाडी वर्ध्याच्या रोखाने पुढे धावत असते आणि माझे मन मात्र माघारी शोध घ्यायला निघालेले असते.

पंचवीस डिसेंबरला ही कल्पना पुढे आलेली असते.

सर्व सेवा संघाच्या विश्वस्तांची बैठक भरते. सेवाग्रामला विश्वस्त एकमताने खालील एक निर्णय करतात :

काही विशिष्ट कार्यक्रम अमलात आणताना काही अडचणी उभ्या राहिल्या आणि पूर्ण प्रयत्न करूनही त्यांचे निवारण करणे शक्य झाले नाही तर महात्मा गांधींच्या आदर्शाच्या आधारावर सत्याग्रहाचा मार्ग चोखाळणे अनिवार्य होईल. परंतु हा सत्याग्रह निर्भय, निर्वैर आणि निष्पक्ष भावनेने ओतप्रोत असला पाहिजे.

आणखीही काही गोष्टी ठरलेल्या असतात आणि त्याबाबत विनोबाजींशी विचारविनिमय करण्यासाठी विश्वस्त त्यांच्याकडे जातात.










चर्चेच्या वेळी विनोबा सांगतात : लोकांना आचार्यांचे अनुशासन मिळाले पाहिजे, केवळ शासनाचे नव्हे.

आचार्यांचे अनुशासन उभे करायला विनोबा सांगतात तेव्हा एक कार्यकर्ते म्हणतात, तुम्हीसुद्धा एक आचार्य आहात.

विनोबा म्हणतात : मी एकटा मत देऊ शकत नाही. बरेचसे आचार्य एकत्र जमून सर्वसंमतीचे अनुशासन सांगतील. आचार्यांनी बैठक करून विचार करावा. आणीबाणी योग्य की अयोग्य, तिच्यामुळे फायदा झाला की नुकसान यावर त्यांनी चर्चा करावी. चर्चेत ज्या बाबतीत मतभिन्नता असेल त्याबाबत ते काहीच जाहीर करणार नाहीत. जेवढ्या गोष्टींबाबत मतैक्य होईल तेवढ्याच प्रकाशित केल्या जातील. माझा विश्वास आहे की भारत सरकार या गोष्टी मान्य करील. सरकारने न मानले तर सत्याग्रहाचा प्रसंग येऊ शकतो.

यावर एक कार्यकर्ते म्हणतात, सहकारी तुरुंगात आहेत. वृत्तपत्रांवर निर्बंध आहेत. नागरिक स्वातंत्र्य मर्यादित झाले आहे. त्यामुळे परिस्थिती कुचंबलेली आहे. ही कुचंबणा संपुष्टात आणण्यासाठी आपले सहाय्य मिळाले पाहिजे.

विनोबा म्हणतात : आचार्यांचे सर्वसंमत विचार आणि माझे सूक्ष्म अभिध्यान यांचे साह्य होऊ शकेल.

आणीबाणी जाहीर झाल्यानंतर खासदार वसंत साठे यांच्याजवळ विनोबांनी तिची भलावण अनुशासनपर्व म्हणून केल्याचे जाहीर होते आणि कधी नव्हे तो या शब्दांबद्दल चर्चा आणि गदारोळ सुरू होतो. सरकारला एकाएकी राजापुरी गंगेसारखे विनोबांच्या वचनांबद्दल ममत्व निर्माण होते आणि ते नाना रूपांनी ओसंडून वाहू लागते! विनोबांजवळ त्याबाबत विचारणा करण्याचे अनेक लोक प्रयत्न करतात. पण विनोबा स्पष्ट असा प्रकाश टाकीत नाहीत.

पंचवीस डिसेंबरच्या सभेत म्हणजे आणीबाणीचे सहा महिने उलटल्यावर विनोबा अनुशासन शब्दाबद्दल खुलासा करतात.

आचार्यांचे असते ते अनुशासन आणि सत्तावाल्यांचे असते ते शासन. शासनाच्या मार्गदर्शनाने जग चालेल तर त्याला शांती-समाधान लाभणार नाही. आचार्यांच्या अनुशासनाचा जग स्वीकार करील तर त्याला शांती-समाधान लाभेल.

निर्भय, निर्वैर आणि निष्पक्ष असणारे, अशांत आणि क्षुब्ध न होणारे ते अनुशासन देण्याला पात्र आचार्य.

अशा आचार्यांचे अनुशासन प्रजेला मिळावे आणि त्या अनुशासनाच्या मार्गदर्शनाप्रमाणे जनता वागली तर प्रजेत शांतता राहील, याबाबत शंका घेता येणार नाही. आणि अशा अनुशासनाला जर शासनाने विरोध केला तर सत्याग्रहाचा प्रसंग येऊ शकतो. पण मला पूर्ण खात्री आहे की येथील सरकार असे कोणतेच काम करणार नाही की जे आचार्यांच्या अनुशासनाच्या विरोधी असेल. त्यामुळे अशा सत्याग्रहाचा प्रसंग भारतात येणार नाही.

मनात हे सारे धागेदोरे जुळत असतात. बाहेर डॉ. प्रमिलाताईंशी चर्चा सुरू असते.

सूर निराशेचाच असतो.

प्रमिलाताई अति दुःखी असतात.

एखादा देव न पावल्याने भक्ताची जशी विकल अवस्था होते तशी त्यांची झालेली असते.

ती त्यांच्या मुखावाटे शब्दरूप घेऊन बाहेर पडत असते.

शेजारीपाजारी डुलक्या घेत आमचे शब्द पकडण्याचा अधूनमधून प्रयत्न करतात. खड्गपूरच्या तंत्र शिक्षणसंस्थेतील काही तरुण विद्यार्थीही त्यात असतात.

वर्ध्याला गाडी वक्तशीर पोचते. मी दामोदर वेले यांचा डोळ्यांनी शोध घेत पुलाच्या रोखाने निघतो. ते पुलावर उभे राहून वाटच पाहत असतात. त्यांच्या स्कूटरवर बसून आम्ही त्यांच्या घरी जातो. तेथे न्याहरी उरकून पवनारकडे निघतो.

सकाळी साडेदहा वाजता विष्णुसहस्रनामाचा पाठ. त्यानंतर आचार्य, कुलातील सर्वसंमत निवेदन विनोबांना सादर आणि विनोबांचे प्रवचन.

विचारांचे चक्र वेगाने फिरत असते. दोन प्रश्न महत्त्वाचे असतात : पहिला प्रश्न या देशात सर्वसंमत असे काय असू शकेल?

नव्याने काहीही करू नये ही गोष्ट बहुधा सर्वसंमत होऊ शकेल. पण त्याचा अर्थ आणि आहे ती स्थिती चालू ठेवावी असे म्हणण्याचा अर्थ एकच असतो! चालू स्थिती मात्र सर्वसंमतीचे निर्माण झालेली नसते. ती

अनुक्रमणिका

अल्पमताने, बहुमताने किंवा एका व्यक्तीच्याही मताने निर्माण झालेली असू शकते म्हणजे ती सर्वसंमत असण्याची गरज नसते. ती सर्वसंमत नसलेली स्थिती बदलण्याला मात्र सर्वसंमती अनिवार्य असते!

सर्वसंमतीशिवाय काहीच बदल घडणार नाही याची जाणीव असणारा एखादा अडबंगही मग बदल रोखून ठेवू शकतो. तो रोखणाऱ्यालाही सर्वसंमतीची शर्त नसते.

हा विचार निराशा उत्पन्न करणारा असतो, पण तो मनात येतोच.

गेल्या पाव शतकात सर्वसंमत अशी कोणती गोष्ट झाली? संविधानातील पहिले कलम - 'भारत हे घटक राज्यांचे मिळून बनलेले संघराज्य आहे. इंडिया दॅट इज भारत इज युनियन ऑफ स्टेट्स-' हे वर्णनपर वाक्यदेखील सर्वसंमतीने संविधानात दाखल झालेले नाही!

प्रा. के. टी. शहा प्रभृतींचे मत असे होते की, भारत हे जातिधर्मातीत समाजवादी घटक राज्यांचे संघराज्य आहे - इंडिया दॅट इज भारत इज युनियन ऑफ सेक्युलर सोशलिस्ट स्टेट्स - असे हे पहिले कलम असावे.

अस्पृश्यता निवारण कायदा सर्वसंमतीनेच करायचा असे ठरले असते तर बहुधा तो कायदा कधीच अस्तित्वात आला नसता!

समजा, सत्याग्रहासाठी आचार्यांच्या सर्वसंमत निवेदनाची शासनाकडून अवज्ञा ही शर्त लागू केली असती तर वैकोमच्या सत्याग्रहासाठी विनोबा काही जाऊ शकले नसते! मग संमत होतील तेवढा 'सर्व'चा संकोच होण्याचीही शक्यता असते.

निर्भय, निर्वैर, आणि निष्पक्षतेची कसोटी लावायची कोणी आणि त्या कसोट्यांना आचार्य उतरल्याचे कोणाचे प्रमाणपत्र करायचे?

दुसरा प्रश्न : ज्या बाबींबद्दल सर्वसंमती झाली नाही त्या बाबी परस्परांना समजावण्याला उपलब्ध साधने कोणती? आणि ती आज उपलब्ध आहेत काय? आणि हे मतपरिवर्तन होण्याच्या प्रक्रियेत आम जनतेला काही स्थान असणार की नाही? म्हणजे सर्वसंमती निर्माण करण्याचा प्रयत्न उघडपणे होणार की खासगी वा गुप्तपणे होणार?

सात वेळा सांगून न पटले तर सातशे वेळा प्रयत्न करीन आणि सातशे वेळा प्रयत्न करून न पटले तर सात हजार वेळा पटवण्याचा प्रयत्न करीन आणि ह्या श्रेणीने पटेपर्यंत हा प्रयत्न सुरूच ठेवीन. हे म्हणणे तर्कशुद्ध आहे, पण आजच्यासारखे एकदादेखील पटवण्याचे स्वातंत्र्य नसेल तर काय?

स्कूटर वेगाने पवनारकडे धावत असते. पाऊस पडून गेल्याने थंडीही बरीच असते.

ब्रह्मविद्या मंदिराच्या पायऱ्यांपाशी 'गुप्त' पोलिस 'उघडपणे' वावरत असतात आणि ही गोष्ट खटकते.

पायऱ्या चढून वर गेल्यावरही असलाच एक ताफा डोळ्यांना सलतो. ही मंडळी आत्मप्रेरणेने आलेली नसते. हुकमाने आलेली असते!

आत जाऊन पोचतो आणि मित्रांचे कुशलवृत्त विचारतो तोवर घंटा वाजते. सभागृहाकडे माणसे निघतात.

सभागृहाचे दोन हिस्से केलेले असतात. विशेष अतिथी व ब्रह्मविद्या मंदिरवासी मंडळी विनोबांसंनिध बसतात आणि उरलेल्या अर्ध्या भागात उरलेली मंडळी दाटीवाटीने बसतात. ध्वनिवर्धकाची व्यवस्था असते.

विनोबांच्या परिसरात अशा प्रसंगी हटकून आढळणारे कित्येक चेहरे यावेळी शोधूनही दिसत नाहीत! जयप्रकाश तर आजारामुळे मुंबईत स्थानबद्ध, पण इतर अनेकजण अनधिकृत माहितीप्रमाणे वेगवेगळ्या तुरुंगात आणि सरकारी माहितीप्रमाणे?...

विष्णुसहस्रनामाचा पाठ सुरू होतो. त्यात अनुशासन असते, पण गोडवा असल्याचे मात्र जाणवत नाही. मन त्या सहस्रनामात रमत नाही.

त्याचा स्मृतीचा चाळा सुरूच असतो. आजच्या लोकमतासंबंधीचे विनोबांचे एक गणिती समीकरण आठवते :

आजचे लोकमत = दुर्जनांचे मत (जे कोणाला विचारत नाही) + सज्जनांचे मत (ज्याला कोणी विचारीत नाही) + विद्वानांचे मत (ज्यात मेळ नाही).

ही आजच्या लोकमताची स्थिती बदलल्याशिवाय सुजाण, सक्रिय, सर्वकल्याणकारी लोकशाही अस्तित्वातच येणार नाही. पण ही स्थिती बदलण्याचे उपाय कोणते आणि त्याचा प्रारंभ कुठून करायचा?

विनोबांचे आजच्या लोकशाही व्यवस्थेबद्दलचे आणखी एक समीकरण आठवते : ५१=१०० आणि ४९=०







अनुक्रमणिका

अशी आजची स्थिती त्यांनी वर्णन केली आहे. विधान सभेतील संसदेतील ५१ टक्के जागा पटकावणारा हाती १०० टक्के सत्ता आणि ४९ टक्के जागा मिळवणारांना शून्य सत्ता... पण वस्तुस्थिती तर अशी आहे की ३५=१०० आणि ६५=० . सत्तधारी पक्षाला ३५ टक्क्यांच्या आसपास मते मिळूनही जवळपास सर्व सत्ता त्यांच्याकडे आहे!

विनोबांनी पंचशक्ती सहयोगाचेही अनुपान सांगितले आहे.

जनशक्ती, सज्जनशक्ती, महाजन शक्ती, विद्वज्जन शक्ती आणि शासन शक्ती. या पंचशक्ती-सहयोगाची प्रक्रिया कोणती?

आचार्यांचे संमेलन म्हणजे या दिशेने टाकलेले पाऊल समजायचे काय? आचार्यसंमेलन म्हणजे विद्वज्जन शक्तीच की त्या जोडीला सज्जनशक्ती-देखील?

आकाशात् पतितं तोयं तथा गच्छति सागरम् सर्व देव नमस्कार: केशवं प्रतिगच्छति - येथपर्यंत येऊन विष्णुसहस्रनामाचा पाठ समाप्त होतो. विनोबांच्या शब्दांसाठीची उत्कंठा वातावरणात असते. ध्वनिमुद्रण-वाले सरसावलेले असतात.

विनोबांचा आवाज खोल गेलेला असतो. सावकाशपणे ते बोलतात. आकाशवाणीवरच्या संथ बातमीपत्रासारखे.

स्वराज्यशास्त्रात एकायतन, अल्पसंख्यायतन, बहुसंख्यायतन आणि सकलायतन अशा चार प्रकारच्या राज्यपद्धती असल्याचे त्यांनी विवेचन केले आहे. त्यांतील सकलायतन पद्धतीचा ते पुरस्कार करतात. पण त्या संदर्भात ते इतर गोष्टीही आणतात.

लोकतंत्रावर विनोबांचा विश्वास नसल्याने त्यांनी अनेकदा जाहीरपणे सांगितलेले आहे.

त्यांनी आजवर कधी कोणाला मत दिलेले नाही आणि मत देण्याला कधी कोणाला सांगितलेही नाही.

त्यांनी बूथ (मतदान केंद्र) देखील पाहिले नाही. पण ते 'बूथ' म्हणजे 'भूत' आहे असे मात्र त्यांचे मत आहे.

अतिशय मऊ, विनम्र अशा या विवेचनातही सूक्ष्म अशा अहंतेचा वास मला येतो. इतरांना काय वाटते मला कल्पना नाही.

जमलेल्या विद्वज्जनांनी आपण म्हणजेच आचार्य असा ग्रह करून घेऊ नये असा सावधानतेचा इशारा ते देतात.

देशभर आचार्यकुल असावे व त्यासाठी दरेक जिल्ह्याला एक असे तीनसाडेतीनशे आचार्य उभे करावे इ. इ. विवेचन होते.

श्रीमनजी, जैनेंद्रजी, दिवाकरजी वगैरे मंडळीही बोलतात.

चार दिवसांनी दिल्लीला जाऊन इंदिराजींची या सर्वसंमत निवेदनाबद्दलची प्रतिक्रिया आपण समक्ष आजमावू, असे का कोण जाणे, पण श्रीमनजी सांगतात.

मनात एक तिडीक उठते. निर्भय, निर्वैरतेचे कोणाला ठाऊक, पण निष्पक्षतेचा भंग झाल्यासारखे वाटते.

कार्यक्रम संपण्याची मी वाट पाहतो.

आचार्यांनी 'प्रसाद' घ्यावा असे श्रीमनजी सुचवतात. कोणाचा, कशाचा हे शब्द मनात येतात.

विनोबा म्हणतात : इतरांनी प्रसादासाठी पडापडी करू नये.

अखेर मी जैनेंद्रजींजवळ पोचतो. म्हणतो : इंदिराजीके पास तो श्रीमनजी सर्वसंमत निवेदन लेकर खुद जायेंगे, लेकिन जयप्रकाशजीके पास भी ले जानेकी बात आप आचार्योंमेंसे किसीको क्यों न सूझी? खैर, वे तो अखबारमें पढही लेंगे! लेकिन वैसे तो इंदिराजी भी पढ सकती है।

माझ्या बोलण्यातला उपरोध जैनेंद्रजींना जाणवत असावा. जैनेंद्रजी सांगतात, आचार्य लिमयेजीने यह बात उठायी थी. सोचा था वे भी इस वक्त बोलेंगे।

दाभोलकरांजवळही मी बोलतो.

न्यायमूर्ती गोपाळराव एकबोटे यांनाही भेटतो.

अखेर विनोबाजींच्या अंतेवासी महादेवीताई यांच्याजवळ बोलतो. त्या म्हणतात : चला श्रीमनजींच्या कानी घाला. बाबांनाही सांगा. मलासुद्धा हे खटकते आणि विनोबांना मी ते सांगते. तुम्हीही सांगा.

श्रीमनजी मोटरीत बसून वर्ध्याला प्रयाण करण्याच्या तयारीत असतात. मी म्हणतो : श्रीमनजी एक मिनट आपसे बात करना है। हमको एक बात बहुत अखरी। आप इंदिराजी के पास तो खुद यह निवेदन लेकर जायेंगे, लेकिन जयप्रकाशजीके पास उसी तरह पहुँचनेकी जरूरत आप महसूस नहीं करते। अखबारोंमें







अनुक्रमणिका

वे पढही लेंगे। जयप्रकाशजीभी तो इससे संबंधित एक पक्ष है।

श्रीमनजींना वर्ध्याकडे निघण्याची घाई असते. टपालाने निवेदन जयप्रकाशांना पाठवले जाईल, असे ते सांगतात!

मी परत आत येतो. मित्रांना भेटतो.

मग विनोबांच्या कमऱ्यात जातो.

बाळमाई म्हणतात : साधनेचे चार अंक आले नाहीत. तुम्ही रागावून पाठवणे बंद केले काय?

मी सांगतो : रागावलो तर दोन अंक पाठवीन, पाठवणे बंद कशाला करीन? म्हणजे तुम्ही सगळे वाचाल तरी. आम्ही पोस्टात अंक टाकला तर तो पोचला असे समजतो. न पोचला तर कळवत जा म्हणजे पाठवू.

लक्षात येते, अनुशासन पर्वातही अंक, वाहतुकीच्या काळात मंडळी वाचण्यासाठी काढून घेत असावीत. त्यामुळे अंकावर बंदी घातली गेल्याची शंकाही आश्रमवासीयांना येत असावी.

विनोबांजवळ आम्ही जातो. मी वंदन करतो.

बाळभाई विचारतात : ओळखले ना?

विनोबा म्हणतात : यदुनाथ ना? यादवी काय म्हणते?

मी सांगतो : सरकारशी यादवी चालली आहे आणि उच्च न्यायालयातील दाव्याबद्दल लिहून देतो.

विनोबा वाचतात. म्हणतात : खर्च किती?

मी लिहून देतो. वकील मोफत इतर खर्च तीन-चार हजार तरी!

इतर उत्सुक डोळे आमच्याकडे पाहत असतात. आणखी काही विचारविनिमय आमच्यात होईल असे त्यांना वाटत असावे. मी विनोबांना 'पत्रकार दिनाचे चिंतन' असणारा लेख देतो. विनोबा त्यावर एक दृष्टिक्षेप टाकतात आणि तो जवळ ठेवून घेतात. तो ते वाचतील अशी खात्री असते. साधना ते नियमाने नजरेखालून घालतात.

सर्वसंमत निवेदनाची प्रत नजरेखालून घालून नंतर निवांतपणे पुन्हा वाचावी असे ठरवून स्कूटर घेऊन आम्ही वर्ध्याकडे परततो.

[साधना, वर्ष २८, अंक २५-२६ मधून साभार.]

❖ ❖ ❖

## २.
## आचार्य संमेलनाचे सर्वसंमत निवेदन

निर्भय, निर्वैर आणि निष्पक्षपातीपणाच्या विनोबाजींच्या कसोटीला उतरलेल्या सव्वीस आचार्यांच्या संमेलनाने एक निवेदन सर्वसंमत केले आहे. या सव्वीस आचार्यांत सर्वोच्च न्यायालयातील दोन निवृत्त न्यायाधीश आहेत. बाकीचे ज्येष्ठ अध्यापक, साहित्यिक, कलाकार आणि सर्वोदय कार्यकर्ते यांपैकी आहेत. भारताच्या विविध राज्यांतील ही मंडळी आहेत.

देशाच्या तात्कालिक व दूरवर्ती कल्याणाचा गंभीरपणे विचार करून त्यानंतरच हे निवेदन सर्वसंमत झाले आहे.

१. गतकाळात घडलेल्या देशातील घटनांना कोण आणि किती जबाबदार याची चर्चा करण्याच्या भानगडीत न पडता संमेलनाला असे वाटते की, परिस्थिती पूर्वपदावर आणण्याला आता सुरुवात झाली पाहिजे. देशात ऐक्याचे आणि सहकार्याचे वातावरण त्वरित निर्माण झाले पाहिजे. त्यामुळे प्रधानमंत्र्यांनी म्हटल्याप्रमाणे लोकशाही परत मार्गी लावता येईल. कोणाचीही अप्रतिष्ठा होणार नाही असे न्याय्य उत्तर ताबडतोब शोधून काढणे आवश्यक आहे. लोकशाही मूल्ये, पद्धती आणि संस्था यांच्या मार्फतच जनकल्याण होऊ शकेल. त्या मार्गानेच संभाव्य परकी आक्रमणाला तोंड देता येईल. काळ अतिशय महत्त्वाचा आहे आणि आता दिरंगाई झाली तर परिस्थिती आणखीच बिघडण्याची शक्यता आहे आणि त्यातून न भूतो अशी बिकट अवस्था निर्माण होण्याची भीती आहे. आजच्या स्थितीचा तरुण मनांवर जो परिणाम होण्याचा संभव आहे त्याबद्दल संमेलनाला विशेषच चिंता वाटते.

२. आणीबाणीनंतरच्या गेल्या काही महिन्यांत ज्या विधायक घटना घडल्या त्याबद्दल संमेलनाला समाधान वाटते. विशेषतः समाजातील दुर्बळ घटकांबद्दल अधिक सहानुभूतीने विचार होऊ लागल्याचे दिसते. शिक्षणसंस्थांच्या परिसरात शांतता दिसू लागली आहे. औद्योगिक संबंधांत सुधारणा झाली आहे. चलनफुगवटा रोखला गेला आहे. तस्करीविरुद्ध कडक पावले टाकण्यात आली आहेत. काळा पैसा आणि काळा बाजार






यांना काबूत ठेवण्यात आले आहे. जातीय, प्रादेशिक आणि भाषिक कलहांना पायबंद बसला आहे. आर्थिक व्यवस्था आणि प्रशासन यात सुधारणा झाली आहे. ह्या सर्व गोष्टी संमेलनाला स्वागतार्ह वाटतात.

पण त्याचबरोबर अहिंसा आणि सर्वधर्म समभाव यावर निष्ठा असणाऱ्या सामाजिक आणि राजकीय कार्यकर्त्यांना तुरुंगात डांबून ठेवणे, नागरी स्वातंत्र्य काढून घेणे, वृत्तपत्रांवर तपासणीचे निर्बंध लादणे, संसदीय संस्थांतील कामकाजाच्या प्रसिद्धीलाही प्रतिबंध करणे या गोष्टी अशाच बेमुदत चालू ठेवल्या तर देशाच्या आरोग्याला अपायकारक ठरतील असेही संमेलनाला वाटते.

३. देशात सुरू झालेल्या काही प्रक्रिया राष्ट्रहिताच्या दृष्टीने थांबविण्याची व उलट प्रक्रिया सुरू करण्याची वेळ आली आहे, असे संमेलनाला वाटते. आणीबाणी उठवण्याच्या दृष्टीने नवी पावले टाकली पाहिजेत. पण त्याचबरोबर आणीबाणीमुळे जे फायदे पदरात पडले तेही हातचे जाऊ देता कामा नयेत. उदाहरणार्थ तस्करी, काळाबाजार, करचुकवेपणा या समाजद्रोही गोष्टींना आळा घालण्याचे प्रयत्न नेटाने पुढे चालले पाहिजेत.

पुढील सार्वत्रिक निवडणुका लौकरात लौकर घेता याव्यात या दृष्टीने परिस्थितीतील तणाव दूर करण्यासाठी अनेकविध प्रयत्न सुरू करणे आता इष्ट ठरेल. निवडणुका मुक्त वातावरणात भ्रष्टाचार टाळून आणि खर्चिकपणाला आळा घालून कशा करता येतील, याबाबत संबंधितांशी चर्चा करून निवडणूक पद्धतीत करावयाच्या सुधारणांचा एक आराखडा तयार करणे अगत्याचे आहे. अशा प्रकारच्या सुधारणा करण्याची मागणी सर्वांकडूनच होत आहे. त्या दृष्टीने पावले टाकली जातील, अशी संमेलनाला आशा आहे.

४. हिंसा आणि लोकशाही समाजवाद ह्या गोष्टी कधीही एकत्र नांदू शकत नाहीत, अशी संमेलनाची खात्री आहे. महात्मा गांधींच्या स्फूर्तिदायी नेतृत्वाखाली झालेल्या अहिंसक लढ्यामुळेच भारताला स्वातंत्र्य मिळाले आहे. म्हणून समाजातील सर्व घटकांनी पुन्हा एकदा हिंसेचा त्याग करण्याची व फुटीरपणाला आळा घालण्याची प्रतिज्ञा करावी. हे अनुशासन सर्वांनी दडपणाशिवाय स्वेच्छेने मान्य करावे. ....अनुशासना-साठी राजकीय पक्ष, वृत्तपत्रे, व्यापारी व उद्योगपती यांनी सर्वसंमत अशी आचारसंहिता तयार करण्याचा नेटाने प्रयत्न करावा. राष्ट्रजीवनातील सर्व क्षेत्रांत उच्च ध्येये गाठण्यासाठी नैतिक साधनांचाच वापर करण्याला सर्वांनी स्वतःला बांधून घ्यावे.

५. संविधान बदलाबद्दल अनेक प्रकारच्या सूचना वेळोवेळी पुढे मांडण्यात येत आहेत. सामाजिक आणि आर्थिक क्षेत्रांत आणि विशेषतः दुर्बल घटकांना झपाट्याने प्रगती करण्याला अनकूल अशी व्यवस्था संविधानात असली पाहिजे, याबाबत सर्वसाधारणपणे एकमत दिसते. ह्या दृष्टीने आजवर अनेक दुरुस्त्या संविधानात करण्यात आल्या आहेत.

इतर नव्या दुरुस्त्यांचा विशेषतः मूलभूत कर्तव्यांचा भाग समाविष्ट करणाऱ्या दुरुस्त्यांचा जरूर विचार केला पाहिजे. परंतु संविधानात जे मूलभूत स्वरूपाचे बदल करावयाचे ते मात्र त्या बदलांची व्यापक प्रमाणावर विविध पातळीवर देशभर चर्चा आणि सल्लामसलत झाल्यानंतरच केले जावेत, हे प्रधानमंत्र्यांचे म्हणणे संमेलनाला योग्य वाटते.

या विषयाचा सखोल विचार करण्यासाठी भारत सरकार व्यापक पायावर एक समिती नेमील अशी संमेलनाला आशा आहे. या समितीच्या सूचना लोकांसमोर राष्ट्रीय पातळीवर चर्चा करण्यासाठी ठेवण्याची विधायक वृत्ती सरकारने दाखवावी. हे बदल करताना सत्तेचे आणि जबाबदारीचे परिणामकारक रीतीने अगदी खालच्या पातळीवर विकेंद्रीकरण करण्याचे उद्दिष्ट साध्य होईल याचे अवधान राखले जावे.

६. स्वातंत्र्याची अठ्ठावीस वर्षे उलटल्यानंतरही देशातील कोट्यवधी लोक दारिद्र्यरेषेखालच्या पातळी-वरचे जीवन कंठित असावेत, ही गोष्ट फार गंभीर चिंता निर्माण करणारी आहे. ह्या लोकांच्या प्राथमिक गरजांची देखील परिपूर्ती होऊ शकलेली नाही. या दृष्टीने सरकारी व स्पयंस्फूर्त अशा दोन्ही पातळीवर, तातडीचे व सर्व शक्ती एकवटून प्रयत्न झाले पाहिजेत. त्यातून सर्वांना रोजगाराची हमी मिळाली पाहिजे आणि समाजातल्या सर्वात दुर्बल घटकांचे जीवनमान उंचावण्याचा विश्वास निर्माण झाला पाहिजे.

गांधीजींचा भर सदैव अंत्योदयावर असे. आपल्या राष्ट्रीय योजनेचा हा पाया बनला पाहिजे. समाजातील

वरिष्ठ वर्गांच्या उपभोगाच्या पातळ्या खाली आणल्या पाहिजेत. आणि गांधीजींच्या कल्पनेतील विश्वस्त भावना त्यांच्यात रुजली आणि वाढली पाहिजे.

७. लोकसंख्यावाढीला तातडीच्या भावनेने आळा घालण्याचा विचार झाला पाहिजे. इतर उपाययोजनां-खेरीज विनोबाजींनी सुचविल्याप्रमाणे व्यापक लोक-शिक्षणाची मोहीम काढून देशात संयमाचे वातावरण निर्माण करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. विज्ञानात शक्ती, गती आणि क्रिया आहे, पण दिशा नाही, असे विनोबाजी वारंवार प्रतिपादन करतात. दिशा देण्याचे कार्य अध्यात्माने केले पाहिजे, असे त्यांचे म्हणणे असते. देशाच्या - विशेषत: ग्रामीण भागाच्या सर्वांगीण विकासाचा मार्ग अनुसरताना विज्ञान आणि अध्यात्म यांचा समन्वय करणे आवश्यक आहे. त्याशिवाय आपली उद्दिष्टे साध्यच करता येणार नाहीत. ही उद्दिष्टे रेखीव आणि विवेकाने निश्चित केलेली असली पाहिजेत, हे उघड आहे.

८. योग्य मार्गाने देशाची प्रगती साधायची तर आजची शिक्षणपद्धती जीवनकेंद्री बनवली पाहिजे. त्यामुळेच युवकांना उत्पादक आणि विकासकारक कार्यात सक्रीयपणे सहभागी होता येऊ शकेल. गांधीजींची शिक्षणविषयक कल्पना हीच होती. येत्या दहा वर्षांत समाजातील व्यापक निरक्षरतेचे संपूर्ण उच्चाटन करणे हे एक महत्त्वाचे राष्ट्रीय उद्दिष्ट म्हणून स्वीकारण्यात यावे. निरक्षरता आणि दारिद्र्य या गोष्टी परस्परांशी निगडित अशाच असतात.

आपल्या शिक्षणसंस्थांनी नैतिक मूल्यांवर खास भर द्यावा. भारताच्या संपन्न अशा समन्वयी संस्कृतीवरही त्यांनी खास भर दिला पाहिजे. भ्रष्टाचार मग तो कोणत्याही स्वरूपात आणि कोठेही असो, त्याचे निर्मूलन करण्यासाठी नेटाने प्रयत्न केले पाहिजेत.

शिक्षण, हे सरकारच्या पोलादी पंज्यापासून मुक्त असले पाहिजे आणि राजकीय हस्तक्षेपापासून दूर असले पाहिजे, या आचार्य विनोबांच्या कल्पनेचा संमेलन पुरस्कार करते.

१०. राष्ट्रीय समजूतदारपणा आणि विधायक सहकार्य वाढवण्याच्या कार्यात आपला काही उपयोग होण्यासारखा असेल तर तसा तो करू देण्याला संमेलन उत्सुक आहे. तशी संधी मिळाली तर संमेलन ते आपले भाग्य समजेल.

या निवेदनातील सूचनांबाबत पुढे कोणती पावले टाकायची ते आचार्य विनोबाजींनी ठरवावे, अशी संमेलन त्यांना विनंती करीत आहे.

[साधना, वर्ष २८, अंक २५-२६ मधून साभार.]



## ३.
## देवदत्त दाभोलकर
## माझ्या जीवनात आचार्य संमेलन

१

मी फर्ग्युसनचा प्राचार्य असताना एके दिवशी रात्री साडेदहाच्या सुमारास शरदरावजी पवार यांचा मला फोन आला. ते त्यावेळी शिक्षणमंत्री होते.

'अभिनंदन.'

'कशासाठी?'

'पुणे विद्यापीठाची जबाबदारी तुमच्यावर सोपवावयाचे ठरले आहे. कुलपतींची आज सही झाली आहे.'

मी माझा यथायोग्य आनंद व्यक्त केला. दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशी शरदरावजींचा परत फोन आला. तुम्हाला उद्या मला मुंबईत भेटता येईल का?'

मी भेटलो. ते मला म्हणाले, 'तुमच्याविषयी काहीजणांचा आक्षेप आहे की, तुम्ही जयप्रकाशजींच्या बाजूचे आहात.'

मी म्हणालो, 'मी जयप्रकाशजींना फार मानतो ही गोष्ट तर खरीच आहे. यामुळे तुमचा निर्णय तुम्हाला बदलावयाचा असल्यास तुम्ही आजही बदलू शकता.'

शरदरावजी म्हणाले, 'तसा प्रश्न नाही. काल या संदर्भात मुख्यमंत्री वसंतराव नाईक, वसंतदादा पाटील व यशवंतरावजी चव्हाण यांची बैठक झाली. वसंतराव नाईक तर तुम्हाला ओळखत नाहीत. परंतु दादा आणि यशवंतरावजी दोघांनीही सांगितले - 'दाभोलकरांना आम्ही पूर्ण ओळखतो. ते कोणासाठीही आपली मते बदलणार नाहीत. परंतु आपल्या स्थानाचा दुरुपयोगही करणार नाहीत.'

शासनाच्या बाजूने मला येथे हेही नमूद करणे आवश्यक वाटते की, संपूर्ण आणीबाणीच्या कालखंडात शासनाची माझ्यावर योग्य ती नजर असली तरी कोणीही प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष माझ्यावर कसलाही दबाव आणण्याचा प्रयत्न केला नाही. इंदिराजींना याच कालखंडात मी स्वहस्ताक्षरात माझे परखड मत कळविले होते व त्यामुळे त्या नाराज होत्या असे त्यांच्या वर्तुळातीलच एकाने मला सांगितले होते. असे असतानाही हे घडले हे विशेष.

शासनाचा दबाव वेगळा. घरचा दबाव आणखी वेगळा होता. सुमनची अपेक्षा मी राजीनामा द्यावा अशी होती. मुलगा प्रसन्न तर सत्याग्रह करून तुरुंगात गेला होता. घरात माझे मूल्य जवळपास शून्यावर आले होते. माझ्या सुदैवाने विनोबाजी माझ्या मदतीला धावले, त्यांचे मौन संपल्यानंतर त्यांनी आचार्य लोकांनी आणीबाणीचे मूल्यमापन करावे असे सांगितले. 'आचार्य' याची व्याख्याही त्यांनी सांगून टाकली. 'जो निष्पक्ष, निर्वैर, निर्भय असेल तो आचार्य.' अशी ती व्याख्या होती. भारतातील पंचवीस-तीस 'आचार्यां'चे संमेलन आणीबाणीचा विचार करण्यासाठी पवनार येथे आयोजित केले गेले. (आम्ही - निदान मी- निर्भय नव्हतो ही गोष्ट उघडच होती. कारण एरवी आणीबाणीविषयी आपली मते जाहीरपणे सांगण्यासाठी आम्हाला विनोबाजींच्या कृपाकवचाची आवश्यकता वाटली नसती. असो.)

'आचार्य' म्हणून या संमेलनाचे मला आमंत्रण आले आणि घरात माझी प्रतिमा थोडीशी उजळली.

आचार्य संमेलनाने एक सर्वसंमत निवेदन तयार केले. जयप्रकाशजी प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे त्यावेळी, मुंबईला आपल्या बंधूंकडे राहत होते. मी व संमेलनात सहभागी झालेले मुंबई विद्यापीठातील डॉ. पी. आर. ब्रह्मानंद यांनी ते निवदन जयप्रकाशजींना नेऊन दिले. त्यांनी ते वाचून पाहिले व आपल्याला ते पूर्ण मान्य असल्याचे सांगितले. Fundamental Duties चाही आपण आग्रह धरला पाहिजे, हा माझा विचार संमेलनाने तत्काळ मान्य केला होता व त्याचा समावेश निवेदनात होता. निघताना त्या रुग्णावस्थेतही आम्हाला निरोप देण्यासाठी ते बिछान्यावरून उठले आणि म्हणाले, 'I an happy that you intellectuals have now started taking interest in the affairs of the country' या उद्‌गारात कौतुक आणि विषण्णता यांचे मिश्रण जाणवले.

जयप्रकाशजींना हे निवेदन पूर्णपणे मान्य आहे असे इंदिराजींना कळविण्याची व्यवस्था मी केली.

इंदिराजींनी काहीही प्रतिसाद दिला नाही. परंतु घटनेत Fundamental Duties चा समावेश त्यांनी आपल्या कल्पनेप्रमाणे करून घेतला.

## २

## 'आणीबाणी' नंतर -

आणीबाणी संपली. निवडणुका झाल्या. मोरारजी देसाई पंतप्रधान झाले.

मी कुलगुरू होतो.

एक दिवशी दिल्लीहून मला एक पत्र आले.

'या वर्षी पंतप्रधानांचा वाढदिवस 'निर्भयतादिन' म्हणून साजरा करावयाचे ठरले आहे. त्यासाठी एक समिती नेमण्यात आली आहे. त्या समितीवर असण्यास आपली अनुमती असावी अशी विनंती आहे.'

मी उलटटपाली कळवले,

'दिलगीर आहे. असे करण्यात लाळघोटेपणा होईल असे मला वाटते. असा कार्यक्रम करावयाचाच तर तो जयप्रकाशजींच्या वाढदिवशी करणे अधिक युक्त होईल असे मला वाटते.'

या पत्राची प्रत मी मोरारजीभाईंनाही पाठवली आणि लिहिले, 'आपल्याशी संबंधित आहे म्हणून प्रत आपल्याकडे पाठवत आहे.'

असे केले नाही तर 'आपण तरी निर्भय आहोत का' असे मन खात राहील असेही वाटले.

मोरारजींचे लागलीच मला उत्तर आले, 'तुम्ही म्हणता ते योग्य आहे. असा कोणताही कार्यक्रम करायचा नाही अशा सूचना मी दिल्या आहेत.'

## ३

आणीबाणी उठली होती.

सर्वत्र उत्साहाचे, एकत्र काम करण्याचे वातावरण होते.

श्री. बाळासाहेब देवरस राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे सरसंघचालक होते.

एके दिवशी कुलगुरू कार्यालयात मला भेटायला आले -

अनुक्रमणिका








श्री. बाळासाहेब देवरस यांचा पुण्यात प्रकट सभेत सत्कार करावयाचा आहे. त्या सभेचे अध्यक्षस्थान मी स्वीकारावे अशी त्यांची इच्छा होती.

मी नकार दिला.

'आपण ज्यात काहीही केलेले नाही अशा कार्यक्रमाच्या बँडवॅगनवर मिरवणे मला अनुचित वाटते,' एवढेच मी त्यांना सांगितले.



## ४.
## आचार्यकुल
## देवदत्त दाभोलकर

('आचार्य संमेलन' वेगळे व 'आचार्यकुल' वेगळे. या दोहोंच्याही मागील प्रेरणा विनोबाजींचीच होती. परंतु आचार्य संमेलनाची रचना 'आणीबाणी'चा विचार करण्यासाठी तात्कालिक स्वरूपाची होती. 'आचार्यकुल' हा एक सततचा विचारशीलांच्या परस्पर संपर्काचा संघटनात्मक प्रयास आहे परंतु 'आचरति इति आचार्यः।' हीच या मागील विनोबांची भूमिका होती.)

महाराष्ट्र सर्वोदय मंडळ व महाराष्ट्र आचार्यकुल यांनी आयोजित केलेले एक चर्चासत्र ६ व ७ एप्रिलला पुणे येथे गांधीभवनात होत आहे. आचार्यकुल ही विनोबाजींची संकल्पना. अध्ययन, अध्यापन, संशोधन यात रस असणारी कोणतीही व्यक्ती आचार्यकुलात समाविष्ट होऊ शकते. मग ती कोणत्याही स्तरावर काम करीत असो. पूर्व प्राथमिक शिक्षकापासून ते कुलगुरूपर्यंत सर्वांचे तेथे समान पातळीवर बंधुत्वाच्या भावनेने स्वागत आहे. या भावनेने वरिष्ठ कनिष्ठ असे स्तर नसतात.

या कुलाचे काही निकष आहेत.

१. सर्वांविषयी बंधुभाव. सर्वेऽत्र सुखिनः सन्तु ही वृत्ती.

२. राजकीय पक्षातील भूमिका

३. कोणत्याही विचारधारेच्या परंतु व्यक्तिगत संपूर्ण निःस्वार्थी वृत्तीने विधायक काम करणाऱ्या व्यक्तीशी हार्दिक सहयोग

४. सर्वधर्मसमभावाची व्यक्तिगत वृत्ती.

आचार्य राम शेवाळकर आचार्यकुलाचे पहिले सदस्य आहेत. मी सदस्य नाही (कोणत्याही संघटनेचा). परंतु ज्या अनेक परिवारांच्या कार्याशी मी मनापासून समरस होऊ शकतो त्याच आचार्यकुल आहे. सर्वोदय मंडळही आहे. त्यामुळे मी स्वतःला सदस्य नसलो तरी त्या त्या परिवारातील एक मानतो व ते ही त्या दृष्टीने माझ्याकडे पाहते याचा मला आनंद आहे.

माझ्या मनातील (व आपल्या सर्वांच्याच मनातील) दुःख हे आहे की अशी कुले, असे परिवार स्वयंगतीने सातत्याने काही परिणामकारक काम करताना क्वचितच आढळतात. त्यातील लोक वार्षिक/द्वैवार्षिक औपचारिक संमेलनाखेरीज परस्परांशी संपर्क ठेवत नाहीत व मनाशी योजिलेल्या कामाचा सातत्याने पाठपुरावाही करत नाही. असे वरचेवर का घडावे? निर्धारपूर्वक काहीच करावयाचे नाही हा भारतीय मनःप्रकृतीचाच दोष मानावा का? (तसे मला वाटत नाही व तसे मानण्यास माझे मन धजत नाही.) परंतु मग असे का व्हावे? चिंतनात अस्वस्थ, परंतु कृतीत स्वस्थ असे का घडावे? आपले संघटनाकौशल्य कमी पडत असेल का? की केवळ - an ineffectual angel beating in the viod his humonous wings in vain. (भावानुवाद : आकाश शून्य आहे। नाही हवा कुठेही।। तेजाळ पंख असुनी। उडणेच शक्य नाही।।) एवढेच श्रेय पुरेसे मानायचे?

या चर्चासत्राचे संयोजक प्राचार्य राम शेवाळकर यांनी निमंत्रित पत्रात खालील निर्देश केला आहे.

"आपल्या देशाची राजकीय, सामाजिक, शैक्षणिक व सांस्कृतिक परिस्थिती उत्तरोत्तर अधिकाधिक चिंताजनक होत चालली आहे... राजकीय रणधुमाळी पासून अलिप्त असणाऱ्या बुद्धिजीवी वर्गाने ही दृश्ये केवळ हतबल प्रेक्षक म्हणून पाहावीत काय व समाजहिताचा विचार करण्याची आपली जबाबदारी बेदरकारपणे टाळून आत्मकोषात मग्न होऊन बसावे काय, हाच सध्या विचारजीवी विश्वामध्ये एक अस्वस्थ करणारा प्रश्न झाला आहे. विचार करणाऱ्या वर्गाने ही वृत्ती स्वीकारली तर बौद्धिक नेतृत्वाची वाट पाहणाऱ्या उर्वरित समाजाला आधार असणार नाही.

चर्चासत्राची चार सत्रे या दृष्टिकोनातून आयोजित करण्यात आली आहेत. ती अशी -

अनुक्रमणिका






१. भ्रष्टाचाराचा सर्वग्रासी भस्मासूर

२. समाजविन्मुखतेच्या साथीचा रोग

३. विधायक विचारवंतांचे आणि कार्यकर्त्यांचे प्रभाव दौर्बल्य

४. उपाय योजना

यातील उपाययोजना हे चौथे सत्र सर्वात अधिक महत्त्वाचे आहे हे उघड आहे.

या विषयीची माझी भूमिका थोडक्यात खालीलप्रमाणे आहे.

१. सर्वांनी मिळून शक्य तर एकमताने एक कार्यक्रम वर्षभरापुरता ठरवावा. एकमताने ठरला नाही तर बहुमताने. सहमत नसणाऱ्यांना त्यात सहभागी न होण्याचे स्वातंत्र्य असेल. त्यांनी आपापल्या रूचीचा कार्यक्रम ठरवावा व त्याचा पाठपुरावा करावा.

२. प्रत्येकाने आपण आपला किती वेळ, शारीरिक शक्ती व पैसा या कार्यासाठी देऊ शकतो ते स्वतःपुरते निश्चित करावे व कामाला सुरुवात करावी. याला मी TEM (Time, Energy, Money) असे म्हणतो. TME पासून व्यक्तिगत सत्ता, संपत्ती व प्रतिष्ठा यांची अपेक्षा असू नये. वर्षाच्या शेवटी याचा हिशोब स्वतःलाच द्यावा.

३. अशा समविचारी कृतिशील लोकांची प्रतिवर्षी दोन दिवसांची बैठक व्हावी.

४. सातारा येथे २ ऑक्टोबरला जोडून दोन दिवसांची अशी बैठक मी आयोजित करीत असतो. १९९४ मध्ये शिक्षण आणि समाजपरिवर्तन हा विषय होता. १९९५ मध्ये 'आपण (प्रथम पुरुषी एक वचनी) आणि नवभारताची जडणघडण' असा विषय होता. प्रत्येक वेळी सुमारे चाळीस जण उपस्थित होते. यावर्षीही २ ऑक्टोबरला अशी बैठक होईल. सर्वांचे स्वागत आहे परंतु कोणालाही निमंत्रित केले जाणार नाही असेही सर्वांना सांगितले आहे. व्यावहारिक रचना, प्रत्येकाने येण्याजाण्याचा खर्च स्वत: करावा. निवास भोजनादि व्यवस्था केली जाईल. त्यातही आपला सहभाग असावा असे कोणाला वाटल्यास त्यासाठी एक कॅश बॉक्स असेल. ती अशा पद्धतीने ठेवली जाईल की कोणी तिच्यात काही टाकले की नाही हेही कोणाला कळणार नाही.

याखेरीजही या चर्चासत्रात मला माझ्याकडून दोन गोष्टी सुचवावयाच्या आहेत.

१. वर्षभरात केव्हाही सातारला मला भेटण्यासाठी यावेसे वाटल्यास त्यांच्या सुखनिवासाची व्यवस्था सातारा येथेच असेल.

२. आपणा सर्वांना परस्पर संपर्क ठेवण्याच्या दृष्टीने काही रचना आवश्यक वाटत असल्यास या वर्षापुरती ती जबाबदारी मी स्वीकारू शकेन. माझ्या TEM मध्ये ती बसते.

शेवटी हे वर्तुळ वाढू शकते व सर्वोदयात आचार्यकुलात सदस्य नसलेले लोकही यात उत्साहाने सहभागी होऊ शकतात हा माझा अनुभव आहे.



## 'श्यामची आई' प्रथम प्रकाशन

'श्यामची आई' या पुस्तकाचे प्रकाशन माझे वडील कै० ती० धोंडो सखाराम कुलकर्णी यांनी केले हे कोणाला माहीत नाही.

माझे वडील कै० ती० धोंडो सखाराम कुलकर्णी अमळनेर येथे शिक्षक होते. सानेगुरुजी अमळनेरच्याच प्रताप हायस्कूलमध्ये शिक्षक म्हणून नोकरी करत होते. माझ्या वडिलांची व सानेगुरुजींची मैत्री होती. माझे वडील पुढील शिक्षणासाठी पुणे येथे गेले. पुणे येथे चित्रशाळा प्रेसने लहान मुलांसाठी 'शालापत्रक' नावाचे मासिक काढले होते. त्या चित्रशाळा प्रेसमध्ये माझ्या वडिलांना नोकरी मिळाली. माझे वडील 'शालापत्रका'त लहान मुलांसाठीच्या गोष्टी प्रसिद्ध करीत असत. एके दिवशी सानेगुरुजी पुणे येथे आल्याचे समजले. त्यांना भेटण्यासाठी माझे वडील गेले. माझ्या वडिलांनी सानेगुरुजींना विनंती केली की, लहान मुलांच्या मासिकासाठी आपण लेख द्यावा. साने गुरुजी म्हणाले, 'हे चार-पाच कागद तयार आहेत. त्यातील तुला जो कागद पसंत असेल तो घे.'

माझ्या वडिलांनी 'श्यामची आई'चा कागद उचलला आणि पुढील लिखाण शालापत्रकात पाठवावे अशी विनंती केली. ते लिखाण छापून पूर्ण झाल्यावर वाचकांनी विनंती केली की, 'श्यामची आई' पुस्तकरूपात यावे. माझे वडील सानेगुरुजींना भेटले व त्यांनी वाचकांची मागणी त्यांच्यासमोर ठेवली. अनाथ विद्यार्थी गृहातर्फे प्रकाशन करू या, असेही ते म्हणाले. सानेगुरुजींनी होकार दिला. अशा रीतीने 'श्यामची आई' पुस्तकाचे प्रकाशन अनाथ विद्यार्थी गृहातर्फे झाले.

**- म. धो. कुलकर्णी**

(लोकसत्ता १९-०९-०६ 'लोकमानस'च्या सोजन्याने.)

अनुक्रमणिका

# रसेलचे आत्मचरित्र

देवदत्त दाभोलकर



कुर्वन् एव इह कर्माणि
जिजीविषेत् शतम् समा: ।

रसेलचे माप दोन वर्षांनी उणे राहिले.

परंतु अखेरपर्यंतचा प्रत्येक क्षण रसेल यांनी चिंतनाने आणि कर्तृत्वाने शिगोशिग भरला होता.

अशा जीवनचिंतनाची कदर करणारे तीन पिढ्यातील लोक भक्तिभावाने रसेलचे ऋणी राहिले होते.

यानंतरच्या पिढ्यांतही राहतील.

वैचारिक जीवनाविषयी असा सहृदय आग्रह धरणारा व जनापवादाची खंत न करता आपल्याला योग्य वाटते त्याचा प्राणपणाने प्रचार करणारा अशा तोलामोलाचा विचारशील सॉक्रेटिसनंतर अडीच हजार वर्षांच्या काळात जगाने पाहिला नव्हता.

अशा उंचीचा माणूस सामान्याप्रमाणे आपल्यातच वावरत असतो तेव्हा त्याच्या उंचीचे आकलनही आपल्याला होणे कठीण असते.

परंतु, जगाच्या इतिहासाचा वेध घेणारे समर्थ इतिहासकार अर्नोल्ड टॉयनबी यांनी आपल्या सर्वांच्या वतीने हे कार्य केले.

रसेलच्या पंचाण्णवाव्या वाढदिवसाच्या निमित्ताने रसेलना भक्तिभावाने वंदन करणाऱ्या आपल्या पत्रात ते लिहितात : 'माझी आणि तुमची सुमारे अर्ध्या शतकापूर्वी प्रथम भेट झाली. प्लेटोने सर्व तत्त्वज्ञान्यांना केलेल्या आवाहनाला त्या वेळी तुम्ही नुकताच प्रतिसाद दिलेला होता. गुहेत बंदिस्त पडलेल्या हतभागी लोकांना सहाय्य करता यावे म्हणून आपल्याला लाभलेल्या प्रकाशाकडे पाठ फिरवून तुम्ही पुन्हा गुहेच्या अंधारात प्रवेश केला होता. अगदी शाब्दिक अर्थानेही त्या वेळी तुम्ही नुकतेच बंदीगृहातून बाहेर आला होता (बंदीगृहातून असेच यानंतरही अनेक वेळा तुम्हाला बाहेर यावे लागणार होते.) सक्तीच्या लष्करभरतीविरुद्ध जाहीर भाषण केल्याबद्दल त्या वेळी तुम्ही आपला पहिला तुरुंगवास भोगला होता.

'केवळ बौद्धिक क्षेत्रात महत्त्वाचे सर्जनशील कार्य करीत आपले जीवन व्यतीत करणे तुम्हाला शक्य होते. त्या क्षेत्रात आपल्या असामान्य कर्तृत्वाने तुम्ही आधीच आपले नाव केलेले होते. या कामात तुम्हाला तर खूप बौद्धिक रस होताच परंतु आपल्या जीवनाचा अर्थ समजण्यास मदत होण्याच्या दृष्टीने मानवतेलाही आपले ते कार्य उपकारक असेच होते. त्या दिशेने जावयाचे असे तुम्ही ठरवले असते तर तुम्हाला शांतपणे आपले जीवन व्यतीत करता आले असते आणि जगातील सर्व विद्वानांनी तुमचा एकमुखाने गौरव केला असता. अर्थात् या बौद्धिक क्षेत्रात त्या नंतरच्या कालखंडातही तुम्ही दैदीप्यमान यश मिळवीत आलेले आहात. परंतु आपले बौद्धिक जीवन कितीही समृद्ध असले तरी मानवतेविषयी तुम्हाला वाटणारी कणव तुम्हाला तेवढ्यावर आत्मसमाधान लाभू देत नव्हती. मानवाच्या विविध संघर्षात अलिप्त, तटस्थ भूमिका न घेण्याचा मनाचा मोठेपणा तुमच्या ठिकाणी होता. त्या काळापासून आजतागायत मानवी संस्कृतीच्या रक्षणासाठी तुम्ही झगडत राहिलेले आहात आणि अलीकडे अणु-अस्त्राच्या शोधानंतर तर मानवजातीच्याच रक्षणासाठी तुम्हाला झगडा द्यावा लागत आहे.

'गेल्या तीन पिढ्यांच्या दीर्घ कालखंडात तुमच्याहून वयाने लहान असणाऱ्या अनेकांना तुमच्यापासून स्फूर्ती आणि नवी आशा यांचा लाभ झालेला आहे. यासाठी मी तुमचा विशेष कृतज्ञ आहे. मानवतेविषयी कणव असणारे, व ती कणव कृतीत आणणारे तुमच्यासारखे लोक अस्तित्वात आहेत तोपर्यत मानवतेला विनाशापासून वाचवून तिचे मंगल भविष्य साकार करण्यासाठी प्रयत्नशील राहण्यात आमच्यासारख्यांना धीर व आत्मविश्वास वाटतो.

'आणि म्हणून गुरुवार दि. १८ मे १९६७ हा दिवस हा केवळ तुमच्या कार्याचे मोल जाणणाऱ्या

लक्षावधी लोकांच्याच दृष्टीने नव्हे तर अब्जावधी अखिल मानवजातीच्या दृष्टीने - त्या अब्जावधी लोकांना याची जाणीव नसली तरी देखील - एक ऐतिहासिक महत्त्वाचा दिवस आहे. तुमचे जीवन आता नुसते वैयक्तिक जीवन राहिलेले नाही. या विलक्षण मानवजातीच्या इतिहासावर तुम्ही आपल्या व्यक्तिमत्त्वाचा ठसा उमटविला आहे. प्रत्येक प्राणी हा निसर्गतःच आत्मकेंद्रित असतो. परंतु मानवी मनाची झेप या आत्मकेंद्रापासून विश्वाच्या अंतिम सत्याकडे असली पाहिजे. मानवी जीवनाचे यातच सार्थक आहे. ही सार्थकता तुम्ही मिळविली आहे. यासाठीच तुमच्याविषयी मला सतत प्रेम आणि कृतज्ञता वाटत आलेली आहे. आणि या कारणासाठीच १८ मे १९६७ हा दिवस माझ्यासारख्या तुमच्या असंख्य मित्रांना एक सुखाचा व आशेचा दिवस वाटतो.

सदैव तुमचा
अर्नोल्ड टॉयन्बी

आइनस्टाईनने एकदा लिहिले होते :

'आजच्या नीरस आणि पाशवी पिढीत रसेलसारखा सूज्ञ, सुशील, धैर्यशील (आणि शिवाय विनोदप्रिय ) अशा वृत्तीचा एखादा आदर्श आपल्यासमोर आहे हे आपले सद्‌भाग्य आहे असे मी समजतो.'

ही मान्यता रसेलना सहजपणे मिळाली नव्हती. एखाद्या कृतिशील विचारशीलाला प्रतिकूल परिस्थितीत एकाकीपणे सहन करावे लागले ते सर्व रसेल यांनी निर्धाराने सतत सहन केले होते. पहिल्या महायुद्धाच्या सुरवातीपासून ते आपल्या अखेरच्या श्वासापर्यंत रसेलच्या मुखावाटे मानवतेची सदसद्‌विवेकबुद्धी आपली वेदना प्रकट करीत होती. इतरांनी केव्हा साथ दिली. कधी कोणी दिली नाही. कालचे मित्र आज शत्रू बनले. स्तुती करणारे रसेलची भूमिका न रुचताच निंदक बनू लागले. रसेलच्या वैवाहीक जीवनाचा अपप्रचार सुरू होऊ लागला. परंतु रसेल तरुण वयात कधी विरोधाने, अपप्रचाराने, छळाने खचले नव्हते - शेवटपर्यंत कधी खचले नाहीत. "आपल्याला म्हातारचळ लागला आहे" अशा प्रवादाच्या मागे छपून आपण मांडलेल्या विचारांना विचाराने उत्तर देण्याचे आपले विरोधक टाळतात यासाठी त्यांना त्या प्रवादाची खंत वाटे. नसलेला व्यक्तिगत उणेपणा कोणी का काढावा ...। स्वरूपाचा त्यांचा राग नसे.

घनतिमिरात मानवतेच्या क्षितिजावर हा तारा एकाकीपणाने आपल्या प्रकाशाचा आघात करण्याचा प्रयत्न करीत होता. पहिल्या महायुद्धाच्या वेळी आपल्या युद्धविरोधी भूमिकेविषयी लिहिताना रसेलनी म्हटले आहे : 'माझ्या निषेधाचा प्रभाव पडेल अशी माझी मुळीच अपेक्षा नव्हती, परंतु वर्तमान परिस्थितीत आपला निषेध न नोंदवणे हा आपल्यातील माणुसकीचा अवमान होईल असे मला वाटले.'

रसेलच्या निषेधाचा प्रभाव उत्तरोत्तर अधिकाधिक पडत गेला. विविध राष्ट्रांच्या नेत्यांना आपली भूमिका रसेलपुढे आवर्जुन स्पष्ट करणे अगत्याचे वाटू लागले. भारत-चीन संघर्षाच्या वेळी चौ-एन-लाय् व जवाहरलाल या दोघांनीही रसेल यांना लिहिलेली पत्रे या आत्मचरित्रात समाविष्ट आहेत.

प्रत्येक वेळी रसेलना आपल्या भूमिकेसाठी प्रथम एकाकीपणे उभे रहावे लागले. काही वेळा इतरांचा नंतर प्रतिसाद मिळाला तरी, कार्यामागील मुख्य प्रेरणा, श्रम आणि अनेकदा पैसा देखील रसेल यांचीच असत. रसेल लॉर्ड असले तरी अशा कार्यासाठी पुरू शकेल अशी त्यांची सांपत्तिक स्थिती नव्हती. एका पत्रात रसेल यांनी ओझरता निर्देश केला आहे. 'काल बोलता बोलता मी फारच भडकलो असे आता मला वाटते. परंतु अमेरिकेत मला प्राध्यापकाच्या जागेवरून दूर करण्यात आल्यानंतर मी व माझे कुटुंबीय प्रत्यक्ष उपासमारीच्या दारात उभे होतो आणि अकल्पितपणे त्यावेळी मला मिळालेली मदत मला मिळाली नसती तर अशा उपासमारीपासून आमची सुटका नव्हती हे तुम्हाला माहीत झाले तर कदाचित् याविषयींच्या माझ्या भावना इतक्या तीव्र का आहेत याची कल्पना तुम्हाला येऊ शकेल.' दुसऱ्या एका कार्याविषयीही 'आता माझ्या जवळचा पैसा संपत आलेला आहे व हे कार्य पुढे चालू ठेवायचे असेल तर त्यासाठी एखादी स्वतंत्र संस्था काढण्याखेरीज गत्यंतर नाही,' असा निर्देश अन्यत्र रसेल यांनी केलेला आहे.

आपल्यातील माणुसकीचा अवमान रसेल यांनी कधी होऊ दिला नाही. आपला निषेध वेळोवेळी निःपक्षपातीपणे, निर्भयपणे, कृतिशील निर्धाराने ते सतत नोंदवीत राहिले. 'तुमच्या उंचीच्या कोणत्याही माणसाने याबाबतीत आपला निषेध नोंदविला नाही' हे

आइनस्टाईन यांनी रसेल यांना एका संदर्भात दिलेले श्रेय रसेलचे सततचे श्रेय राहिले.

कोणत्याही विचारशीलाच्या जीवनात याहून अधिक श्रेयस्कर असे काय असू शकेल?

रसेल यांनी आपल्या जीवनश्रेयाची कल्पना स्पष्ट केली आहे.

'माझ्या जीवनात सरल परंतु अत्यंत प्रबळ अशा तीन प्रेरणा आहेत. प्रीतिविषयक समुत्कण्ठा, ज्ञान-विषयक जिज्ञासा आणि मानवतेच्या दुखा:विषयीची व्याकुळ करून टाकणारी करुणा या त्या तीन प्रेरणा होत. एखाद्या झंझावाताप्रमाणे या तीन प्रेरणांनी दु:खाच्या सागरावर माझे तारू इतस्ततः फिरवले आहे व निराशेच्या परिसीमेचे दर्शन मला घडवले आहे.

'प्रीति आणि ज्ञान, ज्या प्रमाणात ती साध्य होत त्या प्रमाणात, मला स्वर्गाच्या दिशेने उन्नत करीत. परंतु करुणा नेहमी मला मागे खेचून आणीत असे. दु:खितांच्या किंकाळ्यांचे प्रतिध्वनी माझ्या अंत:करणात पुनर्निनादित होत राहतात. दुष्काळात उपासमार होणारी बालके, जुलूमकर्त्याच्या तावडीत सापडलेले दुबळ जीव, आपल्या मुलांना दु:सह भार वाटणारी वृद्ध माणसे, आणि जगातील सर्व एकाकीपणा, दारिद्र्य आणि वेदना ही सर्व मानवतेच्या मंगल आदर्शांची विटंबना करीत असतात. हे दु:ख दूर करावे असे मला वाटते, परंतु मी ते करू शकत नाही ही माझी वेदना आहे.

'माझे जीवन हे असे आहे. या जीवनात मला जरूर अर्थ वाटतो आणि तशी संधी कोणी देऊ केली तर पुन्हा अशा जीवनाचा मी आनंदाने स्वीकार करीन.'

पहिल्या महायुद्धाच्या प्रारंभापर्यंतच्या रसेलच्या जीवनाचा कालखंड हा मुख्यत्वेकरून ज्ञानसाधनेचा कालखंड होता 'अगदी बालपणापासून मला दोन गोष्टींचा ध्यास होता. कोणतेही खरे ज्ञान शक्य आहे काय ते पहावे ही एक व जगाला अधिक सुखी करण्यासाठी जे करणे शक्य आहे ते करावे ही दुसरी. वयाच्या अडतिसाव्या वर्षापर्यंत माझी बहुतेक शक्ती मी ज्ञानसाधनेच्याच कामी लावली होती. लोकांना धार्मिक श्रद्धा जितक्या उत्कटपणे हवीशी वाटते तितक्या उत्कटतेने मला निश्चित ज्ञानाची ओढ लागलेली होती... त्यानंतर पहिले महायुद्ध सुरू झाले. १९१० ते १९१४ हा माझ्या जीवनातील परिवर्तनाचा एक महत्त्वाचा कालखंड होय. मेफिस्टॉफिलिसशी फाऊस्टची गाठ पडण्याच्या आधीच्या व नंतरच्या फाऊस्टच्या जीवनात जमीन - अस्मानाचा फरक पडला तसा या कालखंडाच्या आधीच्या व नंतरच्या माझ्या जीवनात घडून आला. पहिल्या महायुद्धानंतर मानवाची मूढता आणि त्यातून निर्माण होणारे मानवाचे दु:ख यावर माझे लक्ष अधिक केंद्रित झाले.'

विचारशीलाच्या दृष्टीने एक अत्यंत महत्त्वाचे कसोटीचे असे हे परिवर्तन होते. विचार हे कृतीपेक्षा अधिक महत्त्वाचे आहेत कारण योग्य विचार पाठीशी नसेल तर कृती विफल तरी होते किंवा विपरित परिणामकारी होते. हे विधान सत्य आहे आणि म्हणूनच या संरक्षणाच्या आड विचारशील आपली कृतिशून्यता लपवू शकतो. रसेल कृतीच्या क्षेत्रात उतरू लागले तेव्हा त्यांच्याविषयी प्रेमादर असणाऱ्या लोकांनी त्यांना आपल्या वैचारिक कार्यावरील लक्ष विचलित होऊ न देण्याची आग्रहपूर्वक विनंती केली. इंग्लंडच्या युद्ध मंत्र्यांनी रसेल यांना बोलावून घेऊन 'निदान आपली विनोदबुद्धी कायम ठेवून तरी तुम्ही गोष्टी अशा सत्याग्रही निकराला आणू नका' म्हणून त्यांना इशारा दिला. रसेलना विनोदबुद्धी शिकविण्याचा प्रयत्न एखाद्याने करावा यासारखा दुसरा विनोद नसेल. रसेल पुढे एकदा म्हणाले, 'याचे उत्तर माझ्या अगदी जिभेच्या टोकावर आले होते. दररोज वर्तमानपत्रात मृतांचे आकडे पाहिले की माझी हसून हसून अगदी मुरकुंडी वळते असे मी त्यांना सांगणार होतो. परंतु मी स्वत:ला आवरले.

'आपल्या निष्क्रियतेवर पांघरूण म्हणून निराशा-वाद पांघरणाऱ्या लोकांचा एक वर्ग असतो. रसेलनी या लोकांचे निदानही केले आहे. 'आजच्या संकटमय परिस्थितीत दु:ख व संहार यांच्याविषयी आकर्षण वाटणारेही अनेक लोक मला आढळतात. काही आशेचा मार्ग सुचविला की या लोकांना राग येतो. आजच्या परिस्थितीत काही आशा बाळगणे हे निर्बुद्धपणाचे आहे असे त्यांना वाटते. आपण निराश होऊन जडपणे स्वस्थ बसणे हे सद्य:परिस्थितीला साजेसेच आहे असे या लोकांना वाटत असते. अशा लोकांशी मी सहमत होऊ शकत नाही. आज जगात आशा जिवंत राखावयाची असेल तर बुद्धी आणि उत्साह असणाऱ्या लोकांची गरज

आहे. निराशेने ग्रासलेल्या लोकांत मुख्यत्वेकरून उत्साहाचा अभाव असतो.'

पहिल्या महायुद्धाच्या काळात रसेलनी सक्तीच्या लष्करभरतीस विरोध केला. त्यात रसेलची संपूर्ण सत्याग्रह निष्ठा कसोटीला लागली. (रसेलनी आपली सत्याग्रहाची भूमिका गांधीजींपासून स्वीकारली असा कोठेही निर्देश नाही. गांधीजींचा निर्देशही रसेलच्या आत्मचरित्रात एकदाच आलेला आहे. तो गौरवपर आहे. परंतु त्यात व्यक्तिगत ऋणाची कल्पना नाही.) सर्व राष्ट्राची युद्धकाळातील अंध परंतु उत्कट देशभक्तीची भावना रसेलच्या विरोधी होती. रसेलची स्वत:ची देशभक्ती उत्कट होती व जनसमुदायाबरोबर समरस व्हावे अशी त्यांची अंत:करणाची सदैव ओढ असे असे त्यांनी अनेक ठिकाणी नमूद केले आहे. अशा स्थितीत जनमानसातील तीव्र भावनावेगापासून दूर राहणे, किंबहुना प्रथमदर्शनी देशद्रोही वाटेल अशी भूमिका घेणे त्यांना किती मानसिक यातनेचे झाले असेल याची कल्पना करता येईल.

युद्ध अनिष्ट आहे हे ठरल्यानंतर रसेलसमोर आणखी एक नैतिक पेचप्रसंग निर्माण झाला. एका इंजिनीअरिंग कारखान्याचे तीन हजार पौंडाचे कर्जरोखे रसेलच्या मालकीचे होते. युद्ध सुरू झाल्यानंतर साहजिकच हा कारखाना युद्धोपयोगी साहित्याच्या निर्मितीकडे वळणार होता. अशावेळी आपण या कर्जरोख्याचे काय करणे युक्त होईल असा पेचप्रसंग रसेलपुढे येऊन उभा राहिला. त्याचे नीटसे उत्तर आपल्याला सुचले नाही व आपण शेवटी ते कर्जरोखे टी. एस. इलियटला दिले, असे रसेलनी नमूद केले आहे. पुढे लढाई संपल्यानंतर व इलियटचीही आर्थिक स्थिती सुधारल्यानंतर इलिअटने ते कर्जरोखे रसेलना परत केले. (अशा गोष्टीचा तात्त्विक कीस काढणाऱ्या लोकांना आजही त्या कर्जरोख्यांचे रसेलनी काय करावयास हवे होते हा एक आकर्षक कूट प्रश्न वाटू शकेल.)

आपल्या भूमिकेसाठी रसेलना सहा महिने तुरूंगवासाची शिक्षा झाली. ट्रिनिटी कॉलेजमधील त्यांच्या नोकरीतून त्यांना मुक्त करण्यात आले. तुरुंगवासाविषयीची त्यांची चिंता त्यांनी एका पत्रात व्यक्त केली आहे. तेथेही त्यांच्यातील वैचारिक जीवनविषयक आस्था स्पष्ट होते व त्यामुळेच व्यक्तिगततरि[illegible] एवढा मोठा स्वार्थत्याग रसेल या सत्याग्रहात करत होते याची कल्पना येते. रसेल लिहितात : 'मला भीती एवढीच वाटते की तुरुंगवासातील खडतर जीवनाचा कदाचित् माझ्या बौद्धिक कुवतीवर विपरित परिणाम होईल आणि मग तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात सखोल चिंतन करण्याची माझी मनीषा मला पूर्ण करता येणार नाही.

जनमानसाला अत्यंत जिव्हाळ्याच्या वाटणाऱ्या अशा आणखी दोन विषयांच्या संदर्भात जनमानसाच्या अगदी निखालसपणे विरोधी अशा प्रक्षोभक भूमिका रसेलनी घेतल्या होत्या. वैवाहिक नीतिमत्तेचा प्रश्न हा त्यापैकी एक विषय होय. देवधर्माविषयक कल्पना हा असाच एक दुसरा प्रक्षोभक विषय होय.

'वैवाहिक नीती' (Marriage and Morals) हे रसेलचे गाजलेले पुस्तक. या पुस्तकात रसेलने प्रतिपादन केलेले विचार आणि त्याच्या स्वत:च्या आयुष्यात त्याने केलेला स्त्रीसहवास - तीन घटस्फोट व एकूण चार विवाह - हा रसेलच्या विरोधकांच्या दृष्टीने त्यांना उपलब्ध असलेला अमोघ दारूगोळा होय. अगदी शेवट शेवटपर्यंत रसेलच्या चरित्रविषयक मुलाखती घ्यावयास येणारे लोक या भागाकडे लक्ष केंद्रित करण्याचा प्रयत्न करीत. रसेलला अनीतिमान् ठरवून अमेरिकेतील एका महाविद्यालयातून काढून टाकण्याचा निर्णय अमेरिकेतील एका न्यायाधीशाने दिला तो, मुख्यत्वे करून, 'वैवाहिक नीती' या रसेलच्या पुस्तकातील विवेचनाने कलुषित मत बनवून घेऊनच देण्यात आला होता. रसेलना आपल्यावरील आरोपांना उत्तर देण्याची काहीच संधी या खटल्यात मिळू शकली नाही, कारण हा दावा एका पालकाने रसेल यांची नेमणूक करणाऱ्या महाविद्यालयावर लावला होता. रसेलना यामुळे या दाव्यात प्रतिवादी म्हणून स्थानच नव्हते. महाविद्यालयाला आपला किंवा रसेलचा बचाव करण्याची इच्छा नव्हती. निकालाविरुद्ध वर अपील करण्यात यावे ही रसेलची सूचनाही महाविद्यालयाने मानली नाही व रसेलना कामावरून दूर केले. अध्यापकांना आपली सामाजिक मते स्वतंत्रपणे मांडण्याचे स्वातंत्र्य किती असावे याचा पुन्हा एकदा भरपूर काथ्याकूट झाला. परंतु बहुतेक विद्यापीठे ही, बाहेरून कोणी आपण केलेल्या नेमणुकीत हस्तक्षेप करू नये येथपर्यंत विद्यापीठाच्या स्वयंशासनाचे समर्थन करणारी होती. अध्यापकांच्या

स्वातंत्र्याचा प्रश्न त्यांना महत्वाचा वाटत नव्हता.

रसेल यांना बचावाची संधी मिळाली असती तरी काही वेगळा निर्णय लागू शकला असता की नाही हाही एक प्रश्न आहे. किंबहुना त्या न्यायाधीशापुढे तरी तशी अपेक्षा बाळगणे चुकीचे ठरले असते. आपल्याहून अनेकपटीने श्रेष्ठ असणारी व्यक्ती प्रसंगवशात आपल्या तावडीत आली असता क्षुद्र माणसांना ज्या उर्मटपणाचा आवेश येतो त्याचा प्रत्यय त्या निकालपत्रातील वाक्य वाचताना येतो. परंतु अधिक सौम्यपणे लिहूनही एखाद्या न्यायाधीशाने हाच निर्णय कायम ठेवला असता ही शक्यताही नाकारता येत नाही.

सनातन चालत आलेली स्त्रीपुरूषसंबंधविषयक नीतिमत्ता ज्यांना अभिप्रेत आहे त्यांना रसेलची मते विकृत वाटली तर नवल नाही. परंतु चालत झालेल्या व्यवस्थेत काही बदल करणे आवश्यक आहे असे ज्यांना वाटते त्यांच्यामध्येही, प्रत्यक्षात कोणती नवी बंधने किंवा मर्यादा स्वीकाराव्यात याविषयी मतभेद होऊ शकेल. पहिल्या वृत्तीचे लोक रसेलना कडवा विरोध करतील तर दुसऱ्या वृत्तीचे लोक रसेलना समजून घेण्याचा प्रयत्न करतील.

वैवाहिक नीतिमत्तेत लैंगिक एकनिष्ठतेचा आग्रह धरण्याचे कारण नाही, आंतरिक प्रेम असेल तर संतती निर्माण होणार नाही अशी दक्षता घेऊन स्त्रीपुरुषांनी मुक्तपणे सहवास करावयास हरकत नाही, असे रसेलचे विवेचन होते. ही भूमिका पुढे पुढे रसेलनाही पेलेनाशी झाली असा निर्देश रसेलनी आपल्या आत्मचरित्रात केला आहे. रसेल लिहितात : 'आज विवाहसंस्थेविषयीचे माझे विचार माझे मलाच स्पष्ट नाहीत. विवाहसंस्थेविषयी कोणताही एखादा सार्वत्रिक सिद्धांत मांडण्याच्या मार्गात अनेक दुर्लंघ्य अडचणी आहेत असे दिसते. घटस्फोट सुलभ ठेवणे हे इतर कोणत्याही रचनेपेक्षा दु:खाला कमी कारणीभूत होईल असे वाटते, परंतु विवाहविषयक प्रश्नांच्याबाबत कोणतीही आग्रही भूमिका मी आज घेऊ शकेन असे मला वाटत नाही.'

स्त्रीप्रेमाची, स्त्रीसहवासाची रसेलना उत्कट भूक होती. रसेलकडे प्रेमादराने पाहणाऱ्या अनेक स्त्रिया त्यांच्या जीवनात साहजिकपणेच येऊन गेल्या. कोणतीही स्त्री त्यांना समपातळीवर बौद्धिक प्रतिसाद देऊ शकली नाही असे आपले दु:ख त्यांनी सांगितले आहे, खऱ्या प्रीतीचा साक्षात्कार लाभून मनावरील इतर ताण कमी झालेसे वाटावे असा अनुभव त्यांना अनेकदा आला परंतु परत परत हे मृगजळ आहे असेही त्यांच्या अनुभवास येऊ लागले. आपल्या आत्मचरित्राच्या पहिल्या खंडाच्या प्रारंभी 'To Edith' म्हणून एडिथला उद्देशून लिहिलेली अर्पण पत्रिका रसेलच्या हस्ताक्षरात छापली आहे :

**प्रिय एडिथ**

युगे युगे
मी शोध घेत आहे
आंतरिक शांतीचा -
उल्हासात - दु:खात -
विमनस्कतेत -
एकाकी आर्ततेत
हृदयात सलणाऱ्या
असहाय वेदनेच्या आत
- सदाकाल आणि सर्वत्र
परंतु शांती -
कधी कुठे गवसली नाही.
आता ही उतरण -
अंत समोर दिसत आहे
परंतु अंतरीची खूण पटली आहे
तुझ्या एका अभिप्रायात
उल्हास आणि शांती
दोन्ही मला गवसली आहेत.
शांति: शांति:
अनेक वर्षांच्या
एकाकी वाटचालीनंतर
जीवनाचा हेतू
प्रीतीचे साफल्य
यांचा साक्षात्कार
मला झाला आहे
आता डोळे मिटतील
पण तृप्त सार्थकतेने.

या समाधानाने अखेरपर्यंत रसेल यांची साथ केलेली असेल तर ते त्यांचे सद्भाग्य म्हणावे लागेल. या एकाकीपणातून मुक्त होण्याचे वरदान नियतीने मानवाला दिलेले नाही. मानवाची आर्त धडपड त्यासाठीच सुरू






होते आणि, अशाच एखाद्या आभासाच्या प्रभावाखाली असताना त्याचा अंत झाला नाही तर, ही आर्तता अखेरच्या क्षणापर्यंत त्याची साथ करीत राहते. या आर्ततेपासून सुटका होण्याचा एक मार्ग म्हणून माणूस देवाधर्माच्या, अध्यात्माच्या मागे लागतो. ती मनाला आणलेली एक सात्विक परंतु गुंगीच आहे. या गुंगीचाच अनेकांना कैफ चढतो. अशा कैफात विविध धर्माच्या नावाखाली इतिहासात झालेले अमानुष अत्याचार पाहिले की तिच्या सात्विक उपयोगाविषयीही शंका वाटू लागते.

रसेल यांनी अखेरपर्यंत या गुंगीच्या सात्विक मोहापासून स्वतःला दूर ठेवले. १९४८ साली याचे एक प्रत्यंतर मिळाले. नॉर्वेकडे व्याख्यानासाठी जात असता रसेल यांच्या विमानाला समुद्रात अपघात झाला. रसेल विमानाच्या ज्या भागात बसले होते त्या भागातील उतारू पाण्यात उड्या टाकून जवळ आणलेल्या होड्यांपर्यंत पोहत जाऊ शकले. रसेल यांचेही प्राण याच पद्धतीने वाचू शकले.

या अपघातानंतर अर्थातच रसेल यांच्यावर वृत्तपत्रकारांनी फोनचा भडिमार केला. कोपेनहेगनहून एकाने विचारले,

'तुम्ही पाण्यात पडला तेव्हा तुम्हाला काय वाटले? काही अध्यात्मिक विचार तुमच्या मनात आले नाहीत?'

'नाहीत.'

'मग नेमके काय वाटले?'

'मला वाटले - पाणी फार थंड आहे' आणि रसेलनी फोन खाली ठेवला.

रसेल यांची मूलभूत ओढ खऱ्या अर्थाने अध्यात्मिकच होती. परंतु मनाच्या फसव्या समाधानासाठी ते आपल्या तर्कशक्तीचा गैरवापर करावयास तयार नव्हते. ज्याला व्यावहारिक जीवनाच्या पलीकडील गूढ अनुभव असे म्हणता येईल अशा आपल्याला आलेल्या एका अनुभवाचीही नोंद रसेलनी केली आहे.

अनुभव १९०१ मधील आहे.

'मी आणि माझी पत्नी ॲलिस घरी आलो तेव्हा श्रीमती व्हाइटहेड (तत्त्वज्ञ व्हाइटहेड यांच्या पत्नी) तीव्र शारीरिक वेदनेने व्याकुळ झालेल्या होत्या. त्यांचा आणि आमचा सर्वांचा, सर्व वस्तूंचा संबंध त्या व्याकुळ वेदनेच्या आघाताने तुटला होता. मानव हा किती असहाय आणि एकाकी आहे याची मला अकस्मात उत्कट जाणीव झाली. माझ्या विवाहानंतरचे माझे भावजीवन शांत परंतु उथळ स्वरूपाचे असे होते. सर्व मूलभूत समस्यांचा मला विसर पडला होता व मी वरवरच्या बौद्धिक चलाखीत समाधान मानत होतो. परंतु आता अकस्मात् माझ्या पायाखालची जमीन हादरली होती आणि मी एका वेगळ्याच प्रदेशात फेकला गेलो होतो. पाच मिनिटांच्या अवधीत माझ्या मनात या स्वरुपाचे विचार येऊन गेले : मानवी प्राण्याचे एकाकीपण असह्य आहे; धार्मिक साधुसंतांनी सांगितलेल्या प्रेमाखेरीज अन्य कशानेही या एकाकीपणापर्यंत आपल्याला जाऊन पोचता येणार नाही; या एका प्रेरणेखेरीज इतर सर्व प्रेरणा घातक आहेत-निदान व्यर्थ आहेत. मानवमानवामधील संबंधात दुसऱ्याच्या अंतःकरणातील या एकाकीपणाला साद घालण्याचा प्रयत्न आपण केला पाहिजे... या पाच मिनिटांनंतर मी एकदम पार बदलून गेलो. रस्त्यात भेटणाऱ्या प्रत्येक माणसाचे अंतरातील खोल विचार मला कळत आहेत असे मला भासू लागले. हा अर्थातच एक भ्रम होता. परंतु मी या अनुभवानंतर माझ्या सर्व मित्रांच्या व अनेक ओळखीच्या लोकांच्या कितीतरी अधिक जवळ जाऊ शकलो ही मात्र सत्य वस्तुस्थिती आहे.'

परंतु ईश्वर, स्वर्ग, पुनर्जन्म या गोष्टी मानवी मनाला कितीही हव्याशा वाटल्या - किंबहूना त्या आहेतच असा मनोमन साक्षात्कार झाला - तरी त्यांचे अस्तित्व त्यामुळे सिद्ध होत नाही आणि या अनाकलनीय विश्वात जर आपण एकाकी असे फेकले गेलेलोच आहोत तर त्या एकाकीपणाचा स्वीकार आपण मानवाला साजेशा प्रतिष्ठेनेच निर्भयपणे केला पाहिजे अशी रसेल यांची शिकवण होती. आपण असहाय्य आहोत म्हणूनच काल्पनिक देवदेवतांच्यापुढे दीनपणे याचना न करण्याची हिंमत दाखविण्यातच मानवाची प्रतिष्ठा आहे अशी त्यांची भूमिका होती. देवधर्मविषयक भ्रामक कल्पनांचा निरास म्हणजे मानवी जीवनातील मांगल्याचा प्रतिवाद नव्हे हे त्यांनी परोपरीने व उत्कट आग्रहाने सांगितले आहे. ईश्वरावर श्रद्धा नसणाऱ्या माणसाला जीवनातील मांगल्यावर किती उत्कट श्रद्धा ठेवता येते याचे सहृदय वाचकाच्या वृत्ती हेलावणारे वर्णन रसेलनी 'ए फ्री मॅन्स वर्शिप' ('अश्रद्धाचे मुक्तिसाधन') या आपल्या निबंधात केले आहे.





पांथिक धर्मनिष्ठांना या भूमिकेबद्दल रसेलचा द्वेष वाटणे साहजिक होते. याचे प्रत्यंतर चीनमध्ये आजारी-पणामुळे रसेलचे निधन झाल्याची वार्ता (पहिल्या महायुद्धानंतरच्या रसेलच्या चीनमधील निवासाच्या कालखंडात) आली त्या वेळी आले. एका मिशनरी वृत्तपत्राने एका ओळीत या वार्तेची दखल घेतली होती. 'श्री. बर्ट्रांड रसेल यांच्या निधनाच्या वार्तेमुळे मिशनरी लोकांनी सुटकेचा निश्वास सोडला तर त्याबद्दल त्यांना क्षमा केली जाईल अशी आशा आहे.'

ज्यांचा देवधर्माचा आधार सुदैवाने किंवा दुर्दैवाने तुटलेला आहे अशा सर्व 'अश्रद्ध मुक्तिसाधकां'ना रसेलविषयी वाटणारी भावनिर्भर कृतज्ञता जोसेफ कॉन्रॅड यांनी रसेल यांना लिहिलेल्या १९१३ मधील एका पत्रात व्यक्त झाली आहे. ते लिहितात :

' "अश्रद्धाची मुक्तिसाधना" या तुमच्या उत्कृष्ट निबंधाबद्दलचे तुमचे ऋण केवळ सखोल प्रेमादराच्या भावनेनेच, केले तर, फक्त करता येईल. तुमची माझी भेट पुन्हा कधी झाली नाही आणि उद्या तुम्हाला माझ्या अस्तित्वाचादेखील विसर पडेल तरी अखेरच्या क्षणापर्यंत माझ्या या कृतज्ञतेच्या भावनेत कधी अंतर पडणार नाही.'

मानवतेच्या या महान उपासकाने जनसमूहाच्या रागालोभाची कदर कधी केली नाही. रसेल यांच्या सर्व विविध भूमिकांमधून व कधीकधी वेगवेगळ्या कालखंडात परस्परविरोधी अशा त्यांनी घेतलेल्या भूमिकांतूनही मानवाच्या सद्य:स्थितीविषयी व मानवजातीच्या भवितव्याविषयी त्यांच्या मनात सतत वसत आलेल्या आस्थेचे व चिंतेचे एकमेव मध्यसूत्र आपल्याला पाहावयास मिळते. या सूत्राचे आकलन झाले की रसेल यांनी वेळोवेळी अशा भूमिका का घेतल्या याचेही कोडे उलगडू लागते.

या सर्व भूमिकांच्या तपशीलात आज या ठिकाणी जावयाचे आपल्याला कारण नाही. या सर्व भूमिकांच्या मागे विचारशील या नात्याने उभ्या असलेल्या रसेलच्या व्यक्तिमत्त्वाचे विवेचन या ठिकाणी आपल्याला अभिप्रेत आहे. पहिल्या महायुद्धाच्या वेळी युद्धाला विरोध करणारे रसेल दुसऱ्या महायुद्धात, हुकूमशाहीच्या विजयाने मानवतेवर होणाऱ्या विपरित परिणामाच्या दर्शनाने, आपल्याला वयोमानाप्रमाणे लोकशाहीच्या बाजूने प्रत्यक्ष लढाईत सहभागी होता येत नाही या गोष्टीचे दु:ख करू लागले. अणुअस्त्र रशियात उपलब्ध होण्याच्या आधीच अमेरिकेने आपल्या अणु-क्षेत्रातील सामर्थ्याचा वापर करून रशियाला नामोहरम करावे असे प्रतिपादन करणारे रसेल, रशियालाही ते अस्त्र उपलब्ध झाल्यानंतर, 'आता रशिया व अमेरिका यांमधील युद्ध सर्व मानवजातीच्या दृष्टीने सर्वसंहारक ठरेल व म्हणून कोणत्याही परिस्थितीत असे युद्ध टाळणे हे आद्य महत्त्वाचे आहे' अशी भूमिका मांडू लागले, क्यूबाच्या समरप्रसंगाच्या वेळी याचसाठी त्यांनी आपल्या जिवाचा सर्व आटापिटा केला व क्रुश्चेव्हने शेवटी आपली व रशियाची इभ्रत पणाला लागली असताही जहाजे परत फिरवली यासाठी क्रुश्चेव्हला धन्यवाद दिले. साम्यवाद यशस्वी होण्यापेक्षा मानवजात नष्ट झाली तरी चालेल अशी कडवी भूमिका घेणारे लोक रसेलला दोष देऊ शकतील. रसेल यांची विनम्र भूमिका एवढीच आहे की मानवजात अस्तित्वात राहिली तर, काही काळ ती कितीही अडचणीत आली तरी, अखेर केव्हा ना केव्हा तरी ती आपल्या मंगल भविष्याकडे जाऊ शकेल; परंतु मानवजातच जर नष्ट झाली तर सर्वच ग्रंथ आटोपेल. असा मानवतेचा सर्वविनाशक संहार अणुयुद्धाने होईल की नाही हा वादाचा विषय होऊ शकेल. अशा युद्धाने कदाचित कित्येक कोटी माणसे मरतील (युद्धाच्या पहिल्या तासातच तीस कोटीहून अधिक माणसे मरतील हे गणित तर सर्वांनाच मान्य आहे) परंतु मानवजात काही पूर्णपणे नष्ट होणार नाही असे मानणारे लोक साम्यवाद की भांडवलशाही किंवा साम्यवाद की लोकशाही या प्रश्नाची तड लावण्यासाठी अणुयुद्धाचा धोकाही आपण स्वीकारला पाहिजे अशी भूमिका मांडतात. भांडवलशाही राष्ट्रांच्या निर्मूलनासाठी व साम्यवादाच्या प्रस्थापनेसाठी हा धोका आपण स्वीकारला पाहिजे अशी माओ याची स्पष्ट भूमिका आहे. लोकशाहीच्या प्रस्थापनेच्यासाठी व साम्यवादाच्या विनाशासाठी अमेरिकेने हा धोका स्वीकारला पाहिजे अशी भूमिका घेणारेही लोक आहेत. आपण विजयी होऊ व मानवजात पूर्णपणे नष्ट होणार नाही अशी एक अपेक्षा या विचारसरणी मागे असते. रसेल यांनी यातील धोका जगाला स्पष्टपणे कळावा म्हणून जगातील नामवंत शास्त्रज्ञांच्या सहीने याविषयीचे एक स्पष्ट निवेदन तयार केले. या निवेदनावर आइनस्टाईन यांनी आपल्या मृत्यूपूर्वी काही दिवसच सही केली होती. ( या घटनेतील नाट्यमयतेचाही निर्देश रसेल



अनुक्रमणिका

यांनी आपल्या आत्मचरित्रात केला आहे. आइनस्टाईन आपल्याला पाठिंबा देतील अशी रसेल यांना आशा होती. विमानातून रोमकडे जात असताना आइनस्टाईनचा मृत्यू झाल्याची वार्ता विमानाच्या ध्वनिक्षेपकावर देण्यात आली. व्यथित व निराश झालेले रसेल आपल्या स्थळी जाऊन पोहोचले तेव्हा त्यांच्या निवेदनाला आपली अनुमती देणार आइनस्टाईनेच पत्र त्यांची वाट पाहत होते.) रसेल यांच्या मनातील भीती ही काही केवळ त्यांच्या कल्पना-जालातून निर्माण झालेली नव्हती हे दर्शविण्याच्या दृष्टीने या निवेदनाचे महत्त्व आहे. वस्तुस्थितीच्या भयानकतेचे आकलन ज्यांच्या कल्पनाशक्तीलादेखील होऊ शकत नाही असे, मुलतःच अंध असलेले लोक, किंवा एखाद्या पूर्वग्रहाच्या प्रभावाने दृष्टिदोष निर्माण झालेले लोक अणुयुद्धाच्या परिणामाविषयी बेफिकीरपणे बोलू शकतात. दुर्दैवाने रसेलसारख्या लोकांच्या मनातील भीती योग्य आहे की नाही याचा निर्णय अणुयुद्ध झाल्याखेरीज लागू शकणार नाही आणि युद्ध झाले आणि त्यांची भीती खरी ठरली तर मग त्यांच्या भविष्याच्या यथार्थतेचे श्रेय कोण कोणाला देणार?

रसेल यांच्या मनात दलित-पीडितांच्या विषयी कणव होती, त्याचप्रमाणे व्यक्तिस्वातंत्र्यावर आधारित लोकशाहीविषयीची आस्था हा त्यांच्या वृत्तीचा एक अविभाज्य आविष्कार होता. यामुळे कधी ते साम्यवादाच्या व साम्यवादी राष्ट्रांच्या बाजूने उभे आहेत असे भासे तर कधी ते लोकशाही राष्ट्रांच्या बाजूने आग्रही भूमिका घेत आहेत असे आढळून येई. कोणत्याही विचारसरणीच्या लेखकावर, कलावंतावर, विचारशीलावर अन्याय झाला असता त्या अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठी कधी साम्यवादी राष्ट्रांत तर कधी भांडवलशाही लोकशाही राष्ट्रांत ते आपल्या प्रयत्नांची शिकस्त करताना आढळून येत. 'इंटरनॅशनल कमिटी फॉर कल्चरल फ्रीडम' यासारख्या संस्थेचे अध्यक्षपद स्वीकारीत व ही संस्था निःपक्षपातीपणे सर्व घटनांचा विचार करू शकत नाही असे आढळून येताच त्या पदाचा राजीनामा देऊन मोकळे होत. लोकशाही व आर्थिक न्याय या दोन्हीविषयी वाटणाऱ्या आस्थेमुळे लोकशाही समाजवादी वृत्तीच्या ब्रिटिश मजूर पक्षाचे सभासद होत परंतु या पक्षाचे आंतरराष्ट्रीय राजकारण प्रतिगामी स्वरूपाचे होत आहे असे आढळून आले की जाहीर सभेत त्या पक्षाच्या सभासदत्वाचे आपले कार्ड फाडून टाकीत. व्हिएतनाम मधील युद्धात अमेरिकेने अनन्वित अत्याचार केलेले आहेत अशी त्यांच्या मनाची धारणा होताच त्या अत्याचारांची स्वतंत्रपणे चौकशी करण्यासाठी जगातील मान्यवर व्यक्तींची न्यायसमिती स्थापन करण्यासाठी धडपडत. क्युबाच्या वेळी केनेडीस दोषी धरणारे रसेल केनेडीच्या खुनानंतर या घटनेमागील पूर्ण सत्य दडविण्याचा प्रयत्न केला जात आहे असे आढळताच ते सत्य बाहेर यावे यासाठी आपल्याकडून प्रयत्न करीत.

अशा वृत्तीच्या माणसाला काही काळ या गटाची काही काळ दुसऱ्या गटाची या पद्धतीने त्या त्या गटाच्या सोयीप्रमाणे व्यक्तिगत मान्यता मिळत असली तरी सर्वांची सर्वकाळ मान्यता मृत्यूच्या पूर्वी सहसा मिळू शकत नाही. केलेल्या विरोधामुळे निर्माण होणारा कडवटपणा मानवी मन सहजपणे विसरू शकत नसल्यामुळे अशा व्यक्तीच्या मृत्यूनंतरही सर्वांच्या मनातून हा कडवटपणा लागलीच नाहीसा होतो असे नाही. परंतु रसेल यांनी आपल्या व्यक्तिगत जीवनात याची खंत कधी केली नाही.

समाजाशी समरस व्हावे अशी मनातून भूक असणाऱ्या या माणसाने 'अन्यायाच्या आचरणात तू जनसमूहाचा अनुयायी होऊ नकोस' (Thou shalt not follow a multitude to do evil) या आदेशाचे संपूर्णपणे पालन केले. यासाठी द्यावे लागणारे मूल्य देण्याची त्यांनी आपल्या मनाची तयारी ठेवली होती. 'असत्याच्या बाजूने उभे राहून शहाणा ठरण्यापेक्षा सत्यासाठी वेडा होण्याचे मी पत्करीन' असा त्यांचा निर्धार होता. जनतेत प्रिय असणारे विचार अधिक कलाकुसरीने मांडून आपली लोकप्रियता व आपले स्थान टिकविण्यात विचारशील स्वतःला धन्य मानतात याविषयी त्यांना विलक्षण चीड होती. 'जनमताचा अनुनय करण्याची कला मला कधीच साधली नाही,' असे ते मोठ्या अभिमानाने सांगत.

१९३० च्या आसपासचा कालखंड हा रसेल यांच्या जीवनातील सर्वमान्यतेचा सर्वोच्च कालखंड होता. 'व्यक्तिगत जीवनात जे समाधान मिळावयास हवे ते मी मिळवले असले तरी जगातील परिस्थिती मला स्वस्थ बसू देत नाही,' असे त्यांनी त्या काळातच आपल्या मनोवृत्तीचे वर्णन लिहून ठेवले आहे. त्यांचा मूळ पिंड तत्त्व-

जिज्ञासेचा; सामाजिक बंडखोर वृत्तीचा नव्हे. परंतु सभोवतालच्या परिस्थितीविषयी वाटणाऱ्या करूणेने, 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' असे म्हणून तत्त्वज्ञानात रममाण व्हावे इतक्या स्वस्थपणे 'अथ'पर्यंत जाऊन पोचण्याची सवड त्यांना लाभू दिली नाही. 'करुणा ' आणि 'प्रज्ञा'या दोन्ही प्रेरणांच्या प्रभावाखाली असणाऱ्या त्यांच्या व्यक्तिमत्त्वात 'करुणे'चा प्रभाव हा अधिक विशेष होता. यासाठी तत्त्वजिज्ञासेकडे पाठ फिरविण्याचे जितके मूल्य द्यावे लागले तितके त्यांनी स्वाभाविक सहजवृत्तीने दिले हे रसेल यांच्या व्यक्तिमत्वाचे विशेष आकर्षण आहे.

अगदी शेवटच्या क्षणापर्यंत हे मूल्य आपल्याला द्यावे लागत आहे याची वेदना ते आनंदाने आपल्या उरात वागवीत होते. वयाला नव्वद वर्षे पूर्ण झाली त्या वेळी त्यांनी लिहिले :

'माझ्या इतक्या वृद्ध वयात, जगाच्या परिस्थितीकडे जर मला डोळेझाक करता आली असती तर मी एरव्ही पूर्णपणे सुखी होऊ शकलो असतो. केवळ व्यक्तिगत जीवन पाहिले तर जीवन समृद्ध करणाऱ्या सर्व गोष्टींचा उपभोग मी घेत आहे. आपण म्हातारे झालो की निवृत्त होऊन मजेत सुसंस्कृत जीवन व्यतीत करू, व जे अनेक उत्तमोत्तम ग्रंथ वाचावयास आपल्याला पूर्वी सवड झाली नाही ते वाचून काढू असे मला वाटत असे. असे निदान माझे एक सुंदर स्वप्न होते. परंतु विशिष्ट ध्येयाने काम करण्याची सवय झाली की ती मोडणे कठीण होते, आणि यदाकदाचित् जगाची परिस्थिती अधिक चांगली असती तरी असे सुखासीन निवृत्त जीवन मला नीरस वाटले असते अशीच अधिक शक्यता आहे. ते कसेही असो, परंतु प्रत्यक्षात माझ्याभोवती जे घडत होते तिकडे दुर्लक्ष करणे तर मला शक्यच नव्हते.'

याच्याही पुढे जाऊन रसेल याच संदर्भात पुढे लिहितात :

'गेल्या पन्नास वर्षात जगात ज्या घटना घडत गेल्या त्यामुळे माझ्या जीवनात तर सामान्यपणे वार्धक्या-बरोबर येणाऱ्या परिणामांच्या अगदी उलट अशा प्रतिक्रिया निर्माण झाल्या. स्वत:ला प्रज्ञावान समजणारे लोक अनेकदा असे सांगत असतात की मनुष्याचे वय व वृत्ती जसजशा परिपक्व होत जातात तसतसा त्याचा दृष्टिकोण इतका विशाल होऊ लागतो, की तादृश दु:खापलीकडे असणारे अंतिम सुख त्याला प्रतीत होऊ लागते. मला ही भूमिका मान्य नाही. सध्याच्या जगात वृत्तीचा असा समतोल केवळ अंधदृष्टीच्या किंवा पशुवृत्तीच्या लोकांनाच ठेवता येईल. सामान्य अपेक्षा असते त्याच्या उलट, वाढत्या वयाबरोबर मी अधिकाधिक बंडखोर होऊ लागलो; नाहीतर, बंडखोरी ही काही खरी माझी जन्मजात वृत्ती नव्हे. १९१४ पर्यंत, माझ्या भोवतालच्या परिस्थितीशी माझे पुष्कळसे सुरळीतपणे जमले होते. त्यावेळच्या जगातही वाईट गोष्टी होत्या - काही खूपच वाईट होत्या - परंतु हा वाईटपणा उत्तरोत्तर कमी होत जाईल अशी आशा ठेवावयास त्या काळात जागा होती. त्यानंतर मात्र अशा घटना घडत गेल्या की, बंडखोरीची वृत्ती मुळात माझ्यात नसतानादेखील, आपल्या सभोवताली जे घडताना दिसत होते त्यामधे शांतपणे तटस्थ राहणे मला अधिकाधिक अशक्य होऊ लागले. माझ्यासारखीच वृत्ती असणारे आणखी काही थोडे लोक आहेत. अशा लोकांची संख्या उत्तरोत्तर वाढत असली तरी आज एकूण ते अल्पसंख्यच आहेत, आणि जिवात जीव असेपर्यंत यांच्या दलात मला काम करीत राहिले पाहिजे.'

१९६२ मध्ये रसेलच्या वयाला ९० वर्षे पूर्ण झाली.

९१, ९२, ९३ - वय वाढत होते, बंडखोर वृत्ती वाढत होती; जगाचे काय होणार ही चिंता स्वस्थ बसू देत नव्हती. आशानिराशांचे द्वंद्व सतत चालू होते. रसेल यांच्या आत्मचरित्राचा तिसरा खंड १९६९ मध्ये प्रसिद्ध झाला. त्या खंडाच्या प्रस्तावनेत रसेल यांनी आपला वारसा आपल्यामागून येणाऱ्या पिढ्यांना दिला आहे.

'आज हे पुस्तक प्रसिद्ध होण्याच्या काळात संघर्षाचे अनेक अनिर्णित प्रश्न जगासमोर उभे आहेत. काही काळ तरी ही परिस्थिती अशीच अनिश्चित राहील असे दिसते. आशा आणि भीती या दोन टोकांच्यामध्ये परिस्थिती अशीच काही काळ हेलकावत राहणे अटळ आहे.

'या गोष्टींचा निर्णय लागण्यापूर्वीच माझे निधन झालेले असेल असा संभव आहे. माझे अखेरचे शब्द काय असतील हे मला माहीत नाही.

प्रकाशाचा शेवटचा किरण हरपला
अंधारी रात्र सुरू झाली

असे उद्गार मला अखेरच्या क्षणी काढावे लागतील की,

आज नव्या युगाची सुरूवात होत आहे
सुवर्णयुग पुन्हा अवतरत आहे
स्वर्ग फुलला आहे.....

असे शेवटचे उद्‌गार काढण्याचे भाग्य मला मिळेल ही माझी आशा सफल होईल?

'आशानिराशेमधील हा समतोल आशेच्या दिशेने झुकावा म्हणून माझा छोटासा पासंग त्या ताजव्यात टाकण्यासाठी माझ्याकडून जे शक्य होते ते मी केले आहे. परंतु परिस्थितीच्या विक्राळ मोजमापात हा प्रयत्न अगदीच तोकडा होता याची जाणीव मला आहे.

'माझ्या पिढीचा पराभव झाला आहे. निदान माझ्या नंतरच्या पिढीतील लोक तरी या कार्यात यशस्वी होवोत.'

अल्विदा.



'सामाजिक पुनर्रचनेची मूलतत्त्वे' (Principles of Social Reconstruction) या पुस्तकाचा मराठी अनुवाद श्रीमती सुमन दाभोलकर व प्रा० ल०म० भिंगारे यांनी केला आहे. समाज प्रबोधन संस्थेने प्रसिद्ध केलेल्या या पुस्तकातून खालील उतारे साभार घेण्यात आले आहेत.

## १

ही व्याख्याने १९१५ मध्ये लिहिण्यात आली व १९१६ च्या सुरुवातीला देण्यात आली. ती पुन्हा एकवार लिहावीत व विषयाच्या दृष्टीने अधिक परिपूर्ण करावीत अशी माझी इच्छा होती. परंतु अधिक महत्त्वाच्या कामात गुंतून पडल्यामुळे ते होऊ शकले नाही व आता होण्याची शक्यता फारच दूर गेली आहे.

मानवाच्या जीवनाला वळण लावण्यात जागृत हेतूपेक्षा सहजप्रवृत्ती अधिक प्रभावी असतात. या श्रद्धेवर आधारलेली राजकीय विचारसरणी मांडण्याचा माझा हेतू आहे. बहुतेक सहजप्रवृत्तींचे दोन वर्ग करता येतात. परिग्रहात्मक आणि सर्जनशील. परिग्रहात्मक वृत्ती दुसऱ्याला न देता स्वतःसाठी काही मिळविण्याचा किंवा राखून ठेवण्याचा प्रयत्न करीत असतात, तर सर्जनशील वृत्ती ज्यात खाजगी मालकीचा भाग नसतो अशा ज्ञान, कला व सद्‌भावनांच्या क्षेत्रांत काही मूल्यवान नवनिर्मिती करण्याचा प्रयत्न करीत असतात. सर्जनशील वृत्तीवर आधारलेले जीवन हे सर्वोत्तम जीवन होय असे मी मानतो. राजकीय संस्था स्त्री-पुरुषांच्या जीवनवृत्तीवर फार मोठा परिणाम घडवीत असतात. परिग्रहाची वृत्ती कमी करून सर्जनशील वृत्ती वाढीला लावतील अशा प्रकारच्या या संस्था असल्या पाहिजेत. राज्यसंस्था, युद्धसंस्था व खाजगी मालमत्तेची संस्था हे परिग्रहाच्या वृत्तीने घेतलेले राजकीय आकार आहेत. शिक्षण, विवाह आणि धर्म यांतून सर्जनशील वृत्ती साकार झाली पाहिजे, परंतु आज तरी हे फारच अपुऱ्या प्रमाणात घडताना दिसून येते. सर्जनशीलता मुक्त करणे हेच अर्थशास्त्रीय किंवा राज्यशास्त्रीय पुनर्रचनेचे मूलतत्त्व असले पाहिजे. या सर्व व्याख्यानांचे लेखन याच श्रद्धेतून झाले आहे.

## २
## आपले कर्तव्य

आपल्या जीवनात आपल्याला या जगासाठी काय करता येणे शक्य आहे?

मानवतेची आपण सेवा करावी अशी अनेक स्त्री-पुरुषांची इच्छा असते. परंतु काय करावे ते त्यांना कळत नाही व आपली शक्ती अत्यंत अल्प आहे याचीही त्यांना जाणीव असते. हे लोक नैराश्याने घेरले जातात. ज्यांच्या भावना अत्यंत उत्कट असतात त्यांना तर ही दुर्बलतेची जाणीव फारच त्रास देते. अशा नैराश्याच्या भावनेतून माणसाचा अधिक नाश होण्याचा मोठा संभव असतो.

आपण जर नजीकच्याच केवळ भविष्य-काळाचा विचार केला तर आपण फार काही करण्याची शक्यता नाही हे दिसून येईल. आपल्याला युद्धसंस्थेचा अंत बहुधा घडवून आणता येणार नाही. राज्यसत्तेचा किंवा खाजगी मालमत्ता-धारकांच्या हातात असलेले जादा अधिकार आपल्याला नाहीसे करता येणार नाहीत. आजच्या शिक्षणात आपल्याला ताबडतोब नवा प्राण ओतता येणार नाही. या सर्व बाबतीत कोठे चुकते आहे ते आपल्याला कळले तरी राजकारणातील कोणत्याही सर्वसाधारण उपायांनी आपल्याला त्या चुका दूर करता येणार नाहीत. जग एका चुकीच्या भावनेच्या आहारी गेले आहे हे आपण ओळखले पाहिजे; आणि भावना काही अशी चटकन एका दिवसात बदलता येत नाही. त्यामुळे आपण उद्याच काही

घडेल ही आशा सोडून दिली पाहिजे. आज काही थोड्या लोकांच्याच मनात असणारे सद्‌विचार जेव्हा जगात अनेकजण सर्वसाधारण विचार म्हणून स्वीकारतील त्या दूरच्या काळाचे अवधान आपण ठेवले पाहिजे. आपल्यात पुरेशी हिंमत आणि सोशिकपणा असेल तर आज ना उद्या आपल्या मनातील सद्‌भावना आणि सद्‌विचार इतरांच्याही मनात स्फूर्ती निर्माण करतील, आणि आजच्या निरुत्साहाची आणि नैराश्याची जागा उत्साह आणि उत्कटता घेऊ शकतील अशी आशा आपण बाळगू शकतो. यासाठी आपल्याला कोणत्या प्रकारचे जीवन मंगल वाटते आणि आपल्याला इष्ट वाटत असलेला बदल कोणता याची मात्र आपल्या मनाशी स्पष्ट कल्पना असली पाहिजे.

मूलगामी विचार करू शकणाऱ्यांची शक्ती आपल्याला वाटते त्यापेक्षा कितीतरी अधिक असते. चालू राजकारणाच्या अविचारी सावळ्या गोंधळात ही गोष्ट आपल्या लक्षात येत नाही. धार्मिक सहिष्णुता ही सुरुवातीला अशीच काही निर्भय तत्त्वज्ञांच्या मनातील कल्पना होती. तत्त्व म्हणून लोकशाहीचा उदय असाच क्रॉमवेलच्या सैन्यदलातील काही लोकांच्या मनात झाला. त्यानंतर ती कल्पना अमेरिकेत गेली व अमेरिकेच्या स्वातंत्र्य युद्धानंतर फळाला आली. वॉशिंग्टनच्या बाजूने लढणाऱ्या लफाये (Lafaytte) व इतर फ्रेंच लोकांच्याबरोबर ती कल्पना अमेरिकेहून फ्रान्सला आली व रूसोच्या विचारप्रणालीशी एकरूप होऊन तिने फ्रेंच राज्यक्रांतीला प्रेरणा दिली. समाजवादाच्या गुणावगुणांविषयी आपण काहीही म्हटले तरी समाजवाद ही एक अशीच वाढती महान शक्ती आहे. परंतु समाजवादाचा जन्मही काही तुरळक विचारवंतांच्या मनातच झाला. स्त्रीदास्यविमोचनाची मोहीमही मेरी वोल्स्टन क्रॅफ्ट, शेली, जॉन स्टुअर्ट मिल यांसारख्या काही अव्यवहारी ध्येयवादी लोकांच्यापासूनच अशीच सुरू झाली. आज ही मोहीम पूर्णपणे विजयी होण्याच्या मार्गावर आहे. ज्या लोकांच्यामध्ये विचारशक्ती जागृत आहे, आणि मानवाच्या गरजांनुसार जे विचार करू शकतात, अशा लोकांनी आपल्यासमोर ठेवलेले मानवहिताचे ध्येय त्यांच्या स्वतःच्या जीवनकाळात साध्य झाले नाही, तरी ते शेवटी साध्य झाल्याखेरीज राहत नाही.

परंतु ज्या लोकांना विचाराच्या आधारावर नवे जग निर्माण करण्याची इच्छा असेल त्यांनी चालू जगाच्या आजच्या परिस्थितीतील आधार सोडावयास सिद्ध असले पाहिजे. बहुतेक लोक प्रचलित समजुती आणि रीतिरिवाज स्वीकारतात; त्याविषयी ते शंका उपस्थित करीत नाहीत. आपण जर जगाला विरोध केला नाही तर जग आपल्या बाजूचे राहील अशी त्यांची अपेक्षा असते. अशा सुखासीन जुळवून घेण्याच्या वृत्तीतून जगाची नवीन घडण करण्याचे विचार निर्माण होऊ शकत नाहीत. अशा निर्मितीसाठी अलिप्तपणे विचार करण्याची वृत्ती असावी लागते. आणि विचारविश्वात जगातील प्रचलित विचारप्रणालीवर स्वार होण्याची ताकद मनात असावी लागते. आपण एकाकी पडण्याची तयारी असल्याखेरीज नवविचार निर्माण करता येत नाही. परंतु या एकाकी वृत्तीचे तुटकपणात रूपांतर झाले व वैचारिक अलिप्ततेचे रूपांतर इतरांविषयीच्या तिरस्काराच्या भावनेत झाले तरीही नवविचारनिर्मितीची प्रेरणा होऊ शकत नाही. मनाचा असा तोल सांभाळणे मोठे कौशल्याचे व दुर्घट असते. समाजापुढील समस्यांबाबत उपयुक्त विचारनिर्मिती यामुळेच अवघड होऊन बसते. आणि बहुतेक विवेचकांचे कार्य रूढ पद्धतीचे व निष्फळ ठरते. योग्य विचार हा दुर्मिळ आणि दुष्कर असतो. परंतु तो कधीही प्रभावशून्य असत नाही. जगात काही नवी आशा निर्माण व्हावी असे वाटणाऱ्या लोकांनी विचार हे प्रभावशून्य असतात अशा भावनेने विचारनिर्मितीच्या क्रियेपासून माघार घेता कामा नये.

नवीन राजकीय विचारप्रणाली शोधताना आपण एखाद्या काल्पनिक आदर्श स्वप्नसाम्राज्याचे चित्र रंगवले पाहिजे असे नव्हे. यापुढील प्रगतीचा निश्चित मार्ग कोणता हे शोधून काढणे खरे महत्त्वाचे आहे. एका काळी योग्य भासणारा मार्ग दुसऱ्या काळी तसा असेलच असे नाही. सध्याच्या परिस्थितीत उचित दिशा कोणती हे योग्य विचारसरणीने दाखवून दिले पाहिजे. परंतु ही योग्य दिशा ठरविताना दोन तत्त्वांचा निकष नेहमी लावता येईल.

१. व्यक्ती आणि समाज यांचा विकास व आंतरिक जोम यांना त्या दिशेचे मार्गक्रमण पोषक असले पाहिजे.

२. शक्य तोवर एखाद्या व्यक्तीच्या किंवा










समाजाच्या विकासाचा अन्य व्यक्तीच्या किंवा समाजाच्या विकासावर प्रतिकूल परिणाम होता कामा नये.

यापैकी दुसरे तत्त्व, ज्यावेळी एखादी व्यक्ती अन्य व्यक्तींच्या बरोबरच्या व्यवहारात आचरणात आणते, तेव्हा ती अन्य व्यक्तींविषयी योग्य 'आदरभाव' दाखविते असे म्हणता येईल. माझ्या जीवनाइतकेच अन्य व्यक्तीचे जीवनही महत्त्वाचे आहे ही कल्पना अनुस्यूत आहे. राजकारणातील एक व्यक्तिनिरपेक्ष तत्त्व म्हणून हेच तत्त्व 'स्वातंत्र्या'च्या कल्पनेत मांडले जाते. किंबहुना स्वातंत्र्याच्या तत्त्वाचा या 'आदरभावा'च्या तत्त्वात समावेश असतो असे म्हणता येईल. तसे पाहिले तर स्वातंत्र्याचे तत्त्व अकरणात्मक आहे. हस्तक्षेप करू नका, असे स्वातंत्र्याचे तत्त्व सांगते परंतु विधायक असे काही सुचवत नाही. अनेक सामाजिक आणि राजकीय संस्था वाईट आहेत आणि बाजूला फेकल्या पाहिजेत असे स्वातंत्र्याचे तत्त्व दाखवून देते. परंतु या संस्थांच्या जागी कशाची नवी स्थापना करावयाची याचा खुलासा ते करत नाही. राजकीय तत्त्वज्ञानाने जर केवळ विध्वंसक स्वरूप धारण करावयास नको असेल, तर यासाठीच स्वातंत्र्याच्याही पलीकडे पाहणाऱ्या एखाद्या तत्त्वाची आवश्यकता निर्माण होते.

आपण मागे सांगितलेल्या दोन तत्त्वांचा मेळ घालणे ही व्यवहारात सोपी गोष्ट नाही. जगातील बहुतांश उत्साह आणि शक्ती ही इतरांवर जुलूम करण्याच्या दिशेने कार्यकारी होत असतात. जर्मन लोकांच्यामध्ये अशी काही शक्ती पुष्कळ आहे. परंतु दुर्दैवाने आपल्या शेजारच्या राष्ट्रांच्या जोमदार विकासाला अडथळा आणण्यासाठी तिचा वापर केला जातो. युरोपमध्ये आफ्रिकेपेक्षा हा जोम अधिक आहे. परंतु आफ्रिकेचे आर्थिक शोषण करण्यात किंवा निग्रो लोकांना त्यांचे आधीच निकृष्ट असलेले जीवनही जगणे अशक्य करून टाकण्यात युरोपचा जोम खर्ची पडतो. अमेरिकेतील कारखानदारांना स्वस्त मजूर मिळावेत म्हणून आग्नेय युरोपमधील राष्ट्रांचा जोम खच्ची करण्यात येत आहे. आजवरच्या इतिहासात पुरुषांचा पुरुषार्थ हा स्त्रियांच्या विकासाला अडथळा ठरला आहे आणि भविष्यकाळात त्याच्या उलट स्त्रियांमधील जोम पुरुषांच्या विकासाच्या मार्गातील धोंड ठरेल अशी शक्यता आहे. या अशा कारणांसाठी परस्परांविषयीच्या आदरभावाचे तत्त्व महत्त्वाचे आहे. जगात कोणत्या प्रकारचे राजकीय बदल आवश्यक आहेत हे त्या तत्त्वाच्या अनुरोधाने कळू शकते.

आपण सांगितलेल्या दोन्ही तत्त्वांचा समन्वय करण्याच्या दृष्टीने व्यक्तिस्वातंत्र्याचा बळी न देता व्यक्तिगत जीवन, सामाजिक जीवन आणि जागतिक व्यवहार हे नीटपणे एकत्र गुंफता आले पाहिजेत. व्यक्तिजीवन, समाजजीवन, व मानवजीवन असे जीवनाचे वेगवेगळे तुकडे न पाडता ते कोणत्यातरी रीतीने एकात्म झाले पाहिजे. असे झाल्यानंतर व्यक्तीच्या विकासाच्या आड न येता व्यक्तीचा विकास साधला जाऊ शकतो, अशा रीतीने या दोन तत्त्वांचा समन्वय करणे शक्य होते.

व्यक्तीच्या जीवनाला काही दिशा आतून असेल किंवा त्यात काही सर्जनशील हेतू अनुस्यूत असेल तरच ते एकात्म होऊ शकते. केवळ सहजप्रवृत्तीच्या आधारावर कोणाही सुसंस्कृत स्त्री-पुरुषाला आपल्या जीवनात अशी एकात्मता साधता येत नाही. त्यासाठी व्यक्तीच्यासमोर काही प्रभावी ध्येय असावे लागते. मग ते व्यक्तिगत महत्त्वाकांक्षेचे असो, कलात्मक सर्जनाचे असो, शास्त्रीय संशोधनाचे असो, एखाद्या धर्मतत्त्वाचे असो किंवा कोणत्याही दृढ चिरस्थायी भावानुबंधाचे असो. ज्या व्यक्तीला आपल्या मूलभूत प्रेरणेला दडपून टाकणारा पराभव जीवनात स्वीकारावा लागला आहे त्या व्यक्तीला अशी एकात्मता साधणे अत्यंत दुर्घट असते. अनेक व्यवसायात अशा प्रकारचा पराभव व्यक्तीवर प्रथम-पासूनच लादला जातो. एखादा माणूस वृत्तपत्रकार झाला तर त्याला अनेकदा ज्या वृत्तपत्राचे राजकीय धोरण त्याला मान्य नाही असा वृत्तपत्रासाठी लिहावे लागते. यामुळे त्याचा स्वाभिमान मरतो आणि स्वातंत्र्याची भावना नष्ट होते. अनेक डॉक्टरांना काहीतरी थोतांड केल्याखेरीज यशस्वी होणे सोपे वाटत नाही. यामुळे त्यांच्या शास्त्रनिष्ठेला आघात पोचतो. राजकारणी पुरुषांना आपल्या पक्षाचा कार्यक्रम तर जशाचा तसा गिळावा हा लागतोच, परंतु आपल्या धार्मिक वृत्तीच्या अनुयायांचे आर्जव करण्यासाठी आपण साधुपुरुष आहोत अशीही बतावणी करावी लागते. काहीही दांभिकपणा न करता क्वचितच एखाद्याला पार्लमेंटचा सभासद होता येत असेल. कोणत्याही व्यवसायात व्यक्तीच्या अस्मितेची

बूज आज राखली जात नाही. जग अशी अस्मिता चिरडून टाकत असते. माणसांना आपण स्वतंत्र राहण्यापेक्षाही इतरांना गुलाम करण्याचे महत्त्व अधिक वाटते. परंतु अशा अस्मितेखेरीज व्यक्तिजीवन पूर्ण होऊ शकत नाही. आंतरिक स्वातंत्र्य ही एक अत्यंत अमोल अशी गोष्ट आहे. आणि ज्या समाजात हे स्वातंत्र्य सांभाळले जाते ती समाजरचना सर्वात श्रेष्ठ होय.

मनुष्याला केवळ एखादी गोष्ट करावयास प्रतिबंध केल्याने विकासाचे तत्त्व चिरडले जात नाही. परंतु त्याला त्याच्या इच्छेविरुद्ध दुसरी एखादी गोष्ट करावयास भाग पाडल्याने मात्र ते बहुशः चिरडले जाते. आंतरिक जोम ज्या दिशेने जाऊ पाहत असतो त्या बाजूला जाण्यास आपण असमर्थ आहोत, याची जाणीव व्यक्तिविकासाला मारक असते. परंतु ज्या अडथळ्यांना आपण स्वेच्छया अनुमती देतो ते अडथळे या दृष्टीने सर्वात घातक असतात. अनेकदा आपल्या 'स्वधर्मा'ची स्वतःलाच ओळख नसल्यामुळे, माणसाची इच्छाशक्ती त्याला चारचौघांसारखा संपत्ती आणि समाजात प्रतिष्ठा देणारा व्यवसाय करण्याकडे खेचत असते. एखादा कलावंत लोकप्रियतेच्या मागे लागून लोकांना रुचणाऱ्या कनिष्ठ दर्जाच्या कलाकृती निर्माण करू लागतो हे याचे एक ढोबळ उदाहरण आहे. परंतु कलावंताच्या अंतःकरणातील ही प्रेरणा कलावंत नसणाऱ्या माणसांच्या अंतःकरणातही कमीअधिक प्रमाणात वास करीत असते. परंतु व्यावहारिक ज्ञान या नावाने ओळखली जाणारी चीज या प्रेरणेच्या विरोधी असल्यामुळे ती बिचारी मूकपणे खोल कुठेतरी जाऊन दडून बसते. या प्रेरणेच्या मागे जावयाचे तर मित्रांचा, वडिलधाऱ्या माणसांचा व्यावहारिक शहाणपणा झुगारून आपल्या अस्फुट प्रेरणांच्या मागे जाण्याची तयारी व्यक्तीला ठेवावी लागते. साहजिकच शेकडा ९९ टक्के लोकांच्या बाबतीत जोमदार जीवनविकासाला प्रेरणा देणारी सर्जनशीलतेची वृत्ती प्रारंभालाच खुडली जाते आणि अशा स्थितीत तरुण मनुष्य स्वतंत्र कर्तृत्वाच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास साधण्याऐवजी केवळ इतरांच्या हातातील एक बाहुले म्हणून काम करू लागतो. ही संमती तो देतो त्याच वेळी त्याच्या जीवनातील एका मंगल अंशाचा अंत होतो. त्याचा स्वाभिमान दुखावला गेलेला असतो, मानबिंदू ढळलेला असतो. आणि एकात्म जीवनाची त्याची आशा कायमची मिटलेली असते. बाहेरून कितीही दुःखे आणि संकटे आली असती तरी अशा एकात्म जीवनात त्याला त्याचे विशेष काही वाटले नसते. आता त्याला परत तिकडे वळावयाचे असेल तर जीवनात आमूलाग्र परिवर्तन केल्याखेरीज त्याला ते शक्य होणार नाही.

आपल्याला विरोध करणाऱ्या ज्या प्रतिबंधांना इच्छाशक्ती मान्यता देत नाही ते प्रतिबंध व्यक्तिमत्त्वाच्या विकासाला त्या मानाने कमी हानीकारक असतात. जे प्रतिबंध इच्छाशक्ती वेगवेगळ्या सूक्ष्म प्रलोभनांच्या आहारी जाऊन आपण होऊन स्वीकारले, ते मात्र व्यक्तिमत्त्वाला अंतिम हानिकारक असतात. प्रेमात निराशा प्राप्त झाली तर तीव्र दुःख होणे स्वाभाविक आहे. परंतु आपण केवळ पैशाच्या मागे लागून आपल्या जन्माच्या जोडीदाराची निवड केली या जाणिवेतून व्यक्तिमत्त्वावर होणारा आघात हा तीव्रतर असतो. एखाद दुसरी आकांक्षा पूर्ण होणे वा न होणे हे विशेष महत्त्वाचे नसते. आपण कोणत्या दिशेने प्रयत्न करत आहोत हे अधिक महत्त्वाचे असते. एखाद्या मूलभूत सहजप्रवृत्तीवर इच्छाशक्तीच्या जोरावर दडपण टाकले जाते तेव्हा ती प्रवृत्ती दुबळी होऊन जाते. ती प्रवृत्ती मग कार्याला प्रेरणा देण्याच्या दृष्टीने प्रभावी होऊ शकत नाही. बाहेरून टाकलेल्या दडपणामुळे अशीच असहायता मनात निर्माण झाली नाही तर ते तितकेसे घातक ठरत नाही; आणि प्रवृत्ती जर निर्भय आणि बलवत्तर असेल तर ती अशी असहाय्य अगतिक होणार नाही. अगदी सर्वोत्कृष्ट समाजरचनेतही काही विशेष प्रेरणांवर बंधन हे घालावेच लागणार, कारण काही लोकांच्या प्रेरणांना जर मोकाट सुटू दिले तर त्या इतरांच्यावर जुलूम करण्यास किंवा त्यांचा नाश करण्यास प्रवृत्त होतात. चांगल्या समाजात नेपोलियनला त्याच्या आवडीचा लष्करी पेशाचा व्यवसाय करावयास मिळाला नसता. परंतु पश्चिम अमेरिकेतील वसाहतीचा आद्य प्रवर्तक म्हणूनही त्याचे जीवन कदाचित सुखी होऊ शकले असते. एखादा कारकून म्हणून तो कधीही सुखी झाला नसता ही गोष्ट खरी आहे. आणि कोणत्याही समंजस समाजरचनेत त्याच्यावर कारकून होण्याची सक्ती केली जाणार नाही.

एकात्म व्यक्तिमत्त्वासाठी व्यक्तीच्या जीवनात तिच्या 'स्वधर्मा'चा आविष्कार झाला पाहिजे. असा आविष्कार होऊ शकेल अशा प्रकारचे शिक्षण व्यक्तीला







अनुक्रमणिका

मिळाले पाहिजे. एकात्म समाज वाढविण्यासाठी विविध व्यक्तींमधील अशा 'स्वधर्मा'नुसार वागणाऱ्या वृत्तीला एकत्र अनुस्यूत करणारी सामाजिक ध्येयाची एकता असली पाहिजे. आंतरिक उत्साही सहजप्रवृत्तीतून स्फुरणारी कार्ये दोन प्रकारची असतात. एका प्रकारच्या कार्यात आपल्याबरोबरच व्यक्ती इतरांचाही तसाच आंतरिक उत्कर्ष साधत असते, तर दुसऱ्या प्रकारच्या कार्यात स्वार्थी प्रवृत्तीने इतरांच्या आंतरिक उत्कर्षात अडथळे आणत असते. यामुळे आंतरिक जोमाचा आविष्कार हा कधीकधी विघातक असण्याचीही शक्यता असते. प्युरिटॅनिझमने इंग्लंडमध्ये केलेले कार्य, किंवा राष्ट्रवाद आज युरोपात करीत असलेले कार्य, ही याची उदाहरणे म्हणून सांगता येतील. जोमातूनच भांडणे आणि जुलूम यांचा जन्म होतो आणि त्यामुळे जोमच खच्ची होऊन जातो. युद्धामुळे सुरुवातीला राष्ट्र एकात्म झालेले भासते. परंतु युद्धामुळे जगाचे जीवन विस्कटते व शेवटी शेवटी युद्ध सध्याच्या महायुद्धाप्रमाणे तीव्र झाले म्हणजे राष्ट्राचेही जीवन विस्कटल्याखेरीज राहत नाही.

सर्व सुधारलेल्या राष्ट्रांच्या व्यवहारात आक्रमक वृत्ती व परस्परांविषयीचा संशय ही अस्तित्वात असताना केवळ एखाद्या समाजाला आपले जीवन सुसंगत एकात्म राखणे अशक्य आहे ही गोष्ट या महायुद्धाने स्पष्ट झालेली आहे. यासाठी सुधारणेची कोणतीही प्रभावी चळवळ आंतरराष्ट्रीय असणे आवश्यक आहे. एखाद्या राष्ट्रातच अशी चळवळ सुरू केली तर ती परकीय आक्रमणाच्या भीतीपुढे कोलमडल्याखेरीज राहणार नाही. ज्यांना जग सुधारावे अशी इच्छा आहे किंवा निदान आपल्या राष्ट्रात सुधारणा व्हावी असे वाटते त्यांनी इतर राष्ट्रातील तशाच वृत्तीच्या लोकांशी सहकार्य करणे आवश्यक आहे. आज युद्धामुळे परस्परांविषयी जो आंधळा द्वेष निर्माण झालेला आहे तो दूर करण्यासाठी या लोकांना आपली बरीचशी शक्ती खर्च करावी लागेल. राष्ट्रवादाने निर्माण होणाऱ्या राष्ट्राराष्ट्रातील तुटक एकात्मतेने जगाचे प्रश्न सुटणार नाहीत. राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय व व्यक्तिगत पातळीवर एकच समस्या आपल्यापुढे उभी आहे. आंतरिक उत्साही सहजप्रवृत्तीची सर्जनशीलता कायम टिकवणे परंतु त्याचबरोबर या वृत्तीला सध्याच्याप्रमाणे विघातक विध्वंसक वळण लागणार नाही याची दक्षता घेणे, ही ती समस्या होय.

माणसाच्या सहजप्रवृत्ती आणि आकांक्षा यांची सर्जनशील वृत्ती आणि परिग्रहाची वृत्ती अशी विभागणी करता येईल. आपले काही प्रयत्न जे अस्तित्वात नाही ते अस्तित्वात आणण्यासाठी असतात, तर काही आधीच ज्या गोष्टी अस्तित्वात आलेल्या आहेत त्यांचा कब्जा बळकावण्यासाठी असतात. सर्जनशील सहजप्रवृत्तींचा नमुना म्हणून कलावंताकडे बोट दाखविता येईल; खाजगी मालमत्तेची संस्था ही परिग्रहाच्या सहजप्रवृत्तीचे निदर्शन होय. ज्या जीवनात सर्जनशील वृत्तीला भरपूर वाव मिळतो व परिग्रहाच्या वृत्तीला अगदी थोडा वाव असतो ते जीवन सर्वोत्तम होय. स्वसंरक्षणाची मर्यादा सांभाळून, ज्या सामाजिक संस्था सर्जनशीलता मोठ्या प्रमाणात वाढवतात व परिग्रहाची व्याप्ती कमी करतात त्या संस्था सर्वोत्कृष्ट होत. परिग्रहाच्या वृत्तीचेही दोन प्रकार असतात. एक संरक्षक व दुसरा आक्रमक. गुन्हेगारविषयक कायद्यांच्या रचनेत परिग्रहाची वृत्ती संरक्षक पद्धतीने काम करीत असते, तर गुन्हेगारांच्या कृतीत तीच आक्रमक स्वरूपात वावरत असते. गुन्हेगाराविषयी आपल्याला घृणा वाटते, तशी गुन्हेगार-विषयक कायद्याच्या बाबतीत वाटत नाही ही गोष्ट खरी आहे; आणि जोपर्यंत आक्रमक परिग्रहाची प्रवृत्ती अस्तित्वात आहे तोपर्यंत संरक्षक रूपातही ती अस्तित्वात असणे अटळ आहे हीही गोष्ट खरी आहे. परंतु पूर्णपणे संरक्षक रूपातही परिग्रहाची वृत्ती विशेष स्पृहणीय आहे असे म्हणता येणार नाही. कारण ही वृत्ती देखील फार बळावली की सर्जनशील वृत्तीला मारक झाल्याखेरीज राहत नाही. 'आपल्याला खावयास काय मिळेल, प्यावयास काय मिळेल अशी चिंता करत बसू नका' हे बायबलमधील वचन अक्षरशः एक परमार्थ-वचन आहे याची जाणीव प्रबल सर्जनशील प्रेरणा असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला झाल्याखेरीज राहत नाही. अशा परिग्रहात अडकून पडल्यामुळेच माणसे मुक्तपणे उदात्त जीवन जगू शकत नाहीत. राज्यसत्ता आणि खासगी मालमत्ता ही परिग्रहाच्या वृत्तीची सर्वात मोठी उदाहरणे होत. यामुळेच त्यांचे कार्य जीवन-विकासाला विरोधी असे होते आणि त्यातून युद्धे निर्माण होतात. परिग्रह म्हणजे दुसऱ्याला उपभोग घेता येणार नाही अशा पद्धतीने वस्तूचा कब्जा घेणे; सर्जन करणे म्हणजे आजवर उपभोगासाठी कोणालाच उपलब्ध नव्हती अशी वस्तु नव्याने अस्तित्वात



अनुक्रमणिका

आणणे. जगातील भौतीक संपत्तीचा लाभ व्यक्तिनिरपेक्ष न्यायाच्या तत्त्वानुसार सर्व लोकांना मिळणे आवश्यक आहे. आणि ज्याअर्थी समाजात काही लोक लुटारू वृत्तीचे असतात त्याअर्थी संरक्षक परिग्रहाची काही तरदूद समाजव्यवस्थेत असली पाहिजे. परंतु ही केवळ समृद्ध जीवनाची प्रस्तावना होय. खऱ्या समृद्ध जीवनात किंवा चांगल्या राजकीय संस्थांत परिग्रहाच्या वृत्तीवर सर्जनशीलतेने पूर्णपणे मात केलेली असेल आणि संपत्तीच्या विभाजनातील समता हा समाजव्यवस्थेचा केवळ एक मामुली भाग राहील.

राज्यशास्त्रांतले किंवा खाजगी व्यवहारातले सर्वोच्च तत्त्व सर्व सर्जनशील प्रेरणांना प्रोत्साहन देणे व स्वार्थी परिग्रहाच्या वृत्तींना आळा घालणे हे होय. राजसत्ता ही आज परिग्रहाच्या वृत्तीचा एक मूर्तिमंत अवतार आहे. अंतर्गत क्षेत्रात ती सत्ता श्रीमंतांचे गरिबांपासून रक्षण करते, तर आंतरराष्ट्रीय व्यवहारात इतर राष्ट्रांशी व्यवहार करताना किंवा कनिष्ठ समजल्या जाणाऱ्या वंशांचे शोषण करताना ती बळाचा वापर करते. आपली सर्व अर्थव्यवस्था परिग्रहाशी निगडित आहे. परंतु वस्तूंचे उत्पादन, जर ते पूर्णपणे यांत्रिक व नीरस नसेल तर, सर्जनशील वृत्तीला वाव देऊ शकते. एकेका वस्तूच्या उत्पादकांचे लोकशाही पद्धतीचे सहकारी संघ बनवून या दिशेने पुष्कळच कार्य करता येण्यासारखे आहे. अशा रचनेत राज्यसत्तेने वस्तूच्या किंमतीवर योग्य ती मर्यादा घालावी. परंतु उत्पादन व्यवस्थेत हस्तक्षेप करू नये.

शिक्षण, विवाह आणि धर्म ही मूलतः सर्जनशील आहेत. परंतु ही सर्व परिग्रहाच्या प्रेरणेने कलुषित झालेली आहेत. शिक्षणाकडे मुक्त विचार आणि उदार दृष्टिकोन देणारे एक मानसिक क्षेत्रातील साहस या दृष्टीने पाहण्याऐवजी मुलाच्या मनात पूर्वग्रह बिंबवून 'जैसे थे' परिस्थिती कायम ठेवण्याचे एक साधन या दृष्टिकोनातून पाहिले जाते. विवाहात प्रेमाची भावना ही सर्जनशील असते, परंतु स्वार्थी असूयेच्या भावनेचे बंधन पडते. धर्माने खरोखर आत्मा मुक्त केला पाहिजे; परंतु तो सहजप्रवृत्ती दडपून टाकण्यावर आणि क्रांतिकारी विचारांना विरोध करण्यावरच आपले लक्ष केंद्रित करतो. अशा रीतीने सर्जनशील वृत्तीतून निर्माण होणाऱ्या आशेची जागा अर्धवट परिग्रहातून निर्माण होणाऱ्या भीतीने घेतली जाते. दुसऱ्याला लुबाडण्याची इच्छा वाईट आहे ही गोष्ट तत्त्वतः मान्य केली जाते. परंतु आपण लुबाडले जाऊ ही भीतीही जवळजवळ तितकीच अपाय-कारक असते हे सहसा लक्षात येत नाही. आपले नऊ-दशांश राजकीय किंवा खाजगी जीवन लुबाडण्याची वृत्ती आणि लुबाडले जाण्याची भीती यातच सामावलेले असते.

भिन्न भिन्न माणसांतील सर्जनशील वृत्तीत साहजिकच एक मेळ असतो. कारण एक माणूस जे निर्माण करतो त्याचा दुसरा माणूस जे निर्माण करू इच्छित असतो त्याला अडथळा निर्माण होऊ शकत नाही. नीतिदृष्ट्या आणि राजकीयदृष्ट्या सर्जनशील वृत्ती आणि परिग्रहाची वृत्ती या परस्परविरोधी असल्या तर प्रसंगपरत्वे त्या एकमेकात मिसळून जाऊ शकतात. सहजप्रवृत्ती कशा निर्माण होतात व कोणत्या कारणांनी त्या बदलल्या जाऊ शकतात याचा अभ्यास झाला पाहिजे. माणसांतील संघर्ष कमी होतील व सहकार्य वाढीला लागेल अशा वृत्तींची जोपासना करणारी शिक्षणपद्धती व सामाजिक संस्थांची रचना असली पाहिजे. या पद्धतीने अमर्याद कार्य करता येण्यासारखे आहे, याविषयी माझ्या मनात शंका नाही.

इच्छाशक्ती पेक्षाही सहज प्रवृत्तीतूनच व्यक्तीच्या आणि समाजाच्या जीवनाला निश्चित दिशा लाभत असते. इच्छाशक्ती ही दोन प्रकारची असते - बाहेर कार्य करणारी व आत कार्यकारी होणारी. यांपैकी पहिली बाह्य विरोध निर्माण झाला, तांत्रिक अडचणी आल्या तर कार्यप्रवण होते. तत्काळ यशाची आशा नसताना अशा प्रकारची इच्छाशक्ती असणे हा एक सहजप्रवृत्तीचाच आविष्कार असतो. ज्यांचा जीवनोत्साह प्रबल आहे अशा सर्वांच्या ठिकाणी ही इच्छाशक्ती वास करीत असते आणि हा उत्साह आटला तर ती दुबळी होते. कोणत्याही दुष्कर कार्यात यश मिळविण्यासाठी तिची आवश्यकता असते आणि तिच्या अस्तित्वाखेरीज मोठे यश प्राप्त झाल्याचे उदाहरण सहसा आढळणार नाही. आत कार्यकारी होणारी इच्छाशक्ती जर अंतर्गत सहजप्रवृत्तीत किंवा आकांक्षात संघर्ष असेल तरच उपयोगी असते आणि स्वभावात संपूर्णपणे अंतर्गत सुसंवाद साध्य झाला तर तिची गरजही राहणार नाही. परंतु असा सुसंवाद क्वचितच कोणाला साध्य होतो. आपल्या मुख्य ध्येयाशी विसंगत अशी सहजप्रवृत्तींची वादळे सर्व व्यक्तींच्या जीवनात अनुभवास येतात आणि जीवन जर अयशस्वी









व्हावयाचे नसेल तर अशी वादळे काबूत आणावी लागतात. परंतु ज्यांनी आपले मूलभूत ध्येय खंबीरपणे स्वीकारले आहे अशा लोकांच्या बाबतीत अशा वादळांची शक्यता कमी असते. स्वातंत्र्याच्या ऊर्मीला वाव देणाऱ्या समाजरचनेतही ही संभाव्यता कमी असते. आजची आपली समाजरचना अनेक जुनाट सामाजिक संस्थांच्या अस्तित्वामुळे इतकी विसंगत स्वरूपाची झाली आहे व लोकमताचा अडाणी दबाव सध्याच्या समाजात एवढा असतो, की वरील संभाव्यतेचे प्रमाण खूपच वाढते. ज्यांना आपल्या जीवनात काही मध्यवर्ती ध्येय असावे असे वाटते त्यांनी प्रसंगानुरूप आपल्या इच्छाशक्तीचा अंतर्गत वापर केला पाहिजे. समाजरचना जसजशी सुधारत जाईल तसतसे असे प्रसंग कमी येतील इतकेच. हे असे होणे इष्ट आहे. कारण इच्छाशक्ती अशा रीतीने अंतर्गत कारणासाठी वापरावी लागली की बाह्य प्रतिकूल परिस्थितीशी झगडताना तिचे सामर्थ्य त्या प्रमाणात कमी पडले आणि आज ज्या सहजप्रवृत्तीशी झगडावयाचे त्या जर प्रबल असल्या तर या झगड्यात इच्छाशक्तीचे मूळ सामर्थ्यही क्षीण होते. अनेक मानसिक बंधनांनी जखडलेले जीवन लवकरच आपला उत्साह गमावून बसेल व गलितगात्र आणि उदास होईल. सहजप्रवृत्ती ज्या वेळी सारख्या दडपल्या जातात तेव्हा त्या मरणाच्या पंथाला लागतात; आणि त्या तशा लागल्या नाहीत तर आतल्याआत दबून अन्य कोठून तरी अधिक विपरित स्वरूपात बाहेर उफाळून येतात. यासाठी अंतर्गत इच्छाशक्तीचा वापर करण्याचे शक्य तोवर टाळले पाहिजे आणि आचरणातील सुसंगतीही सहजप्रवृत्तींना दडपून टाकून निर्माण होण्याऐवजी सहजप्रवृत्तींच्या सुसंगत मेळातून निर्माण झाली पाहिजे.

जीवनाची एकात्मता साधणे म्हणजे करमणूक किंवा खेळ यासारख्या किरकोळ आकांक्षांना दडपून टाकणे नव्हे. याच्या उलट जीवनातील मुख्य ध्येयाला हानिकारक नसणाऱ्या सर्व प्रकारच्या सुखोपभोगाशी समन्वय साधण्याचा संपूर्ण प्रयत्न केला पाहिजे. सवय म्हणून मद्यप्राशन, मादक पदार्थांचे सेवन, क्रूरतेवर आधारलेली क्रीडा, किंवा दुसऱ्याला दुःख देऊन मिळणारे सुख या गोष्टी मूलतः अपायकारक आहेत. परंतु सुसंस्कृत समाजातील करमणुकीच्या गोष्टीपासून काही अपाय होण्याची शक्यता नसते व क्वचित असलीच तरी तो अपाय टाळून त्या करमणुकीचा उपभोग घेता येईल अशी रचना करता येणे शक्य असते. हटयोग किंवा करडा साधेपणा याचा आग्रह धरण्याचे कारण नाही, तर प्रभावी प्रेरणा किंवा आकांक्षा यांना महत्त्वाच्या सर्जनशील गोष्टींकडे जावयाचे वळण लावणे ही गोष्ट आवश्यक आहे. जेव्हा अशा प्रेरणा व आकांक्षा जोमदार असतात तेव्हा आपोआपच त्या मंगल जीवनाकडे जात असतात.

परंतु करमणूक व साहस या दोन्ही गोष्टींना स्थान असले तरी केवळ त्याच गोष्टींचा हव्यास माणसाने धरला तर चांगले जीवन अशक्य होईल. केवळ आपल्या सुखाकडे पाहण्याच्या आत्मकेंद्रित वृत्तीतून जीवनाचे तुकडे पडतात व त्याची प्रगती थांबते. करमणूक हेच आपल्या जीवनाचे ध्येय मानणाऱ्या मनुष्याला त्याच त्या करमणुकीचा कंटाळा येऊ लागतो. या कंटाळ्यातून तो नवी करमणूक शोधू लागतो. परंतु त्या करमणुकीचीही तीच स्थिति होते. करमणूक ही नेहमीच तुटक तुटक अशी असते. तिच्यात आंतरिक सातत्य नसते. जीवनाला एकात्मता देणाऱ्या कार्यासाठी दीर्घकाल परिश्रमाची आवश्यकता असते. एखादे महान स्मारक उभे करण्याच्या स्वरूपाचे ते काम असते; वाळूत मुले लुटीपुटीचा किल्ला बांधतात तसे नव्हे.

करमणुकीच्या क्षेत्राखेरीज इतरत्रही अशी आत्मकेंद्रित वृत्ती आढळू शकते. अनेक माणसांना ज्यावेळी आपण प्रेमात पडलो आहोत असे वाटत असते, तेव्हा त्यांचे प्रेम खरे दुसऱ्या व्यक्तीवर नसते तर आपल्या आत्मकेंद्रित भावनेवरच असते. अशा प्रीतीतून खरी एकता साध्य होत नाही किंवा मूलतः असणारा दुरावाही कमी होत नाही. अशा भावनेची उत्कटता कमी झाली की आत्मकेंद्रित व्यक्तीला तिचे सातत्य टिकविण्याची आवश्यकता वाटत नाही. वेगळ्या पद्धतीने प्रॉटेस्टंट धर्म व नीतीकल्पना यांनी अशीच आत्मकेंद्रित वृत्ती वाढीस लावली. बाह्य जगाकडे व त्याच्याशी आपल्या असणाऱ्या संबंधांकडे व्यक्तीचे लक्ष वळविण्याऐवजी त्यांनी पापाची कल्पना व आपल्या आत्म्याचा विकास या गोष्टीवर भर दिला. अशी कोणत्याही स्वरूपाची आत्मकेंद्रित वृत्ती व्यक्तीच्या जीवनाचे तुकडे पाडल्याखेरीज व तिला एकाकी बनविल्याखेरीज राहत नाही. प्रभावी प्रेरणापासून निर्माण होणारे व आत्मकेंद्रित नसणारे जीवनच इतरांच्या जीवनाशी समरस होऊ शकते.

सुखाचा पाठलाग किंवा सद्‌गुणांचा पाठलाग या दोहोतही आत्मकेंद्रित वृत्तीचा दोष येतो. सुखवाद किंवा संन्यासवाद या दोहोवरही या वृत्तीचा ठपका येऊ शकतो. आपण सद्‌गुणी व्हावे म्हणून स्वतःवर निर्बंध लादून घेणारा मार्क्स ऑरेलिअस हा काही आदर्श पुरुष होऊ शकत नाही. ज्या जीवनात कृती करण्यापेक्षा विचार करीत बसणे या गोष्टीला अधिक महत्त्व असते ते जीवन स्वाभाविकपणेच आत्मकेंद्रित होते. बाह्य जगातील वस्तूंची स्मृती किंवा त्या विषयींची इच्छा असा परिस्थितीत अस्तित्वात असतात; मात्र त्यांचा प्रत्यक्ष अनुभव नसतो. यामुळे त्या वस्तूंना अशा व्यक्तीच्या मनात केवळ काल्पनिक स्थान असते. प्रत्यक्ष वस्तूंच्या अनुभूतीऐवजी आपण त्या वस्तूंच्या संकल्पनांनाच अधिक महत्त्व देतो. संस्कृतीचा जसजसा विकास होत जातो तसतशी ही वृत्ती वाढीस लागते. कारण प्रगत संस्कृतीत प्रत्यक्ष कृतीच्या मानाने विचारशीलतेचे महत्त्व अधिक वाढत असते. परंतु विचार जर क्रियाशील असेल, आणि एखाद्या ध्येयाकडे प्रवृत्त असेल तर त्याचा असा वाईट परिणाम होत नाही. केवळ निष्क्रिय विचार आत्मकेंद्रित वृत्तीकडे नेत असतो. विचाराचा सहजप्रवृत्तीशी आणि आकांक्षांशी सतत अनुबंध राहिला पाहिजे आणि एखाद्या बाह्य प्रत्यक्ष हेतूच्या सिद्धीसाठी त्याचे कार्य चालले पाहिजे. नाहीतर विचार आणि सहजप्रवृत्ती ही एकमेकांची शत्रू बनतील व यात दोघांचेही नुकसान आहे.

सर्वसामान्य स्त्री-पुरुषांचे जीवन कमी तुटक व्हावे व त्यात सर्जनशील प्रेरणेला अधिक वाव रहावा यासाठी केवळ एखादे चांगले ध्येय निवडून त्याच्या चांगुलपणाचा उद्‌घोष करण्याने भागणार नाही. सामाजिक संस्था आणि श्रद्धा यांचा प्रेमावर काय परिणाम होतो ते पाहिले पाहिजे व संस्थांत आवश्यक ते बदल करण्याचे मार्ग शोधून काढले पाहिजेत. हे वैचारिक काम केल्यानंतरही एखाद्या प्रभावी राजकीय शक्तीचे सहाय्य जर आपण मिळवले नाही तर आपले कार्य निष्फल होईल यासाठी हवे असणारे सहाय्य मजूरवर्गाकडून मिळण्याची अपेक्षा राखता येईल. कारण आपल्याला इथे हवे असलेले बदल, मजूरवर्गालाही, विशेषतः युद्धोत्तर अडचणीच्या काळात, इष्ट वाटतील. युद्ध संपल्यानंतर मजूर वर्गातील असंतोष युरोपमध्ये सार्वत्रिक पसरेल या शंका नाही आणि या राजकीय शक्तीच्या जोरावर मोठे परिवर्तन घडवून आणता येण्याची शक्यता आहे.

सुधारलेले जग जर अवनत व्हावयाचे नसेल तर त्यात मूलगामी परिवर्तन होण्याची आवश्यकता आहे. हे परिवर्तन आर्थिक व्यवस्थेत होणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे जीवनविषयक तत्त्वज्ञानातही होणे आवश्यक आहे. आपल्यापैकी ज्यांना असे परिवर्तन व्हावे असे वाटते त्यांनी केवळ हताशपणे स्वस्थ बसता कामा नये. आपण मनात आणले तर भविष्यकाळावर आपला सखोल प्रभाव पडू शकतो. आपल्याला कोणत्या प्रकारची बदल हवा आहे ते आपण शोधून काढू शकतो व त्याचा प्रचार करू शकतो. यासाठी सध्याच्या श्रद्धांत जे इष्ट आहे ते आपण स्वीकारले पाहिजे आणि जे अनिष्ट किंवा अनावश्यक असेल ते टाकले पाहिजे. जे पूर्णपणे प्रतिगामी वृत्तीचे नाहीत अशा लोकांचा याला पाठिंबा मिळू शकेल. कोणत्या प्रकारचा बदल इष्ट आहे हे स्पष्ट झाले की नंतर त्याचा विभागशः तपशील तयार करता येईल. परंतु युद्ध संपेपर्यंत या तपशीलात शिरण्याचे कारण नाही. कारण युद्ध संपल्यानंतर जग कोणत्या अवस्थेत आपल्या हाती लागणार आहे याविषयी आज काहीच सांगता येत नाही; परंतु युद्धोत्तर जगात नव्या विचारांची मोठी गरज लागेल हे निश्चित आहे. परंपरागत विचार फार उपयोगी पडू शकणार नाहीत. परंपरागत राजकीय विचारसरणीने मानवाच्या ज्या धोरणावर भर दिला त्या प्रेरणा मानवाच्या महत्त्वाच्या कृत्यांना कारणीभूत होत नाहीत हे स्पष्ट आहे. राजकीय विचारप्रणालींनी मांडलेल्या उपपत्तीपेक्षा अधिक सखोल अशी सहजप्रवृत्तीवर आधारित असलेली उपपत्ती युद्धे कशी सुरू होतात व कशी चालू राहतात याच्या मीमांसेसाठी आवश्यक आहे. ज्या थोड्या लोकांनी युद्धाला विरोध केला त्यांची युद्धविरोधी भावनाही अशीच सखोल सहजप्रवृत्तीवर आधारित असते. आणीबाणीच्या काळातही टिकून राहू इच्छिणाऱ्या राज्यशास्त्रीय उपपत्तीने माणसाच्या प्रकट विचारांच्या मागे दडलेल्या सहजप्रवृत्तींची दखल घेतलीच पाहिजे. या सहजप्रवृत्तींना योग्य आवाहन करून त्या विध्वंसक होण्याऐवजी विधायक रीतीने कार्यकारी कशा होतील याचा शोध घेतला पाहिजे.

अर्थव्यवस्था ही तिच्या रचनेप्रमाणे जीवनाला फार मोठ्या प्रमाणात पोषक किंवा मारक होऊ शकते. पूर्वीचा गुलामगिरीचा काळ जर सोडला तर आजच्या

औद्योगिक अर्थव्यवस्थेइतकी जीवनाला मारक अशी दुसरी अर्थव्यवस्था झाली नाही. यंत्रे आणि मोठ्या प्रमाणावरील उत्पादन यातून आता सुटका नाही. आजच्या अर्थव्यवस्थेच्या जागी जी कोणतीही अर्थव्यवस्था अस्तित्वात येईल तिच्यात या गोष्टींना स्थान राहणारच. औद्योगिक संघटनांची संघराज्यात्मक लोकशाही अस्तित्वात आणण्याच्या दिशेने आपण यापुढील वाटचाल करणे कदाचित सर्वात अधिक युक्त होईल.

ज्यावेळी एखाद्या जीवनविषयक तत्त्वज्ञानावर एखाद्या समाजाची श्रद्धा असते, तेव्हा ते तत्त्वज्ञान त्या समाजात फार मोठा जोम निर्माण करू शकते. मनुष्याच्या सुखाच्या दृष्टीने त्याचे आर्थिक उत्पन्न ही सर्वात महत्त्वाची गोष्ट आहे हे आजचे सार्वजनिक जीवन-तत्त्वज्ञान आहे. या तत्त्वज्ञानाचे इतरही दोष आहेतच. परंतु एक महत्त्वाचा दोष असा की, ते शेवटी घ्यावयाच्या सर्वसामान्य उपभोगावर लक्ष केंद्रित करते आणि प्रत्येक व्यक्तीत असणाऱ्या स्वतंत्र सर्जनशीलतेच्या आविष्काराला महत्त्व देत नाही. याहून अधिक परिणत जीवनतत्त्वज्ञान - की ज्या प्रकारचे उच्च शिक्षणात विद्यार्थ्यांच्या अंगी बाणवण्याचा प्रयत्न केला जातो - हे बहुश: भविष्यकाळाऐवजी भूतकालाकडे पाहणारे असते आणि प्रभावी कार्यापेक्षा शिष्टमान्य आधारावर त्याचा भर असतो. असे जीवन तत्त्वज्ञानही नव्या सदैव वाढत्या ज्ञानाच्या संदर्भात परंपरेचे ओझे दूर फेकण्याचे सामर्थ्य देऊ शकणार नाही.

जीवनाला पोषक होईल अशी तत्त्वज्ञानाची, किंवा धर्माची, आज जगाला गरज आहे. परंतु कोणतीही गोष्ट जर जीवनाला पोषक व्हावयास हवी असेल तर तिने जगण्यापलीकडे काही ध्येय स्वीकारावे लागते. केवळ जगण्याकडे लक्ष केंद्रित करणारे जीवन हे पशुजीवन होय. त्यात कोणतेही मानवी मूल्य नसते. अशा जीवनाचा उबग येणे व ते निरर्थक वाटणे साहजिक असते. मानवी जीवन, जीवन म्हणून सफल व्हावयाचे असेल तर मानवी जीवनाच्या भौतिक हेतूपलीकडील काही हेतू त्याला असावा लागतो; मग तो हेतू परमेश्वर असो, सत्य असो वा सौंदर्य असो. जीवन संपन्न व्हावे अशी ज्यांची इच्छा असते ते लोक केवळ जीवनाकडे अंतिम हेतू म्हणून पाहत नाहीत. सर्वकाळ कालाच्या अतीत, सर्व संघर्ष व अपयश यांच्यापासून मुक्त, असे एखादे चिरंतन स्वर्गीय तत्त्व जीवनात अवतरावे यासाठी त्यांचा प्रयत्न असतो. हे चिरंतन विश्व कदाचित काल्पनिक असले तरी त्याच्याशी आपला संबंध जुळला की व्यावहारिक जगातील धडपड, अपयश यांनी खचून न जाणारे सामर्थ्य व मनःशांती आपल्याला लाभतात. या चिरंतनाच्या ध्यासालाच स्पिनोझा परमेश्वराची बौद्धिक भक्ती असे नाव देतो. ज्यांना एखादी गोष्ट समजली, त्यांना समंजसपणाची गुरुकिल्लीच सापडली असे म्हणण्यास हरकत नाही.

प्रत्येकाने काय करावे हे ज्याच्या त्याच्या 'स्वधर्मा'वर व परिस्थितीवर अवलंबून राहील. परंतु आपली अध्यात्मिक प्रवृत्ती जर जागृत असेल तर आपण काय केले पाहिजे हे ज्याचे त्याला स्पष्ट होत जाईल.

चिरंतनाशी संपर्क साधून, या दुःखी जगात काही दैवी अंश आणण्याचा प्रयत्न करून या क्रौर्य, संघर्ष आणि द्वेष यांनी भरलेल्या जगातही आपल्याला आपल्या जीवनात या क्षणी देखील सर्जनशीलता आणता येणे शक्य आहे. परिग्रहावर आधारित समाजरचनेत व्यक्तीचे जीवन सहनशील करणे ही गोष्ट अवघड असते. भविष्यकाळातील नवसमाज-रचनेत ते अधिक सोपे होईल. परंतु नवसमाज-रचनेसाठी धडपडणाऱ्या सर्वांना एकाकीपणा, विरोध, दारिद्र्य आणि अवमान यांना तोंड देण्याची सिद्धता ठेवली पाहिजे. सत्य, प्रीती आणि अजेय बुद्धिनिष्ठ आशा यांच्या आधारावर आपले जीवन व्यतीत करण्याची त्यांच्यात हिंमत असली पाहिजे. त्यांच्यामध्ये नेकी, सुजाणपणा, निर्भयता आणि ध्येयनिष्ठा हे गुण वास करीत असले पाहिजेत. अशा प्रेरित स्त्रीपुरुषांचा संघ प्रथम आपल्या अंतर्गत जीवनातील अडचणी आणि गोंधळ मिटविण्यात यशस्वी होईल आणि कालांतराने - कदाचित फार मोठ्या कालावधीनंतर - बाह्य जगातही यशस्वी होईल. सुजाणपणा आणि आशा यांची जगाला गरज आहे. आणि जग जरी या दोहोंवर सदैव हल्ला करीत असले तरी शेवटी ते त्यांच्यापुढे आदराने नम्र झाल्याखेरीज राहत नाही.

ज्यावेळी गॉथ लोकांनी रोम शहर लुटले त्या काळी सेंट ऑगस्टाईनने 'ईश्वराची नगरी' (City of God) हा जगाला नवी आशा देणारा आपला ग्रंथ लिहिला. त्यानंतरच्या उलटलेल्या अनेक शतकात सेंट






ऑगस्टाईनने प्रज्वलित केलेली आशा तेवत राहिली व तिने लोकांना प्रेरणा दिली. रोमला मात्र घसरत घसरत एखाद्या खेड्याची अवकळा आली. आज जग विनाशाच्या खाईत लोटत असता आपणही चिंतनाच्या साहाय्याने एखादे नवे अधिक मंगल जग उभविण्याची आशा जागविली पाहिजे. परिस्थिती प्रतिकूल आहे; परंतु म्हणूनच, अनुकूल परिस्थितीत आपण काय केले असते त्याहून अधिक कामाची आपल्याकडून अपेक्षा आहे. आपण ज्या पिढीला ओळखत होतो व जिच्यावर आपण प्रेम केले, ती पिढी नाश पावली आहे. भावी पिढ्या अशा विनाशापासून वाचाव्यात यासाठी धगधगीत वैचारिक आणि अध्यात्मिक प्रयत्नांची निकड आहे.

शिक्षक म्हणून अनेक देशांतील युद्धाशी संबंध येण्याचे भाग्य मला लाभले आहे. या युवकांच्या मनात आशा मुसमुसलेली होती. आपल्या स्वप्नरंजनातील विश्वाचा काही भाग तरी वस्तुस्थितीत साकार करून दाखवावा अशी सर्जनशीलता त्यांच्या ठिकाणी होती. आज हे युवक युद्धात खेचले गेले आहेत. काही या बाजूने, काही त्या बाजूने. यापैकी काही जण अजून लढत आहेत. काही जण जन्माचे लुळेपांगळे झाले आहेत; मृत्युमुखी पडले आहेत. जे परत येतील त्यांच्यातीलही अध्यात्मिक जीवनाची वृत्ती कोळपलेली असेल, आशा निराश झाली असेल, उत्साहाचा झरा आटलेला असेल. मृत्यूकडे नेणारा कंटाळवाणा प्रवास एवढेच त्यांच्या उरलेल्या आयुष्याचे सार राहील. अनेक शिक्षकांना या शोकांतिकेची जाणीव नाही. हे सर्व बलिदान अपरिहार्य कसे होते, हे ते लोक कठोर शुष्क तर्काच्या साहाय्याने सिद्ध करून दाखवू शकतात. मनात केव्हा चुकून भावनेचा ओलावा निर्माण झालाच, तरी ते आपल्या मनाची स्वस्थता फार काळ बिघडू देत नाहीत. अशा लोकांची अध्यात्मिक जीवनाची शक्ती मृत झाली आहे असे समजावे. तसे नसते तर त्यांच्या वृत्तीला त्या युवकांच्या वृत्तीशी तादात्म्य होता आले असते; त्या युवकांच्या आई-वडिलांच्या अंतःकरणातील वेदना तितक्याच उत्कटतेने प्रतीत झाली असती. आपपरतेच्या भिंती बाजूला सारून त्या युवकांचे दुःख आत्मीयतेने त्यांच्या अंतःकरणाला झोंबले असते. मग आवाज उठला असता : 'नाही, हे योग्य नाही. हे इष्ट नाही. यौवनाचा विनाश करणारे, त्याला धूसर बनविणारे कोणतेही तत्त्व धर्मतत्त्व होऊ शकत नाही. चूक आपण, जुन्या पिढीतील लोकांनी केली आहे. आपण दुष्ट भावना मनात बाळगल्या, आपला आत्मा मरू दिला, आपले अंतःकरण आपण उदार ठेवले नाही आणि या सर्वांचा परिणाम म्हणून या युवकांना रणांगणावर जावे लागले. या मृत्यूपासून आपण मागे फिरू या. खरे मृत तर आपण आहोत. आपण जीवनाच्या घेतलेल्या धसक्यामुळे ज्यांना रणांगणावर मरण पत्करावे लागेल ते काही खरे मृत नव्हेत. त्यांची मुतेदेखील आमच्यापेक्षा सजीव आणि चैतन्यशील आहेत. ती मुते सर्व भावी युगांच्यापुढे उपहास आणि अवमान याच्यासाठी आपल्या पिढीला उभे करतील. ही मुतेच नवजीवन निर्माण करतील आणि या नवजीवनाची खरी गरज आमच्या मृतप्राय पिढीलाच आहे.'



## A Free Man's Worship

To abandon the struggle for private happiness, to expel all eagerness of temporary desire, to burn with passion for eternal things - this is emancipation and this is the free man's worship.

**- Bertrand Russel**

## अश्रद्धाचे मुक्तिसाधन

सर्व स्वार्थांच्या पलीकडे  
क्षणिक तृष्णांच्या अलीकडे  
चिरंतनाची कामना  
अश्रद्ध मुक्ति-अर्चना

(अनुवाद : देवदत्त दाभोलकर)

अनुक्रमणिका






# अर्थशास्त्र की अनर्थशास्त्र? : प्रस्तावना

जॉन रस्किन

(अनुवाद : आचार्य शं० द० जावडेकर)

पुढील चार लेख सुमारे दीड वर्षापूर्वी कॉर्नहिल मासिकात प्रसिद्ध झाले होते आणि माझ्या माहितीप्रमाणे ज्यांनी ते वाचिले त्यांच्यापैकी बहुतेकांनी त्यावेळी प्रतिकूल टीकेचा भयंकर मारा त्यांच्यावर केला होता. तथापि मी आतापर्यंत जे जे लिहिले आहे, त्यात हे लेख अत्यंत सत्यपूत आणि उपयुक्त असे असून त्यांतील शब्दयोजनाही अगदी यथायोग्य झाली आहे हा माझा विश्वास त्यांच्या या टीकेमुळे रतीमरही कमी झालेला नाही. या लेखातील शेवटचा लेख लिहिताना विशेष सायास घेतले असल्याने यापुढे मी जे लिखाण करीन त्यातही तो बहुधा श्रेष्ठ असा ठरेल, असे मला वाटते.

'हे सर्व खरे असेल' वाचक म्हणतील, 'पण त्यावरून हे लिखाण चांगले आहे असे सिद्ध होत नाही.' केवळ वरकरणीच नव्हे तर खऱ्या नम्र भावाने मी हेही कबूल करतो. तथापि मी केलेले इतर कोणतेही लिखाण माझ्या पसंतीस येत नाही, असे असूनही हे लेख वाचून मला समाधान होते आणि म्हणून मला फुरसत मिळताच त्यातील विषयांचा अन्यत्र विस्तार करण्याचे योजून, ज्यांना हे प्रास्ताविक विचार पाहण्याची इच्छा असेल त्याना उपलब्ध व्हावेत म्हणून ते पूर्वी जसे प्रसिद्ध झाले तशाच स्वरूपात पुन: प्रसिद्ध करीत आहे. त्यापैकी एके ठिकाणी वजनाचा अंदाज सांगताना चुकलेला असा एकच शब्द सुधारलेला असून अगदी नव्या अशा एकाही शब्दाची भर त्यात घालण्यात आलेली नाही.

या निबंधात कोणतीही सुधारणा करण्याची जरी मला आवश्यकता भासत नाही तरी त्यांच्या मांडणीतील एका गोष्टीबद्दल मला खेद होतो. ठरावीक पगाराच्या आधारावर मजुरांची संघटना करणे आवश्यक आहे, या सिद्धांताच्या विवेचनास यांपैकी पहिल्याच लेखात स्थान दिले गेले आहे हीच ती गोष्ट होय. हा सिद्धांत फारच आश्चर्यकारक असा भासतो, तथापि त्याचे समर्थन करणे मोठेसे कठीण आहे असे नाही. पण तो अगदी सामान्य महत्त्वाचा आहे. शुद्ध इंग्रजी भाषेत प्रथमच संपत्तीची तर्कशुद्ध व्याख्या करणे हा या निबंधाचा मूलभूत हेतू किंवा मध्यवर्ती अभिप्राय आहे, व तेच खरे रहस्य आहे. संपत्तीच्या अशा व्याख्या प्रसंगानरोधाने प्लेटो आणि झेनोफोन यांनी ग्रीक भाषांत, तसेच सिसेरो आणि होरेस यांनी लॅटिन भाषेत उत्तम प्रकारे केलेल्या आहेत. अर्थशास्त्रातील विवेचनास आधार म्हणून अशा व्याख्या अगदी अपरिहार्य आहेत. अलीकडील काळात या विषयावरील अत्यंत प्रसिद्धी पावलेल्या अशा एका निबंधाचे लेखक 'संपत्तीच्या स्वरूपाचे संशोधन करणे किंवा ते विशद करणे हे आपले कर्तव्य आहे असे अर्थशास्त्रावरील लेखक मानतात' असा उपक्रम करून पुढे लिहितात, 'संपत्ती म्हणजे काय याची सामान्य व्यवहाराला पुरेशी यथार्थ कल्पना प्रत्येक मनुष्याला असतेच... अध्यात्मिक सूक्ष्म दृष्टीने व्याख्या बनविणे हे काही या पुस्तकाच्या उद्देशात अंतर्भूत होत नाही.'

भौतिक विषयाच्या विवेचनात अध्यात्मिक सूक्ष्म दृष्टीची आवश्यकता नाही हे तर खरेच, पण त्यात भौतिक सूक्ष्मता व तार्किक शुद्धता यांची तरी आवश्यकता असते हे निश्चित.

समजा की, आपला विषय मानवी व्यापार हा नसून ज्योतिषशास्त्र किंवा खगोल व्यापाराचे शास्त्र हा आहे; आणि त्या विषयावरील एक लेखक अर्थशास्त्रातील स्वयंप्रकाशी व परप्रकाशी संपत्तीतील भेदाप्रमाणे स्थिर व चल ज्योतींमधील भेदाकडे दुर्लक्ष करून म्हणू लागला, 'तारका म्हणजे काय यासंबंधी सामान्य व्यवहाराला पुरेशी यथार्थ कल्पना प्रत्येक मनुष्यास असतेच. अध्यात्मिक सूक्ष्म दृष्टीने तारकेची व्याख्या बनवणे हा काही पुस्तकाचा हेतू नव्हे' तर अशा लेखकाविषयी आपणास काय वाटेल? पण, संपत्तीसंबंधी सामान्य लोकांत रूढ असलेल्या कल्पनांच्या आधारावर रचलेल्या अर्थशास्त्रावरील पुस्तकापेक्षा वरील प्रकारचा उपन्यास केलेले ज्योतिषशास्त्र अंतिम सिद्धांताच्या दृष्टीने अधिक सत्य आणि नाविकांच्या दृष्टीने सहस्त्रपट अधिक






उपयुक्त ठरू शकेल.

म्हणून संपत्तीची एक बिनचूक आणि स्थिर अशी व्याख्या बनविणे हा पुढील निबंधाचा पहिला उद्देश होय. त्यांचा दुसरा उद्देश असा आहे की, समाजाच्या विशिष्ट नैतिक परिस्थितीतच धनसंपादनाचे कार्य चालू राहणे अंतिमदृष्ट्या शक्य असते. या आधारभूत नैतिक परिस्थितीच्या दृष्टीने मनुष्याच्या प्रामाणिकपणावरील विश्वास आणि व्यवहारक्षेत्रांतही आपणास प्रामाणिक बनता येणे शक्य आहे अशी श्रद्धा, या गोष्टींना अगदी पहिले स्थान द्यावे लागते.

प्रामाणिक मनुष्य ही परमेश्वरी सृष्टीतील सर्वश्रेष्ठ कृती आहे असे पोप म्हणतो. या त्याच्या सिद्धांतासंबंधी कोणतेही निर्णायक मत देण्याचे धाडस न करता - कारण अशा बाबतीत मनुष्याच्या मताला केव्हाही निर्णायक स्वरूप येणे शक्य नाही, आपणास असे मान्य करिता येईल की, आज दृष्यमान असणाऱ्या सृष्टीतील परमेश्वराच्या सर्वोत्तम कृतीत प्रामाणिक मनुष्याची गणना होऊ शकते. विद्यमान परिस्थितीत प्रामाणिक मनुष्य काहीसा दुर्मिळ असला तरी त्याचे अस्तित्व अश्रद्धेय किंवा चमत्कारवजा; अपवादभूत नाहीच नाही. प्रामाणिकपणा हा मानवी व्यवहारात मधूनमधून अव्यवस्था उत्पन्न करणारी अशी एखादी उपद्रवी शक्ती नसून याच शक्तीच्या सतत प्रभावामुळे आर्थिक व्यवहारांच्या कक्षांतील मानवरूप गोलांचे व्यापार सुव्यवस्थित चालू शकतात व तिच्या अभावी इतर कोणत्याही शक्तीच्या प्रभावाने ते तसे चालू शकणार नाहीत.

मानवी गुणांचे मूल्यमापन करण्याची पोपची दृष्टी वाजवीपेक्षा अधिक उदात्त नसून कमी उदात्त आहे, अशीही टीका त्याच्या वरील सिद्धांतावर केल्याचे मी केव्हा केव्हा ऐकिले आहे : 'प्रामाणिकपणा हा एक मानार्ह सद्‌गुण आहे; पण मनुष्याला याहून कितीतरी श्रेष्ठ गुण संपादिता येतील. आम्ही केवळ सचोटीने वागावे याहून आमच्याबद्दल अधिक अपेक्षा करण्यात येऊ नये काय?'

सन्मित्रहो, तूर्त एवढे पुरे आहे. याहून अधिक श्रेष्ठ बनण्याच्या आकांक्षेमुळे इतकेही उच्च होण्याचे औचित्य आम्ही काही अंशी विसरून गेलो आहो असे दिसते. इतर कोणकोणत्या गोष्टींवरील आमची श्रद्धा उडाली आहे हा प्रश्न येथे उद्भवत नाही; पण सचोटी या सामान्य सद्‌गुणावरील आणि त्याच्या कार्यक्षमतेवरील आमचा विश्वास उडाला आहे हे निश्चित. आणि हा विश्वास पुन: जागृत करणे व त्यास आधारभूत अशी परिस्थिती निर्माण करून ती कायम ठेवणे, हे आपले अगदी पहिले कर्तव्य आहे. केवळ आपला वृत्तिच्छेद होईल या भीतीने नव्हे, तर याहून अन्य हेतूने इतरांची फसवणूक न करणारे लोक अद्याप या जगात आहेत, अशी केवळ अंध विश्वासाने नव्हे तर प्रत्यक्ष अनुभवाने आपली खात्री करून घेतली पाहिजे. एवढेच नव्हे, तर असे लोक कोणत्याही समाजात जितक्या प्रमाणात असतील अगदी तितक्याच प्रमाणात तो समाज, ते राष्ट्र आपले अस्तित्व टिकवू शकते किंवा टिकवू शकेल.

म्हणून याच दोन मुद्द्यांवर या निबंधाचा मुख्य रोख आहे. मजूर संघटनेचा प्रश्न केवळ आपापत: उल्लेखित झाला आहे. कारण एकदा आपल्या औद्योगिक नेत्यांच्यामध्ये पुरेशी सचोटी निर्माण झाली, म्हणजे मजुरांची संघटना फार सुलभ होईल आणि कोणतीही अडचण किंवा तंटा उपस्थित न होता तिचा विकास होऊ शकेल; पण या नेत्यांतच जर सचोटी नसेल तर मजुरांची संघटना करणे हे अधिकच अशक्य बनेल.

वरील गोष्ट शक्य होण्यास आवश्यक असणाऱ्या कारणांचा सविस्तर विचार मी पुढे करणारच आहे. तथापि मूलभूत तत्त्वांचे पुढील विवेचन चालू असता त्या तत्त्वांच्या आधारे आपणास अनपेक्षित अशा एखाद्या धोक्याच्या स्थळी नेण्यात येत आहे की काय, अशी भीती वाचकांस उरू नये म्हणून जे भयानक राजकीय सिद्धांत वाचकांच्या गळी उतरविण्याचा माझा प्रयत्न आहे, ते एकदम येथे सांगून टाकतो.

१. सर्व देशभर सरकारने आपल्या खर्चाने व आपल्या नियंत्रणाखाली तरुणांना शिक्षण देणाऱ्या संस्था काढाव्या; देशात जन्मास येणाऱ्या प्रत्येक मुलास त्याच्या आईबापांच्या संमतीने या शाळांत जाण्याची मुभा असावी व काही परिस्थितीत दंड ठेवून तशी सक्ती करण्यात यावी आणि या शाळांमध्ये त्या देशात जितकी श्रेष्ठ शिक्षणकला उपलब्ध असेल तितकी सर्व योजून प्रत्येक मुलास पुढील तीन गोष्टींचे आवश्यक शिक्षण देण्यात यावे :

अ. आरोग्याचे नियम व त्यास अनुरूप असे व्यायाम.

आ. सभ्यता आणि न्याय्य वर्तनाच्या सवयी.

इ. जीवनोपयोगी असा एखादा धंदा. (याखेरीज काही गौण विषयांच्या शिक्षणाचा विचार पुढे करण्यांत येईल.)

२. याच शिक्षणसंस्थांना जोडून जीवनास आवश्यक अशा सर्व वस्तू निर्माण करणारे कारखाने आणि सर्व उपयुक्त कला चालू असणारी कलागृहे सरकारने आपल्या नियंत्रणाखाली काढावीत व त्यातील मालाच्या विक्रीचीही व्यवस्था सरकारनेच करावी. खाजगी व्यवसायांवर कोणतेही निर्बंध न घालता, त्यांच्यावर कोणताही कर न बसविता अथवा त्यांच्या व्यवसायात कोणताही हस्तक्षेप न करता, सरकारशी स्पर्धा करण्याची व शक्य तर या स्पर्धेत सरकारास पराभूत करण्याची खाजगी धंदेवाल्यांस पूर्ण मुभा असावी. अशा सरकारी कारखान्यांत व दुकानांत चांगला व नमुनेदार अधिकृत माल बनविण्याची व विकण्याची व्यवस्था करावी. तेथे मिळणारा माल शुद्ध व खरा असा असावा व काम चोख असावे. असे केल्याने सरकारने ठरविलेली किंमत देण्याची आपली तयारी असल्यास आपणास निर्भेळ खाद्य, निर्भेळ पेय व निर्भेळ काम मिळण्याची शाश्वती लोकांस वाटू लागेल.

३. एखादा पुरुष, स्त्री, मुलगा अथवा मुलगी बेकार आढळल्यास त्यांना नजीकच्या सरकारी शिक्षणसंस्थांत नेऊन जे काम करण्यास तो किंवा ती लायक असल्याचे आढळून येईल, ते त्यांना ठरावीक वेतन देऊन करावयास लावावे. या वेतनाचे दर दरसाल ठरविण्यात यावेत. अडाणीपणामुळे त्यांना काम करता येणे शक्य नसल्यास त्यांना त्याचे शिक्षण द्यावे. आजारामुळे काम करणे शक्य नसल्यास त्यांच्या शुश्रुषेची व्यवस्था करावी. पण काम करण्याची त्यांची इच्छाच नसेल तर समाजाला उपयुक्त अशी अधिक कष्टांची व हीन गणलेली कामे त्यांच्याकडून कठोर शिस्तीने करवून घ्यावीत. विशेषत: खाणीतील व इतर धोक्याच्या जागेतील कामे त्यांस देण्यात यावीत. (मात्र या कामातील धोका काळजीपूर्वक बनविलेल्या नियंत्रणांनी व कामातील शिस्तीने शक्य तितका कमी करण्यात यावा.) या कामांचा जो योग्य मोबदला असेल त्यांतून सक्ती करण्यासाठी सरकारला पडलेला खर्च वजा करून उरलेली रक्कम त्यांच्या नावे ठेवून द्यावी आणि काम करण्यासंबंधीची त्यांची वृत्ती सुधारल्यानंतर ती त्यांना देण्यात यावी.

४. जे वृद्ध आणि निराश्रित असतील त्यांच्या सुखाची आणि आश्रयाची व्यवस्था सरकारने करावी. वरील सर्व सूचना अमलात आणल्यानंतर गुन्हेगारी आणि दुर्दैवाचे आघात त्यांची फळे पृथक्पणे लोकनिदर्शनास येतील व म्हणून अशा प्रकारच्या सरकारी व्यवस्थेचा उपयोग करून घेण्यात कोणासही मानहानी वाटणार नाही, किंबहुना मानच वाटेल. 'कारण ज्याप्रमाणे मध्यम वर्गातील लोक तरवारीने, लेखणीने अथवा वैद्यकीय चाकू चालवून समाजाची सेवा करीत असतात, त्याचप्रमाणे मजूरवर्गही आपल्या खोऱ्याकुदळीने आपल्या देशाची सेवा करीत असतो. जर हे काम कमी महत्त्वाचे असेल व म्हणून निरोगी असताना त्याला या कामाचा मोबदला कमी मिळत असेल, तर त्याची प्रकृती ढासळली असता त्याला मिळणारे वेतनही कमी असावे, पण त्यात मानहानी नसावी. आपल्या देशाची चांगली सेवा केल्याबद्दल वरिष्ठ वर्गातील लोकांना वृद्धवेतन मिळाले पाहिजे हेही स्वाभाविक व सरळ आहे.' कलेचे अर्थशास्त्र या माझ्या पुस्तकातील हा उतारा उद्धृत केला आहे. या विषयाचे अधिक स्पष्टीकरण त्या पुस्तकात वाचकास आढळेल.

वरील उताऱ्यास पूरक असे एकच विधान मी येथे करतो की, ज्याप्रमाणे व्हेलेरिअस पब्लिकोला या रोमन राष्ट्रभक्ताची समाधी सार्वजनिक निधीतून बांधण्यात आली व तिच्यावर तसे लिहूनही ठेवण्यात आले, तरी त्यात कोणत्याही प्रकारे त्याचा आपमान झाला असे मानिले गेले नाही, त्याचप्रमाणे वरिष्ठ किंवा कनिष्ठ कोणत्याही दर्जाच्या मनुष्यास जिवंत असेपर्यंत अथवा मेल्यानंतर आपल्या सेवेचे वेतन समाजाकडून घेण्यात कमीपणा वाटण्याचे कारण नाही.

अशा प्रकारची माझी मतप्रणाली आहे आणि याच विचारांचे स्पष्टीकरण उदाहरणे देऊन त्यांच्या निरनिराळ्या स्वरूपांत शक्य तितक्या प्रमाणांत मी करणार आहे. यांतून उद्‌भूत होणाऱ्या आनुषंगिक विषयांचाही मी विचार करीन. माझ्या अंतिम निर्णयासंबंधी वाचकांना भीती वाटू नये याचसाठी हे निष्कर्ष येथे संक्षिप्त रूपाने मांडण्यात आले आहेत. तथापि माझे ह्या विषयावरील विचार वाचीत असता एक गोष्ट नेहमी लक्षात ठेवण्याची मी वाचकास विनंती करू






इच्छितो; ती म्हणजे मनुष्य स्वभावासारख्या अत्यंत सूक्ष्म तत्त्वांनी बनलेल्या विषयांशी ज्याचा संबंध येतो, अशा शास्त्रात जे सिद्धांत मांडलेले असतात, त्यांच्या अंतिम सत्यतेबद्दल जितका निर्वाळा देता येईल तितका या सिद्धांताच्या आधारे बनविलेल्या योजनांच्या प्रत्यक्ष यशस्वितेबद्दल देता येणार नाही. तसेच या योजनांपैकी अगदी उत्कृष्ट अशा योजनेसंबंधी हे ताबडतोब किती भाग अमलात आणता येईल, हा प्रश्न नेहमीचाच विवाद्य किंवा संशयास्पद असणार आणि अंती ती योजना कितपत साध्य होईल याची तर कोणास कल्पनाही करिता येणार नाही.



## तळागाळातील या अखेरच्या माणसापर्यंत (UNTO THIS LAST)

बायबलमध्ये एक गोष्ट आहे.

प्रातःकाली तो जमीनदार आपल्या मुनीमाला म्हणाला : 'जा, चौकात मजूर उभे असतील. त्यांना शेतावर कामाला पाठव. त्याला एक 'पेनी' (त्या काळातील नाणे) मजुरी दिली जाईल म्हणून सांग.' त्याप्रमाणे मुनीम चौकात गेला आणि त्याने जसजसे मजूर आले तसतसे त्यांना कामावर पाठवले. काही सहा वाजता तर काही नंतर उशिरापर्यंत देखील.

सायंकाळी जमीनदार मजुरी वाटपासाठी आला. मुनीमाने मजुरांना रांगेत उभे केले. जमीनदार प्रत्येकाला एक पेनी देत होता. आधी आलेले तक्रार करू लागले. 'उशिरा आलेल्याला आणि आम्हालाही तितकीच मजुरी कशी देता?'

जमीनदार म्हणाला, 'Brother, did I not promise you a penny? - and did you not get your penny. Take thy penny and go thy way. I will give unto this last as unto you.'

(भाऊ, तुला एक पेनी मिळेल असे मी सांगितले होते ना? आणि तुझी पेनी तुला मिळाली आहे ना? ती घे आणि आपल्या मार्गाला लाग. मी या शेवटी आलेल्या मजुरालाही तुला दिली तितकीच मजुरी देणार आहे.)

**'Unto this last' या शीर्षकाचे रस्किनचे पुस्तक एका रात्रीत वाचले आणि माझा जीवनक्रमच बदलून गेला असे गांधीजींनी लिहिले आहे. या शीर्षकाचा उगमही या वाक्यात आहे.**

**या रहस्याचा गुंता लोकशाही समाजवादी वृत्तीच्या लोकांनी सोडवावयास हवा. कृति-चिंतनाने.**

❖ ❖ ❖






# तळातून नियोजन

अण्णासाहेब सहस्रबुद्धे

**उद्देश**

भारतीय खेड्यांच्या विकासाचा प्रश्न हा राष्ट्रापुढे खडतर स्वरूपाचा आहे. आर्थिक विकासाकरिताचे नियोजन सध्या उच्च वर्गीयांकडून केले जाते. परंतु अपेक्षेप्रमाणे विकास प्रयत्नांमध्ये सामान्य जनतेला सामावून घेतले जात नाही. कदाचित दोन्ही बाजूंकडील कमतरता याला कारणीभूत असावी. पण तरीसुद्धा उच्च वर्गीयांकडून केल्या जाणाऱ्या या नियोजनामध्ये सामान्य जनतेला त्याबाबतची माहिती नसते हे नक्की, आणि त्यामुळे नियोजनाच्या अवस्थेमध्ये त्यांचा सहभाग नसतोच आणि कार्यवाहीच्या वेळेलाही त्यांचा सहभाग नसतो.

त्याकरिता लोकांनी लोकांकरिता आणि लोकांचे असलेले नियोजन तयार करण्यासाठी एखादी योग्य अशी पद्धती शोधणे जरूरीचे वाटते. खास करून दारिद्र्य-रेषेखालील स्तराला प्रोत्साहन वाटले पाहिजे आणि ते पुढे चालण्याच्या दृष्टीने त्यांना मदत केली पाहिजे. आकृतिबंध, उभे करून आर्थिक विकासाच्या योजना आखणे/तयार करणे पुरेसे नाही तर, सामाजिक, आर्थिक, सांस्कृतिक विकासातून मानवी साधन संपत्तीचा विकास हे आपल्या नियोजनाचे ध्येय असले पाहिजे. फिजिकल साधनसंपत्तीबरोबरच मानवी साधन संपत्तीचाही विकास झाला पाहिजे. आणि त्यास योग्य अशा संघटनात्मक स्ट्रक्चर्स आणि प्रशासकीय धोरणाने उचलून धरले पाहिजे (मदत केली पाहिजे). त्यामुळे वेगवेगळे विभाग स्वावलंबी युनिटस् म्हणून विकास पावतील. या विकासाकरिता कोणत्या पद्धती योग्य ठरतील? सामान्य जनता यामध्ये कशाप्रकारे भाग घेईल? कोणत्या प्रकारच्या आर्थिक व प्रशासकीय यंत्रणा आणि धोरणे उपयोगी पडतील? शास्त्र व तंत्रज्ञानाचे फायदे समाजाच्या निम्नस्तरावर कसे मिळू शकतील?

या सर्व प्रश्नांना उत्तरे शोधणे महत्त्वाचे आहे.

**१. कामाची पद्धती :**

१. या प्रकल्पाकरिता गावाचा एक समूह निवडावा.

२. प्रत्येक गावातील भूमिहीन व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांची त्यांच्या जमीनधारणेसह यादी करावी. पुढील विकासाच्या शक्यतेबाबतच्या विचारासाठी ही पहिली पायरी असेल.

३. प्रत्येक कुटुंबाला वर्षातून किती दिवस रोजगार उपलब्ध होतो आणि किती प्राप्ती होते ते शोधणे.

४. अल्प व अत्यल्प भूधारक आर्थिकदृष्ट्या सक्षम होण्याच्या दृष्टीने कशाची आवश्यकता आहे? त्यांचे स्वतःचे श्रम व प्रयत्न यामुळे त्यांची कोठपर्यंत प्रगती होऊ शकेल हे शोधणे. हे सर्व भूमिहीन व अत्यल्प भूधारक यांनी एकमेकांना आठवड्यातून १ दिवस मदत करण्याचे ठरविले तर सर्वांगीण विकासाच्या कितपत शक्यता आहेत, प्रत्येक खेड्यातील प्रत्येक भूमिहीन कुटुंबाचा या सर्व शक्यतांचा कसून शोध घेतला पाहिजे.

५. प्रत्येक गावातील कुशल कुटुंबाची यादी तयार करणे, त्यांचे शिक्षण, तंत्रज्ञान याचा सध्याचा स्तर आणि रोजगार उपलब्धीच्या दृष्टीने दिवस व उत्पन्न याची माहिती घेणे. त्यांची कुशलता कशाप्रकारे विकसित करता येईल याविषयी विचार करणे व त्यांना भरपूर प्रमाणात रोजगार उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने आराखडा तयार करणे.

६. दुसरीकडून कोठूनतरी आणून भांडवली साधनसामुग्री त्यांना उपलब्ध करून दिली तर प्रत्येक कुटुंबाच्या विकासाकरिता कोणती पावले उचलणे जरूरीचे आहे ते ठरविणे, कुठल्या प्रकारची जमीन सुधारणा करणे आवश्यक आहे. तांत्रिक माहिती आणि बाहेरून किती भांडवल आवश्यक आहे ते ठरविणे.

७. भूमिहीनांची सध्याची शैक्षणिक पातळी कोणती आहे? आणि त्यांच्याकडून कोणत्या पातळीपर्यंत त्यांच्या कौशल्याचा वापर करून घेण्यात येतो याची माहिती घेणे. त्यांचे उत्पन्न वाढविण्याच्या दृष्टीने कोणती

अनुक्रमणिका

पूरक कौशल्ये त्यांना द्यावी लागतील ते ठरवणे.

८. गावामध्ये काही श्रीमंत आणि मोठे जमीनदार असतात. अशा श्रीमंत शेतकऱ्याकडून या भूमिहीन कुटुंबांना कुठपर्यंत मदत केली जाते? अशा शेतकऱ्यांच्या जमिनीकरिता काय करता येऊ शकेल? या दृष्टीने आवश्यक असतील तो तांत्रिक सुधारणांचा कार्यक्रम ग्रामीण विकास आराखड्याच्या बरोबरीने घ्यावा.

९. वाहतूक आणि ग्राहकपेठ दोन्ही बाबी खडतर आहेत. सरप्लस कच्चा माल कोणता? व तो कधी उपलब्ध होतो? पद्धतशीर भाजीपाला उत्पादन घेतले तर, सरप्लस भाजीपाला उत्पादनाचा काळ असूनदेखील त्यावर कशी प्रक्रिया करता येऊ शकेल? रस्त्याची आवश्यकता व ग्राहकपेठेतील कल याबाबत विचार केला जावा. त्याचप्रमाणे बी-बियाणे, खते, पतपुरवठा इ. विकासाच्या दृष्टीने आवश्यक असलेल्या बाबी निम्न स्तरापर्यंत कशा पोहोचू शकतील याबाबत विचार व्हावा.

ही अभ्यासाची प्रथम अवस्था आणि हिला साधारणपणे ६ महिन्यांचा कालावधी लागेल.

२. सध्याच्या उत्पादक बाबीमध्ये योग्य रीतीने बदल करण्याच्या दृष्टीने नियोजन करणे ही द्वितीय अवस्था असेल. ज्या ठिकाणी शेतीचा विकास झाला आहे अशा ठिकाणच्या बदलांचा अभ्यास करणे. महाराष्ट्रातील व इतर विभागातील ज्या अल्प भूधारकांकडे एकच बैल आहे अगर त्यांच्या कुटुंबाच्या श्रमाशिवाय काही नाही अशांच्या योग्य उपयुक्ततेसाठी काय आवश्यक आहे त्याबाबतची माहिती घेणे. या गावामध्ये नवीन तंत्रज्ञान सुरू करणे व शिकविणे. नवीन तांत्रिक बदलाकरिता त्यांचे मन तयार करणे.

ही माहिती जमा करण्यासाठी साधारणपणे आणखी ६ महिने लागतील.

३. देशातील वेगवेगळ्या संशोधन संस्थांशी संपर्क स्थापित करणे ही तिसरी पायरी होय. अशा संस्थांनी पुष्कळशी उपयुक्त तंत्रे विकसित केली आहेत. या गावांमध्ये त्यांची (तंत्राची) योग्यायोग्यता तपासून पाहणे.

उदा. अ) जलशास्त्राची तत्त्वे, शेतीतील मृदसंधारण व विकासाकरिता पावसाच्या पाण्याच्या प्रत्येक थेंबाचा कसा उपयोग करावा.

ब) स्वस्त घरबांधणी योजना : रुरकी येथील सेंट्रल रोड रिसर्च इन्स्टिट्यूटने बांधकाम तंत्रातील अनेक उपक्रम विकसित केले आहेत. उदा. १. आग प्रतिबंधक घरे; २. काळ्या मातीपासून वीट निर्मिती; ३. पावसापासून प्रतिबंधक मातीचा गिलावा इ.

क) पर्यायी ऊर्जा स्रोत :

बऱ्याच ठिकाणी पर्यायी ऊर्जा स्रोत निर्माण करण्याबाबत प्रयत्न चालू आहेत. सूर्यचुली, सौर जल तापक, बायोगॅस संयंत्रे. पवनचक्क्या, जलविद्युत केंद्रे, समुद्र लाटांचा उपयोग इ. यातील काही उदाहरणे आहेत. अशा नवीन विकेंद्रित उगमस्थानांचा वापर कसा करता येऊ शकेल? अल्पभूधारकांना या तंत्राची माहिती देणे आणि अशा क्षेत्रात त्यांना रोजगाराची उपलब्धी कितपत होईलते पाहणे.

ड. प्रौढ शिक्षणावर लक्ष केंद्रित करून ग्रामीण जनतेला उत्तेजन देणे व एकत्रितरित्या काम करण्यास तयार करणे. यानंतर ग्रामविकासाच्या योजनांची कार्यवाही करणे हा ४ था टप्पा असेल.

इ. त्या मागातील भावी विकासाकरिता बाल शिक्षणाची योजना तयार करणे हा ५ वा टप्पा.

वरील सर्व बाबींचा विचार करता आसपासच्या खेड्यातील सुमारे १००० कुटुंबांच्या विकासाकरिता अशा प्रकारे तळातून विकासाच्या तंत्राचे नियोजनाकरिता मार्ग शोधणे. विविध उपायांचा शोध घेणे आणि देशातील इतर ठिकाणी चाललेल्या अशा उपायांच्या आधारे भारतीय खेड्यांसाठी चांगल्या पद्धती विकसित करणे.

या सर्व कार्यक्रमासाठी साधारणतः ३ वर्षाचा कालावधी लागेल. एक पर्यवेक्षक वजा संघटक व एक कृषितज्ज्ञ अशा किमान दोन पूर्णवेळ व्यक्ती यासाठी आवश्यक आहेत.

यासाठी एकूण रु. १,००,०००/- इतका खर्च येईल. या प्रोजेक्टची कार्यवाही करण्यासाठी अतिरिक्त रक्कम लागल्यास ती दुसरीकडून उपलब्ध करून घेण्यात येईल.



पुढील पृ० क्र० ७३ वरील 'समाजवादी विचारवंतांचा सर्वसंमत मसुदा' हा मजकूर 'साधना' ९ फेब्रुवारी १९९१ च्या अंकातून साभार घेतला आहे.

अनुक्रमणिका

## समाजवादी विचारवंतांचा सर्वसंमत मसुदा

१. स्वातंत्र्योत्तर काळात भारतामध्ये समाजवादी लोकशाही आणि धर्मातीत राज्य या नावाखाली जी राजकीय, आर्थिक व सामाजिक व्यवस्था चालू आहे ती अपयशी ठरली आहे. भारत समाजवादी समाजरचनेच्या वा धर्मातीत राज्याच्या जवळपासही आलेला नाही. लोकशाही राज्यपद्धती येथे टिकविण्यात आपण यशस्वी झालो आहेत. आणि तिच्यामुळे सर्वसामान्य जनतेत लोकशाहीची जाणीव आपण निर्माण करू शकलो आहेत, परंतु दुसऱ्या बाजूस सामाजिक आणि आर्थिक विषमता ही प्रत्यक्षात अधिक तीव्र झालेली आहे. भांडवलशाही मार्गानेच आजवर आपली वाटचाल झाली. या मार्गाने, आर्थिक क्षेत्रात विकास साधून स्वयंपूर्ण होणे, सर्वदूर पसरलेल्या दारिद्र्याचे आणि बेकारीचे निर्मूलन करणे, धार्मिक दुराग्रह कमी करीत अखेर नष्ट करणे, जातिव्यवस्थेमुळे होणारा जुलूम आणि ती जुलमी व्यवस्था नाहीशी करणे, स्त्री-पुरुष समानता प्रस्थापित करणे यांपैकी एकही गोष्ट साध्य होऊ शकणार नाही.

२. सच्च्या समाजवादाच्या दिशेने वेगाने वाटचाल केली तरच भारताची प्रगती होऊ शकेल. अशा समाजवादाच्या कल्पनेत, मूलभूत उत्पादनाची साधने सामाजिक मालकीची करणे, आर्थिक, राजकीय आणि सामाजिक व्यवस्थेचे विकेंद्रीकरण करणे, उत्पन्न आणि संपत्ती यांचे न्याय्य वाटप करणे आणि सामाजिक जुलूम नष्ट करणे, या सर्व गोष्टींचा अंतर्भाव होतो.

३. राजकीय परिभाषेत सांगावयाचे म्हणजे समाजवादामध्ये, मूलभूत नागरी स्वातंत्र्याची हमी देणे, न्यायव्यवस्था निःपक्षपाती व स्वतंत्र ठेवून कायद्याचे राज्य प्रस्थापित करणे, आजच्यापेक्षा राज्यकारभारात लोकांना किती तरी अधिक सहभाग देऊन त्यांना खऱ्या अर्थाने सत्ताधारी करणे, देशविघातक, फुटीर प्रवृत्ती नाहीशा करण्यासाठी खरीखुरी संघराज्यपद्धती अस्तित्वात आणणे आणि पंचायती राज्य निर्माण करणे या सर्व गोष्टी अभिप्रेत आहेत.

४. आर्थिक क्षेत्रात उत्पन्न आणि संपत्ती या दोन्ही बाबतीतील तीव्र विषमता नष्ट करणे हा समाजवादाचा आशय आहे. त्याचबरोबर पाणी, वनस्पती यांसारख्या नैसर्गिक साधनांची मालकी समाजाकडे देणे आणि जमिनीच्या मालकीहक्कात परिणामकारक सुधारणा घडवून आणणे या गोष्टी समाजवादी व्यवस्थेत केल्या जातील. लोकशाही समाजवादी पद्धतीने आर्थिक नियोजन करावे लागेल. जी व्यवस्था अस्तित्वात येईल तिच्यामध्ये सामाजिक मालकीच्या आणि वाटपाच्या संदर्भात प्रयोगशील दृष्टी ठेवली जाईल; आणि उत्पादकांना प्रभावी रीतीने काम करण्याची संधी देतानाच ग्राहकांना न्याय मिळेल, हे पाहिले जाईल. समुचित तंत्रविज्ञान पद्धतीचा काळजीपूर्वक वापर केला जाईल. या नियोजनात आर्थिक स्वायत्ततेचे उद्दिष्ट साध्य करण्याचा आणि वाढता प्रादेशिक असमतोल नाहीसा करण्याचा खंबीरपणे प्रयत्न करावा लागेल.

५. सर्वांसाठी प्राथमिक नागरी सोयींची - उदा. शिक्षण, आरोग्य, निवारा यांची उपलब्धता, त्याचबरोबर रोजगाराच्या मूलभूत हक्काचा समावेश ही समाजवादी व्यवस्थेची वैशिष्ट्ये असतील. आर्थिक नियोजनामध्ये या गोष्टींना प्राधान्य द्यावे लागेल.

६. आपल्या समाजातील पददलित आणि त्यामुळेच समाजपरिवर्तनाच्या समाजवादाला अभिमुख अशा समाजाला यासाठी संघटित करावे लागेल. छोटे शेतकरी, गरीब शेतमजूर, आदिवासी दलित आणि इतर मागास जाती, असंघटित कामगार, दलित महिला या घटकांचा समावेश यात होईल. संघटित कामगार वर्ग आणि मध्यमवर्ग यांमधील प्रागतिक नागरिक या आंदोलनाचे महत्त्वाचे पाईक ठरतील.

७. समाजवादी जीवनदृष्टीचा स्वीकार केलेले अनेक नागरिक आणि ती उद्दिष्टे डोळ्यासमोर ठेवून कार्य करीत असलेल्या संघटना, सामाजिक कार्य करू इच्छिणारे गट, यांच्याच बरोबर इतर राजकीय, सामाजिक आणि स्वयंसेवी संघटनांमधील इतर पुरोगामी घटक यांचाही समावेश या संघटित आंदोलनामध्ये व्हावा. त्यामध्ये मार्क्सवादी आणि गांधीवादी व्यक्तींचाही समावेश व्हावा.

८. यासाठी समविचारी कृतिशीलांनी वरचेवर एकत्र येऊन विचारांचे आदान-प्रदान करीत राहिले, तसेच प्रचार आणि संघटित लढे, आंदोलने, कृतियोजना यांमध्ये सहभागी होत राहिले आणि त्याचबरोबर संसदीय संस्थांच्या परिणामकारक उपयोगाबाबत जागरूक राहिले तर या गोष्टींचे वरील उद्दिष्टे साध्य करण्यास फार मोठे सहाय्य होईल.



चरित्र परिचय : जन्मशताब्दीनिमित्त

# शंकरराव मोरे - एका सजग मनाची वाटचाल

विश्वास नाईकनवरे

मी अलीकडे एक वेडेपणा केला. पूर्वी कधीही न केलेला. चक्क एक मराठी पुस्तक लिहून ते प्रकाशित करून मोकळा झालो! आता या वेडेपणाची फळं भोगतो आहे. अनेकांनी पाठ थोपटल्याच्या आनंदात असतानाच काही अनपेक्षित प्रतिक्रियाही आल्या. त्यामुळे लिहिलेल्या पुस्तकाचं समर्थन करत बसण्याची पाळी आली. त्याला काही उपाय नाही. मुळात आपण काय लिहितो, याबद्दल समरसेट मॉमनं जे म्हणून ठेवलं आहे, त्या वचनाची आता प्रकर्षानं आठवण होते. तो म्हणाला, ''We do not write what we want to, but we write what we can.''

शंकरराव (ज्यांना आम्ही सगळे दाजी म्हणत असू) गेले, त्याला चाळीस वर्षं झाली. एवढा मोठा विचारवंत होऊन गेला, आणि नुसताच विचारवंत नव्हे तर 'यः क्रियावान् स पंडितः' या कोटीचा विचारवंत होऊन गेला. पण आजच्या सुशिक्षित मध्यमवर्गाला दाद ना फिर्याद. जंगली महाराजाच्या चौकातला अर्धपुतळा कोणाचा आहे? असा प्रश्न केल्यास बहुतेक प्रत्येकजण 'कोण जाणे बुवा' असं सांगतो. लोकांची स्मरणशक्ती फार तोकडी असते याचं प्रत्यंतर येतं. म्हणून मी बरेच दिवस राबून हा ग्रंथ लिहिला. (तिरपी टोपी, ताठ मान - कै. शंकरराव मोरे यांचे विचारविश्व). त्याचा संशोधन करणाऱ्यांना किती उपयोग होणार आहे याची कल्पना नाही. आज मात्र विद्वानांची गैरसमजानं होणारी टीका झेलावी लागते आहे.

शंकरराव पुण्यात जन्मले. (१४ ऑगस्ट १८९९) तिघा भावांत वडील होते व शंकररावांना एक मोठी बहीण होती. झालं असं, की बहिणीचं लग्न होऊन ती सासरी गेल्यानंतर या भावंडांची आई निधन पावली. त्यानंतर वडीलही एका गोसाव्यांच्या तांड्यात सामील होऊन परागंदा झाले, ते पुन्हा परतलेच नाहीत. मग शंकरराव आणि दोन धाकटे भाऊ यांना विवाहित बहिणीनंच आश्रय दिला. दुर्दैवाचे असे दशावतार वाट्याला आल्यानं शंकररावांनाच पुढे होऊन परिस्थितीला तोंड द्यावं लागलं. जात्याच हुशार शंकररावांनी झटून अभ्यास केला व सतत वरच्या क्रमांकानं शिक्षण घेतलं. जीवनात आपण काय करायचं याचा निर्णय त्यांना स्वतःलाच घ्यावा लागला. दारिद्र्यामुळं जीवनाच्या खडतर मार्गाची ओळख अगदी बालवयापासून होत होती. मात्र बहिणीनं सतत मायेची पाखर धरल्यामुळं तसे ते खचले नाहीत. खडतर अनुभवातून हाती लागणारं शहाणपण सहजच ते शिकत गेले. गरिबी असली तरी स्वाभिमानानं, ताठ मानेनं जगण्याचं शिक्षण त्यांनी आत्मसात केलं.

बहिणीच्या घरी पुण्यातला एक प्रसिद्ध छापखाना होता. 'एक आणा माला' असं एक नियतकालिकही निघत असे. छोटे शंकरराव त्यामुळं वाचायला लागले. पुण्याच्या शुद्ध मराठी भाषेचे संस्कार बालपणापासूनच त्यांच्यावर होत गेल्यानं त्यांची वाणी शुद्ध बनली. म्हणूनच पुढे अनेक वर्षांनी मराठाचे संपादक व शंकररावांचे जानी दोस्त आचार्य अत्रे 'मोऱ्यांची मोरी तुंबली' असा कडक अग्रलेख लिहून लेखणी खाली ठेवता ठेवताच म्हणाले, 'शंकररावांची भाषा सदाशिव पेठेतल्या कोणत्याही ब्राह्मणापेक्षा शुद्ध असते.' पण ही फार पुढची गोष्ट झाली. बालपणीच पुण्यातल्या सनातनी ब्राह्मणांच्या कारवाया व जन्मजात उच्चतेचा ताठा यांचेही कडवट अनुभव त्यांच्या वाट्याला येत. हळूहळू शंकरराव इंग्रजी विषय घेऊन ऑनर्स मिळवून वकिलीचा अभ्यास करण्यासाठी मुंबईच्या लॉ कॉलेजमध्ये दाखल झाले. (अजून पुण्यात लॉ कॉलेज सुरू झालं नव्हतं.) तो अभ्यासक्रम पूर्ण करून त्यांनी लौकरच पुण्याला वकिलीचा व्यवसाय सुरू केला. त्या काळात पुण्याचे दोन विभाग पडलेले होते. खरे तर त्या विभागणीचे अवशेष आजही दिसतात. पुण्याचा पूर्व आणि पश्चिम विभाग. थोडक्यात ब्राह्मण-ब्राह्मणेतर असे हे दोन भाग. जगताप, विठ्ठल रामजी शिंदे यांचं कार्य पूर्व भागात होतं. महात्मा फुले यांची तीच कर्मभूमी होती. पुढे जेधे मॅन्शनमधून शाहूमहाराजांच्या पुढाकारानं ब्राह्मणेतर पक्ष पूर्व पुण्यात उभा राहिला.

अनुक्रमणिका

अशा एकंदर वातावरणात शंकरराव जर ब्राह्मणेतर पक्षात गेले नसते तरच ते एक नवल घडलं असतं. दिनकरराव जवळकरांनी 'देशाचे दुश्मन' नावाचं पुस्तक लिहून प्रचंड खळबळ उडवून दिली. ते दुश्मन म्हणजे टिळक आणि चिपळूणकर होते हे सुद्धा पुष्कळांना आज माहीत नसेल. अर्थात चिपळूणकरांच्या वारसांनी अब्रुनुकसानीचा खटला भरला व खालच्या कोर्टातल्या निकालामुळं लेखक, प्रकाशक म्हणून केशवराव जेधे, जवळकर आणि केशवराव बागडे या मंडळींना तुरुंगात डांबण्यात आलं. वरच्या कोर्टात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना आरोपींचा बचाव करण्यासाठी आणणे, त्यांना आपली बाजू, पुरावा वगैरे समजावून सांगणे ही कामगिरी वकील शंकरराव मोरे यांनी चोख पार पाडली. बाबासाहेबांबरोबर घनिष्ट मैत्री झाली. ती अखेरपर्यंत कायम राहिली.

शंकरराव स्वत: गरिबीतून धडपडून शिकून वकील झालेले असल्यानं गरीब लोकांना शिक्षण किती दुरापास्त असतं याची त्यांना चांगली कल्पना होती. तेव्हा गरिबी नाहीशी करणं, प्राथमिक शिक्षण मोफत आणि सक्तीचं करणं, खेड्यातल्या शेतीचा विकास होणं आणि परंपरागत धर्म-जातीच्या उतरंडवजा व्यवस्थेत होत असलेला अन्याय नष्ट करणं ही त्यांनी आपल्या जीवननिष्ठेची उद्दिष्टं निश्चित केली.

आपली जीवनाची उद्दिष्टं पूर्ण करण्याच्या हेतूनं त्यांनी वकिलीसारखा स्वतंत्र व्यवसाय तर निवडलाच पण तो व्यवसायदेखील अशा पद्धतीनं केला की कुटुंबाच्या पालनपोषणासाठी आवश्यक ती धनप्राप्ती कमीतकमी वेळात करून सामाजिक, सार्वजनिक कार्यासाठी भरपूर वेळ शिल्लक राहिला पाहिजे. शनिवार-रविवारी शंकरराव पुण्याजवळपासच्या खेडो-पाडी हिंडून तिथल्या जनतेच्या प्रश्नांची, अडचणींची बारकाईने माहिती मिळवून त्यांचं निराकरण करण्याच्या उद्योगात मग्न होत. एरव्ही दररोज पहाटे ४ वाजता उठून सकाळचा संपूर्ण वेळ अभ्यास, वाचन, मनन, संशोधन, लेखन वगैरे आवडीच्या कामात घालवत. त्यावेळी कोणीही त्यांना त्या ज्ञानयज्ञापासून दूर काढू शकत नसे. गप्पा गोष्टी आणि हास्यविनोदाची मैफल संध्याकाळच्या वेळी घराच्या जवळ बाल्कनीत चालू असे. इंग्रजी व मराठी भाषेतल्या हजारो ग्रंथांचे वाचन आणि स्वतःचं लेखन त्यांनी विपुल केलं. पण ते अभ्यासजड कधीच बनले नाहीत. स्वभाव विनोदप्रिय आणि भाषा सोपी व लालित्यपूर्ण असे. स्वाभिमानी आणि तापट स्वभावाचे असले तरी माणुसकीचा गहिवर भरपूर होता. मूर्खांचा उपहास करत पण गुणीजनांचा आदर करण्यात चुकले नाहीत. मात्र त्यांच्या तिखट जिभेचे प्रहार ज्यांना सोसावे लागले अशी मंडळी साहजिकच त्यांच्यावर टीका करत असत.

पुणे जिल्ह्यात प्राथमिक शिक्षणाचा व दुय्यम शिक्षणाचा प्रसार खेडोपाडी व्हावा यासाठी त्यांनी मित्रमंडळींना बरोबर घेऊन खूप प्रयत्न केले. त्या तपश्चर्येमुळेच त्यांची पुणे जिल्हा लोकलबोर्डाच्या अध्यक्षपदी निवड झाली होती. पुणे जिल्हा स्कूल बोर्डाचे सदस्य म्हणूनही त्यांनी अनेक वर्षं काम केलं. या काळात अत्यंत निःस्वार्थी व तत्पर लोकसेवक म्हणून त्यांची ख्याती होती. या त्यांच्या शिक्षणक्षेत्रातल्या कामगिरीचा कळसाध्याय म्हणजे त्यांनी अभ्यासपूर्वक लिहिलेला प्राथमिक शिक्षण हा १९३७ साली प्रसिद्ध झालेला ५०० पानी बहुमोल ग्रंथ होय. त्याची प्रस्तावना तेव्हाचे मुख्यमंत्री आणि शिक्षणमंत्री बाळासाहेब खेर यांनी लिहून त्या ग्रंथाची तोंड भरून स्तुती केली होती. आजही तो ग्रंथ मार्गदर्शक ठरेल. शिक्षणाइतकंच शंकररावांच्या आवडीचं क्षेत्र म्हणजे ग्रामीण पुनर्निर्माण आणि स्थानिक स्वराज्यसंस्था. एक शिक्षणतज्ज्ञ आणि स्थानिक स्वराज्याचा कार्यकर्ता ही पार्श्वभूमी घेऊन ते नंतर काँग्रेसमध्ये दाखल झाले.

राजकारण हे असं क्षेत्र आहे की जिथं संघटना बांधण्यासाठी, प्रचारकार्यासाठी, कार्यकर्ते पोसण्यासाठी वगैरे पाण्यासारखा पैसा खर्चावा लागतो. केवळ ज्वलंत देशभक्ती असून भागत नाही. म्हणूनच नैतिक मूल्यांचा उद्घोष प्रामाणिकपणानं करणाऱ्या महात्मा गांधींमधल्या बनियाला भांडवलदारांचं पाठबळ घ्यावं लागलं होतं. हा व्यवहाराचा आवश्यक भाग होता. पण हे शंकररावांना रुचत नसल्यानं बरोबरीचे सगळे सहकारी ब्राह्मणेतर पक्ष सोडून कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे व केशवराव जेधे यांच्या नेतृत्वाखाली काँग्रेसमध्ये १९३० नंतर गेलेले दिसत असूनही शंकरराव मात्र बराच काळ काँग्रेसमध्ये गेले नव्हते. अखेर केशवराव बागडे आणि शंकरराव मोरे ही जोडी १९३८ मध्ये काँग्रेसमध्ये गेली. महात्मा गांधींच्या






नेतृत्वाचा अर्थ महात्मा फुले यांचा सामाजिक समतेचा विचार काँग्रेसनं स्वीकारला व राजकीय स्वातंत्र्या-बरोबरच जातींचा विध्वंस होऊन सामाजिक समतेचं युग अवतरणार आहे, या भ्रमाचा पगडा शिंदे व जेधे मंडळींवर असावा. शंकररावांना तसं वाटत नसल्यामुळं त्यांचं मन काँग्रेसकडे वळत नव्हतं. शिवाय भांडवलदार वर्गाचं काँग्रेसवरचं वर्चस्वही काही झाकून पडलेलं नव्हतंच. अखेर एकाकी राहून काहीच करता येणार नाही याचा विचार करून तेही काँग्रेसमध्ये बळेबळे दाखल झाले.

दरम्यान जगभरच जी समाजवादाची लाट विसाव्या शतकाच्या दुसऱ्या दशकाच्या अखेरीला झालेल्या सोव्हिएट रशियातल्या राज्यक्रांतीनंतर सर्व पुरोगाम्यांच्या मनोभूमिकेवर येऊ लागली होती, ती शंकररावांच्यापर्यंत पोहोचली. रशियाच्या राजधानीत बसून भारतात साम्यवादाच्या विचारांचा प्रसार करणाऱ्या कॉ. मानवेंद्रनाथ रॉय यांची पुस्तकं शंकररावांनी झपाटल्यासारखी वाचून काढली. अखेर १९४१ साली कार्ल मार्क्सचा कॅपिटल हा ग्रंथही शंकररावांनी वाचून काढला. ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादानं पिळवणुकीचा साक्षात्कार होऊन आर्थिक समतेचाही पुरस्कार शंकरराव करू लागले. त्यांच्या लेखनात लघुकथांमध्ये वगैरे आता समाजवादी विचारांचीही चाहूल ऐकू येऊ लागली. परकीयांची राजवट नष्ट करून स्वराज्य प्रस्थापित व्हावे या उद्देशानं स्थापन झालेल्या राष्ट्रीय काँग्रेसचं स्वरूप सर्वसमावेशक ऊर्फ भोंगळ होतं. स्वराज्यप्राप्तीनंतर त्या सबगोलंकारी चळवळीचं रूपांतर राष्ट्रीय समाजवादी पक्षात व्हावं हा विचार शंकररावांनी १९४७-१९४८ मध्ये मांडला व महाराष्ट्र काँग्रेस पक्षानं केशवराव जेधे यांच्या प्रांताध्यक्षपदाच्या काळात तसा ठरावही केला. पण भांडवलदारांचं वर्चस्व असलेल्या काँग्रेसमधून सर्व डाव्या पक्षांचीच हकालपट्टी झाली. काँग्रेसबाहेर पडलेले कम्युनिस्ट आणि समाजवादी जसे आपापला पक्ष स्थापून स्वतंत्रपणे राजकारण करू लागले, तसाच मग केशवराव जेधे आणि शंकरराव मोरे यांच्या नेतृत्वाखाली महाराष्ट्रात शेतकरी कामगार पक्षाचा संसार १९४८ सालापासून सुरू झाला.

शेतकरी कामगार पक्षाची उभारणी मार्क्स-वादाच्या तत्त्वज्ञानाबरोबर राजकीय विचारांवर केलेली होती. मार्क्सवाद शंकररावांनी फार उत्तम अभ्यासानं समजून घेतलेला होता व त्याच्या सिद्धांताचा काटेकोर उपयोग करून एक शिस्तबद्ध राजकीय पक्ष उभारण्याचा प्रयत्न केला होता. पक्षाचा प्रचार धडाक्यात सुरू झाला व पक्षाला महाराष्ट्रातल्या बहुसंख्य जिल्ह्यांतल्या प्रमुख पुढाऱ्यांचा पाठिंबाही लाभला होता. पण तो काळ असा होता की अजून गांधी-नेहरूंचा जबरदस्त दबदबा जनमानसावर होता. त्यामुळे १९५२ साली झालेल्या भारताच्या सार्वत्रिक निवडणुकीत शे.का.पक्षाच्या बहुतेक प्रमुख मंडळींचा काँग्रेसकडून पराभव झाला. अपवाद फक्त शंकरराव मोरे यांचा होता. ते सोलापूर जिल्ह्यातून लोकसभेवर निवडून आले. केशवराव जेधे पुण्यात काकासाहेब गाडगीळ यांच्याकडून पराभूत झाले. तेव्हापासून पक्षाला गळती लागली व हळूहळू पक्षाचे बहुतेक पुढारी काँग्रेसमध्ये परत गेले. जेधे १९५४ मध्ये तर मोरे १९५६ अखेर काँग्रेसमध्ये परतले.

काँग्रेसतर्फे १९६२ च्या सार्वत्रिक निवडणुकीत शंकरराव पुण्याच्या लोकसभेच्या जागेवर निवडून आले. त्यावेळी त्यांनी ना. ग. गोरे व आचार्य अत्रे यांच्यासारख्या मातब्बर लोकांचा पराभव केला. पण तब्बेत खालावत गेल्यानं आणि कौटुंबिक आघातांनी दुःखी मनस्थितीत असतानाच १९६६ मध्ये प्रदीर्घ बेशुद्धावस्थेनंतर त्यांचा अंत झाला. पण त्यापूर्वी त्यांनी १९६० साली Practice and Procedure of Indian Parliament हा प्रचंड, अभ्यासपूर्ण ग्रंथ प्रसिद्ध केला. या ग्रंथाचं मुंबईत पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या हस्ते प्रकाशन झालं आणि या अत्यंत महत्त्वाच्या संदर्भग्रंथाला डॉ. राधाकृष्णन यांनी उत्तम प्रस्तावना लिहून त्यात शंकररावांच्या ग्रंथाचं लोकशाहीच्या अभ्यासाच्या दृष्टीने केवढं महत्त्व आहे याचं विश्लेषण केलं होतं. शंकररावांच्या आयुष्यभराच्या या विहंगावलोकनानं आणखी काही अभ्यासकांचं लक्ष 'तिरपी टोपी, ताठ मान' या माझ्या ग्रंथामध्ये सादर केलेल्या शंकररावांच्या विचारविश्वाकडे वेधलं जाईल अशी आशा करतो.

[तिरपी टोपी ताठ मान - शंकरराव मोरे यांचे विचारविश्व (लेखक : विश्वास नाईकनवरे, प्रकाशक - कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे)]

❖ ❖ ❖







अनुक्रमणिका

चरित्रग्रंथ परिचय

# डोंगरापल्याडचे डोंगर

सुलभा नाडकर्णी

नुकतेच ट्रेसी किड्डर ह्या लेखकाचे डॉ. पॉल फार्मर यांचे चरित्र वाचनात आले. त्याने अगदी भारावून गेले. इतकी की हे चरित्र प्रत्येकाने वाचावेच आणि जास्तीत जास्त लोकांना त्या पुस्तकाबद्दल माहिती पोचावी ह्या उत्कट इच्छेने हा लेख लिहिण्याची धडपड.

डॉ. पॉल फार्मर ह्या सद्‌गृहस्थांची बौद्धिक उंची, निश्चित केलेले उच्च ध्येय, ते साध्य करताना आणि करण्यासाठी त्यांनी घेतलेले परिश्रम, ह्यापेक्षाही वेगळे आहेत ते त्यांचे रोग्यांबद्दलचे विचार आणि भावना. हैतीमध्ये कष्टप्रद व प्रतिकूल वातावरणात व भौगोलिक परिस्थितीत डॉ. पॉल घेत असलेल्या परिश्रमांबद्दल वाचताना डॉ. अलबर्ट श्वाइटत्सर यांची आठवण येत होतीच. पण रोग्यांच्या भावनिक मानसिक अवस्थांबद्दलची त्यांची सहानुभूती व समज अलौकिकच - जे वाचताना वारंवार बाबा आमटे यांची आठवण येत होती.

हैती बेटावरच्या मध्यवर्ती पठारावर कांगे (Cange) खेड्यामध्ये Zanmi fasante आहे. Zanmi fasante ह्या क्रिओल शब्दाचा अर्थ 'आरोग्यातले सहकारी.' इंग्लिशमध्ये Partners-In-Health. पुढे ह्याच नावाची संस्था बोस्टन - केंब्रिज मध्ये डॉ. पॉलनी काढली.

डॉ. पॉल यांच्या डॉक्टर होण्यापूर्वीच्या पूर्वायुष्यावरून, त्यांच्या नंतरच्या आयुष्यात त्यांनी चोखाळलेल्या वाटेची संगती लागते. डॉ. पॉल यांचा जन्म १९५९ मध्ये नॉर्थ ॲडम्स या गावी झाला. सहा भावंडांमध्ये पॉलचा नंबर दुसरा. त्यांची आई शेतकऱ्याच्या कुटुंबातली होती. लग्नासाठी कॉलेज शिक्षण तिने लौकर सोडले. पॉलने आईची सडपातळ अंगलट व नाकाची ठेवण उचलली होती, तसेच भावनावेगामुळे चर्या लाल होण्याची सवयही. पॉलला लहानपणी पी.जे. (P.J. Pel) अथवा पेल असे संबोधत असत.

पॉल फार्मर सिनिअर धिप्पाड गृहस्थ होते. सहा फूट दोन इंच उंची व सव्वा दोनशे ते अडीचशे पौंड वजनाचा हा दांडगा गडी उत्तम व हिरीरीचा खेळाडू होता. पुढे त्यांना तरुण मुलींनी त्यांच्या कडक शिस्तीमुळे वॉर्डन असे नाव ठेवले. पॉलना विक्रेत्याची कायम नोकरी होती. पण चंचल व अस्थिर स्वभावामुळे त्यांनी मित्राच्या सांगण्यावरून दक्षिणेच्या आलाबामा राज्यात स्थलांतर केले. १९६६ मध्ये फार्मर कुटुंब दक्षिणेत बर्निंगहॅम इथे आले. स्वस्त सुटी साठी म्हणून त्यांनी एका जाहीर लिलावात एक बस खरेदी केली. जणू भविष्यकालाची सूचना असावी तशी ही बस कोणे एके काळी फिरता क्षयरोगाचा दवाखाना म्हणून वापरली गेली होती. आणि 'क्ष' किरणांच्या यंत्राच्या सोयीसाठी बसच्या छपरात वरती बुरुजासारखी सोय केली होती. बसच्या बँडचे नाव ब्लूबर्ड होते. म्हणून फार्मर कुटुंब आपल्या घराला 'ब्लूबर्ड इन' म्हणे.

एकदा नेहमीचे घर सोडून गोगलगाईला गुरू केल्यापासून फार्मर कुटुंब, वार्डनच्या हयातीत तरी लौकिक अर्थाने घरात असे राहिलेच नाही. ब्लूबर्ड इननंतर लेडी जिन् (बायको जिनी वरून) ह्या बोटीत वास्तव्य आणि लेडी जिन् चे आयुष्य संपल्यावर व तिला भूमातेवर अग्नी दिल्यानंतरही ते एका ट्रेलर होममध्ये राहत होती. फार्मर म्हणतात, मला कधीच माझा गाव नव्हता. मला फक्त माझे 'कॅम्प मैदान' होते. त्यामुळे मला कुठल्याही गावाशी जवळीक किंवा जिव्हाळा वाटत नसे. सरते शेवटी, अनेक ठिकाणी वास्तव्य झाल्यानंतर, खऱ्या अर्थाने गावी जाण्याची ओढ लागली, तेव्हा लक्षात आलं की ते गाव तर 'कांगे' होते! म्हणजे, हैती देशातील डॉ. पॉल यांची कर्मभूमी.

फार्मर भावंडे शाळेत (प्रत्येक भाग घेण्यासारख्या बहिःशालेय) उपक्रमांत (खेळ, कला, इत्यादी) आवर्जून भाग घेत असत. (त्यामागे नौकाघरातील कटकटीची कामे चुकवणे हा उद्देश अगदीच नव्हता असे म्हणता येणार नाही.)

डॉ. पॉल यांच्या आईशी बोलताना किड्डर म्हणाले, "म्हणजे एकूण तुमच्या घरात घरकोंबडे नव्हतेच तर." त्यावर डॉ. पॉलच्या आई उत्तरल्या, "खुराडेच नव्हते ना." ('No couch potatoes in your family' I said. 'No couch,' she said)






लिलावात खरिदलेल्या वार्डन यांच्या खटारा मोटारीतून शाळेत जाण्याची या भावंडांना लाज वाटे. एकदा मुलांनी विनंती केली, की त्यांना शाळेपासून थोड्या दूर अंतरावर सोडावे. ह्यावर वार्डनने शाळेच्या खास बसच्या गल्लीतून आपला खटारा घुसवून, शाळेच्या दारात भोंगा वाजवत आपली खटारा मोटार 'चांगला धडा मिळेल आता' असे म्हणत उभी केली. एकूण वडिलांच्या अशा संगोपनामुळे, खाण्यापिण्याच्या बाबत लवचिकता, आणि वर्षानुवर्षे अडचणीच्या जागेत, गैरसोयींबरोबर राहण्याची सवय यामुळे या भावंडांना कुठल्याही ठिकाणी एकाग्रतेने काम करण्याचे बाळकडूच मिळाले. स्पाफ कार (घरच्या खटारामोटारीचे नाव) मुळे पुढील आयुष्यात कुणापुढेही शरमून जाणे अथवा अवघडलेपण वाटणे हा प्रश्नच उरला नाही.

सर्वच फार्मर मुलांना वडिलांच्या प्रशस्तीची आस होती. मात्र ही प्रशस्ती मिळणे मुळीच सुलभ नसे. सर्व मुलांनी जरी 'ए' ग्रेडचे निकाल आणले तर ए+ कुणी नाही वाटतं! हा शेरा ऐकायला मिळे.

आर्थिक जरूरी नसताना वा कृष्णवर्णीय नसतानाही, वार्डन आपल्या मुलांना फळे तोडणीच्या हंगामात शेतावर घेऊन जात, अनुभवासाठी. तिथे हैती देशीय निग्रोंची माहिती झाली. पुढे पॉल शिकत असलेल्या ड्यूक युनिव्हर्सिटी शेजारच्या कॅंपातल्या हंगामी मजुरांशी संबंध आला. पॉलची ज्युलिआना डी वुल्फ या बेल्जिअम संन्यासिनीशी ओळख झाली. 'फ्रेंडस् ऑफ द युनायटेड फार्म वर्कर्स' ह्या संस्थेत ती काम करी. सिस्टर ज्युलिअनच्या बरोबर तो नॉर्थ कॅरोलिनाच्या तंबाखूच्या शेतावर काम करणाऱ्या अनेक हैती मजुरांना भेटला. हैतीबद्दल जी काही माहिती मिळेल ती त्याने वाचून काढली. हैतीदेशीय लोक स्वतःच्या देशात आणि परदेशात गुलामांचे गुलाम (underdogs of the underdogs) आहेत. असे त्याचे मत बनले. परिणामी ग्रॅज्युएट होईपर्यंत त्याने ड्यूक जवळच्या शेतांवर राबणाऱ्या हैती मजुरांबद्दल एक ६००० शब्दांचा लेख लिहिला.

कोलंबसानी हिस्पॅनिओला असे बारसे केलेल्या बेटांच्या इतिहासात फार्मरला खूपच स्वारस्य निर्माण झाले. फ्रान्स व स्पेनच्या बेटांच्या वाटणीत, फ्रान्सकडे पश्चिमेकडील १/३ भाग आला. आणि फ्रान्सने तिथे अतिशय लाभदायक परंतु भयानक अशी गुलामांची वसाहत निर्माण केली. शेवटी रक्तरंजित क्रांती होऊन लॅटिन अमेरिकेचे पहिले स्वतंत्र राष्ट्र आणि जगातले पहिले कृष्णवर्णीय प्रजासत्ताक १८०४ मध्ये अस्तित्वात आले. पण पुढील २०० वर्षे अराजक माजले व फ्रान्स व अमेरिकेच्या हस्तक्षेपामुळे परिस्थिती चिघळतच राहिली.

परंतु ह्या सगळ्यात उठून दिसली ती हैती लोकांची संस्कृती. हैती लोकांचे संगीत, वाङ्मय, चित्रकला इतकेच नव्हे तर त्यांचा स्वतःचा अतिशय गुंतागुंतीचा धर्मही त्यांनी निर्माण केला. अनेक देवता, अगदी कॅथलिक संतांच्या समवेत जादूटोण्याचा व्हूडू धर्म, त्याच्या वेगळेपणामुळे पॉलना अभ्यसनीय वाटला. हैती लोकांची क्रिओल भाषा, ही फ्रेंच आणि काही आफ्रिकन व्याकरण व उच्चारण संमिश्र अशी आहे.

हैती चित्रकारांवर लिहिलेल्या निबंधाला डॉ. पॉलना एक हजार डॉलर्सचे बक्षिस मिळाले आणि त्या पैशांनी हैतीची सफर करण्याचे त्यांनी ठरविले. १९८३ मध्ये डॉ. पॉल ऑ-प्रिन्सला गेले. तेव्हा तिथे बेबी डॉक् (फ्रंसॉई डुव्हालिएचा मुलगा) बापाइतकेच जुलमी व निर्दय राज्य करीत होता. कॉलेजमधल्या ओळखीने तो हैतीमधल्या डॉ. श्वाईट्ट्सर हॉस्पिटलमध्ये गेला. तिथे त्याला नोकरी नव्हती. पण हॉस्पिटलही त्याच्या अपेक्षेप्रमाणे नव्हतेच. त्याने हैतीमध्ये इतर ठिकाणी चौकशी केली. त्यावेळी तो सेंट्रल प्लॅटोवर असलेल्या मिरेबलाई (Mirebalais) ला डोळ्यांचा दवाखाना पहायला गेला.

तिथे गेला आणि हैतीमधल्या व्हूडूच्या जादूमध्ये कायमचा अडकला.

ह्यानंतरचे डॉ. पॉलचे आयुष्य म्हणजे हैतीतल्या नागरिकांचे प्रकृतिस्वास्थ्यासाठी (विशेषतः क्षयरोग व एडस्) सर्वतोपरी झटणे हेच उरले.

हे पुस्तक वाचत असताना मला जो प्रकर्षाने जाणवला तो डॉ. पॉल यांचा रुग्णांबद्दलचा उमाळा. मग तो रुग्ण कोणताही असू दे - मॅसॅच्युसेट्स जनरल हॉस्पिटल मधला गोऱ्या कातडीचा अमेरिकन असू दे अथवा हैतीमधला अत्यंत दरिद्री, अशिक्षित, कृष्णवर्णीय असूदे.

लिओगाने (Leogane) मध्ये सुरू होणाऱ्या रक्तपेढीमध्ये गरिबांनाही पैसे दिल्याशिवाय रक्त








अनुक्रमणिका

मिळणार नाही हे ऐकून त्याचे मन बिथरले. आणि त्यांनी मनात निश्चय केला की मी कांगे मध्ये हॉस्पिटल बांधीन आणि तिथे असे काही असणार नाही.

हैती बेटावरच्या मध्यवर्ती पठारावर तसे काही दवाखाने जरूर आहेत. परंतु त्यामध्ये दवाखान्याला आवश्यक असणाऱ्या सर्व सुविधांचा आणि आरोग्य रक्षणासाठी घ्याव्या लागणाऱ्या काळजीचा पूर्ण अभाव होता. शिवाय सगळीकडे पैसे भरावे लागत. अगदी रोग्याला तपासण्यासाठी वापराव्या लागणाऱ्या रबरी हातमोज्यांपर्यंत! आणि मध्यवर्ती पठारावर राहणाऱ्या फारच थोड्या लोकांची एवढी ऐपत असे.

हैती बेटावरच्या मध्यवर्ती पठारावर कांगे खेड्यामध्ये Zanmi lasante आहे. कांगे म्हणजे पश्चिम गोलार्धातल्या दरिद्र्यांतीलही दरिद्री देशातले उजाडातल्या उजाड माळावरचे खेडे.

डॉ. पॉलच्या Zanmi lasante मध्येही रोग्यांना पैसे भरावे लागत. पॉलचा तसा आग्रहच होता. रोग्यांना ८० अमेरिकन सेंटस् द्यावे लागत. फक्त काही रोग्यांना हे न भरण्याची सवलत असे. बायका, मुले, कंगाल व अत्यंत आजारी एवढ्या लोकांना पैसे द्यावे लागत नसत! गरीब रुग्णांना अधिक सवलतीची, प्राधान्याची रुग्णसेवा मिळणे, हाच मुक्तीच्या धर्मशास्त्राचा (liberation theology) गाभा, व आयुष्याचे परमध्येय असले पाहिजे, असे डॉ. पॉलना वाटते.

हावर्ड मेडिकल स्कूलमध्ये प्रवेश मिळाल्या-नंतरच्या सुट्टीत पॉल फ्रान्सला गेला. तिथे त्याने मदतनिसाची नोकरी करत काही लहान लहान कोर्सेस केले. तिथल्या अनेक प्रोफेसरांबद्दल त्याला आदर होता व तोही त्यांचा आवडता विद्यार्थी होता. पण यापैकी कुणालाही त्यांनी गुरू मानले नाही.

तो मान मिळाला एका जर्मन पॉलिमॅथला. (सखोल आणि अनेक विद्याविषय जाणणारा) विरचॉव्ह (Virchaw) या शास्त्रज्ञाला. बिस्मार्कच्या राजवटीत हा एक महामानवच होता. वैद्यकीय मानसशास्त्रापासून ते राजकारणी विरोधकांपर्यंत व सार्वजनिक अथवा सामाजिक आरोग्यशास्त्रापर्यंत त्याच्या बुद्धीचा संचार चाले. अप्पर सिलोशियातल्या सांसर्गिक साथीवरील त्याने सुचविलेला उपाय इतका क्रांतिकारी होता की (सिलोशियाला स्वातंत्र्य देऊन टाकावे.) विरचॉव्हची सरकारातून हकालपट्टी झाली. ह्यावर त्या शास्त्रज्ञाचा शेरा 'माझे राजकारण' प्रतिबंधाचे होते तर त्यांचे (म्ह. राज्यकर्त्यांचे) उपशमनाचे होते.'

विरचॉवने अनेक सूत्रे प्रचलित केली. डॉ. फार्मरचे आवडते सूत्र होते, 'वैद्य (डॉक्टर्स) हेच खरे गरिबांचे कैवारी असतात. त्यामुळे सामाजिक समस्या त्यांच्याकडून सोडवल्या जाणेच उचित आहे.' (The physicians are the natural attornys of the pors, and the social problems should largely be solved by them.)

डॉ. फार्मरच्या मते रोगशास्त्र, सामाजिक आरोग्यशास्त्र, राजकारण व मानवशास्त्र ह्या सर्वांचा मेळ घालण्याची दूरदृष्टी विरचॉवना होती व डॉ. फार्मरनी हाच कित्ता समोर ठेवला. इथे हैतीमध्ये डॉ. फार्मर यांची लेखक Dalf यांच्या मुलीशी - ऑफिलिआशी - गाठ पडली. त्याचे पुढे रूपांतर गाढ मैत्री व नंतर प्रेमात झाले. परंतु डॉ. फार्मरांच्या लग्नाच्या मागणीला ऑफेलिआने नकार दिला. नकारानंतरही त्यांची मैत्री , पत्रव्यवहार व हैतीमधले समाजकार्य चालूच राहिले.

१९८३ मध्ये पेरे लाफान्ताँ (Pe're lafontant) यांना कांगेमध्ये बेकरी बांधायची होती. त्यासाठी पैसे जमविताना डॉ. फार्मरना बोस्टनमधला एक निनावी देणगीदार भेटला. डॉ. फार्मर यांचा (The Anthrapologist within) 'अंतरंगातील मानव' हा लेख प्रकाशित झाला होता. तो वाचून एका अज्ञात देणगीदाराने प्रोजेक्ट ब्रेडच्या संचालकांना पत्र लिहून डॉ. फार्मरना भेटण्याची इच्छा व्यक्त केली. डॉ. फार्मरचे उत्तर, 'त्याला मला भेटायचे असेल तर, त्याला सांगा, मला हैतीमध्ये येऊन भेटावे.' असे होते. देणगीदाराचे नाव टॉम व्हाइट होते; त्याची अवजड बांधकाम करणारी कंपनी होती. टॉम व्हाईटने येताना नोटांची बंडले आणली होती. खैरातीत लवकरच ती संपली. हे जरी फार्मरच्या विचारात बसत असले तरी, व्हाईट महाशयांबद्दल अनुकूल मत बनविण्यास पुरेसे नव्हते. आणि हे लपविण्याची जरूरीही डॉ. फार्मरना वाटली नाही.

डॉ. फार्मरचे वागणे खरे तर फारच उर्मटपणाचे होते. पण व्हाईट म्हणाले, 'मला तो आवडला. शिवाय गरिबांना मदत करण्याबाबत तो माझ्याही पुढे होता.' ट्रेसीने (लेखकाने) विचारले, 'तुला विशीतल्या वैद्यकीय

विद्यार्थ्याबद्दल एवढा भरवसा कसा वाटला?' तेव्हा टॉम त्यांना म्हणाला, 'मला तो लगेचच आवडला. इतका बुद्धिमान, स्वत: निवडलेल्या कामाशी इतका समर्पित वृत्तीचा. मला वाटतं, मला सेवानिवृत्तीचा सहकारी हवा असावा.'

स्वतःला डॉ. फार्मरच्या जेवण्याखाण्याबद्दल जबाबदार धारण्यापासून ते कांगेसाठी डॉ. फार्मरला हवी असणारी कामे करण्यापर्यंत अगदी स्वतःच्या मर्सिडीजमध्ये कांगेच्या हॉस्पिटल्ससाठी लागणाऱ्या सिंक्स् भरून नेण्यापर्यंत टॉम डॉ. फार्मरना मदत करी. एकदा 'हे सर्व सोडून फार्मरबरोबर मिशनरी व्हावेसे वाटते' असे टॉमने म्हटले तेव्हा फार्मरने थोडा विचार केला व नंतर म्हणाला, 'मला वाटतं तो तुझ्या बाबतीत मोठाच गुन्हा होईल.' (In your particular case, that would be sin.)

डॉ. फार्मरने २००० सालापर्यंत लिहिलेल्या सर्व लेखांतून, पुस्तकांतून केलेल्या सर्व भाषणांतून फार्मर परत परत धरणाच्या विरोधात बोलत राहिला. एक लेखक व अभ्यासक म्हणून फार्मरने जगातील श्रीमंत व दरिद्री देशांच्या परस्पर संबंधाबद्दल अतिशय परिश्रमपूर्वक अभ्यास केला होता व हैतीतले हे धरण त्याच्या अभ्यासाचे आवडते उदाहरण होते.

हैतीमधली सर्वात मोठी नदी आर्टिबोनाइटला (Artibonite) हे धरण बांधले आहे. धरणाला पेलिग्रे (Peligre) व त्यामागील जलाशयाला पेलिग्रेसागर नाव आहे. हे धरण अमेरिकन पित्तूंच्या कारकीर्दीत बांधले गेले. १९५० च्या दशकात अमेरिकन आयात-निर्यात बँकेने वित्तपुरवठा केला व बांधकाम केले 'ब्राऊन अँड रूट' ह्या टेक्सन कंपनीने. अमेरिकन लष्करी इंजीनीअर्सनी नकाशा तयार केला. विकास बांधकाम अशी ह्या प्रकल्पाची जाहीरात केली गेली. परंतु नदीच्या वरच्या अंगाला राहणाऱ्या लोकांचा फारसा कुणी विचार केलेला दिसत नाही. ह्या प्रकल्पामुळे सिंचन व वीजनिर्मितीत सुधारणा होणार होती असे मुळीच नव्हते, की केंद्रीय पठारावरच्या गरीब जनतेला ह्या दोन गोष्टींची गरज नव्हती. परंतु ना त्यांना पाणी मिळाले ना वीज. अनेकांना तर नुकसान भरपाई पण मिळाली नाही. खरे तर धरण, खालच्या अंगाला असलेल्या, तेव्हा अमेरिकन मालकीच्या शेती व्यवसायांना, (शेतीला नव्हे) आणि पोर्ट-ऑ-प्रिन्सला वीज पुरवठा करण्यासाठी होते. खास करून, अत्यल्प उच्चवर्णीय हैतिअन श्रीमंत, आणि परकीय मालकीच्या असेंब्ली कारखाने यांच्या सोयीसाठी.

फार्मरच्या शब्दात ही जलनिर्वासितांची मुलेमुली गरजेपोटी पोर्ट-ऑ-प्रिन्सला घरकाम इत्यादी मजुरीची कामे करण्यासाठी जाऊ लागली व थोड्याच वर्षात टी.बी. किंवा एडस्, कधी कधी दोन्ही घेऊन घरी पठारावर परतू लागली. हैतीमधल्या नागरिकांच्या स्वजातीय, स्वार्थी, भ्रष्टाचारी, जुलमी राजवटीइतकाच तिटकारा व चीड डॉ. फार्मरना अमेरिकेच्या स्वार्थी आणि तात्पुरत्या लाभाच्या लोभामुळे इतर अविकसित देशाच्या भवितव्यात ढवळाढवळ करणाऱ्या निंद्य सवयींबद्दल वाटते.

वयाच्या चोविसाव्या वर्षी फार्मरनी हार्वर्ड मेडिकल स्कूलमध्ये प्रवेश घेतला. हार्वर्डमध्ये कुठलीही धार्मिक श्रद्धा अगदी तुच्छ मानली जात असे. परंतु गरिबाच्या आयुष्यात श्रद्धेचे स्थान फार महत्त्वाचे असते. फक्त हैतीमधल्याच नाही तर जगामधल्या सर्वच गरिबांच्या जीवनात धार्मिक श्रद्धा महत्त्वाची आहे असे दिसते. त्याअर्थी श्रद्धा ही एक चांगली शक्ती असली पाहिजे अशी माझी अधिक ठाम धारणा झाली, असे फार्मर म्हणतो. हार्वर्ड मेडिकल स्कूलमध्ये दाखल होण्याआधीच फार्मरने मानववंशशास्त्र, सार्वजनिक आरोग्य आणि वैद्यकशास्त्र ह्या विषयात काम केल्याचा त्याला फारच फायदा झाला. खरं तर फार्मर उत्तम विद्यार्थी होता. पण हैतीच्या ओढीने त्याची पुस्तकी ज्ञानाची आवड मर्यादितच राहिली.

हैतीमधल्या पददलितांचे आरोग्य सुधारणे, खास करून टी.बी. आवाक्यात आणणे हा ध्येयमार्ग सापडल्यावर इतर सर्व गोष्टी फार्मरच्या मते दुय्यमच झाल्या परंतु जरी तो डिग्री घ्यायच्या आधीपासून स्वच्छता व आरोग्याचे धडे देणे, ह्या प्राथमिक आरोग्य सेवकाचे काम करत होता, तरी आता आपल्या ध्येयपूर्तीसाठी त्याला डॉक्टर होणे आवश्यकच होते. कॉलेजात दाखल झाल्यानंतर वर्गात कायम गैरहजर राहून फक्त परीक्षेच्या वेळी हजेरी लावणाऱ्या ह्या विद्यार्थ्याला, त्याला मिळत असणाऱ्या उत्तम मार्कांमुळे व तो करत असलेल्या कामाला प्रच्छन्न उत्तेजन म्हणून विद्यालयीन नियम सुद्धा वेगळ्या वाटा शोधू लागत.

White Liberals (WL) खरं तर त्याच्याच पक्षाचे; ह्यात संपन्न कृष्णवर्णीयांचा पण समावेश होतो. पण त्यांच्याशीही फार्मरचे जुळेच असे नाही. तो म्हणे WL व्हाईट लिबरल्स माझ्या बाजूचे आहेत आणि मी त्यांच्यावर प्रेम करतो. पण त्यांना वाटते जगाचे सर्व प्रश्न त्यांना स्वतःला कसलीही किंमत न देता सुटण्यासारखे आहेत. पण आमचे मत तसे नाही. स्वार्थत्याग, सद्सद्विवेकबुद्धी, करुणा ह्या सगळ्या भावनांची गरज आहे. नाहीतर झुरळ व आपण ह्यांच्यात काय फरक?

डॉ. पॉल फार्मर यांचा उजवा हात, म्हणजे त्यांचा हार्वर्ड मेडिकल स्कूलमधला कोरिअन सहाध्यायी जिम किम. त्याचे म्हणणे डॉ. फार्मरला जर आदर्श मानले तर बाकी सर्व आपण निरुपयोगीच होऊ.

पार्टनर्स-इन-हेल्थच्या कार्यकर्त्यांना व पगारी काम करणाऱ्यांनाही असे वाटे की आपणसुद्धा फार्मरसारखेच वागले पाहिजे. पण किमे म्हणतो असे वागणे म्हणजे चुकीच्या गोष्टीला महत्त्व देणे आहे. इतरांची आयुष्ये सुधारण्यावर भर असला पाहिजे. आत्मोन्नतीवर नाही.

फार्मर म्हणे, 'मी असे सांगत नाही की तुम्ही मी करतोय तसे करा. पण ह्या गोष्टी केल्या पाहिजेत एवढंच माझं सांगणं आहे.'

संस्थेला मिळणाऱ्या पैशांपैकी फक्त ५% देणग्या संस्थेच्या कामकाजासाठी वापरण्यात येत होत्या. बाकीचे पैसे रुग्णांसाठी वापरले जात. PIH मधली काटकसर, अनेक मदतीचे हात येत असूनही चालूच होती.

बिल गेट्स कडून ग्रँट मिळाल्यानंतर संस्थेतील काही लोकांची overtime मिळण्याची अपेक्षा असल्याचे डॉ. फार्मरच्या निदर्शनास आले.

डॉ. फार्मरने संस्थेला एक जाहीर पत्र लिहिले. त्यात त्याने संस्था आपल्या नैतिक रस्त्यापासून ढळण्याची भीती व्यक्त केली. त्याने लिहिले, 'गरिबांसाठी कोणीही कधी overtime काम करत नाही. आपण फक्त आपल्या उणिवा दूर करण्यासाठी धडपडत असतो.' (one can never work overtime for the poor. we are only scrambling to make up for our deficienes.)

डॉ. पॉल फार्मर हा जगातला सर्वश्रेष्ठ क्षयरोगतज्ज्ञ आहे. त्याची क्षयरोग व क्षयरोग संसर्गाला मर्यादेत ठेवण्याची उपचारपद्धती व एम.डी.आर. क्षयरोग (multo-drug-resistant) मर्यादेत ठेवण्याची उपचार पद्धती जगन्मान्य झाली आहे.

पेरू देशातल्या क्षयरोग्यांसाठी जिमकिम् च्या आग्रहावरून उपचारपद्धती आखून दिली. रशियातल्या तुरुंगात क्षयरोग व एम.डी.आर. आटोक्यात आणण्या-साठी अगदी सैबेरियापर्यंत फार्मर जाऊन उपचारपद्धती शिकवून आले.

लेखक ट्रेसी किड्डर जेव्हा प्रथम बॉस्टनला डॉ. फार्मर यांची संस्था पहायला गेले तेव्हा PIH हेडक्वार्टर्समध्ये २० लोक तिथे काम करत, आता (२००३-२००४ मध्ये) ५० आहेत. रॉक्सबरीमध्ये १०, हैतीमध्ये ४००, पेरूमध्ये १२० आणि रशियात १५.

त्याने जिथे इंटर्नशिप केली होती त्या सुसज्ज, प्रशिक्षित उत्तम सेवकवर्ग सुविधा असलेल्या रुग्णालयात लक्षवेधी अवस्थेतील खूप रुग्ण पहायला मिळत व म्हणून फार्मरला तिथे काम करताना समाधान वाटे. पण कधी कधी त्याला हे सोडून द्यावे व कांगेतल्या संपूर्ण अपूर्णतेने वेढलेल्या रोग्यांसाठी झटावे असे वाटे.

किड्डर एकदा फार्मरला म्हणाला, 'तू फार मोठा माणूस आहेस. तुझ्यावर जर ही रोग्यांची जबाबदारी (clinical Practice) नसती ना तर...' 'तर मी कोणीच नसतो.' फार्मरने वाक्य पुरे केले. फार्मरची दूरान्वयाची मध्यस्थीची (distant intervention) पद्धत : आधी कुटुंबातला प्रकट व निद्रिस्त अवस्थेतला क्षयरोग (extra pulmonary) बरा करणे. मग हळूहळू ह्या सर्वांचे मूळ, त्यांची परिस्थिती, क्षयरोगाला खास आमंत्रण देणारी परिस्थिती बदलणे, अशा स्वरूपाची होती. फार्मर म्हणतो, 'काही आयुष्यांची किंमत दुसऱ्या इतर आयुष्यांपेक्षा कमी लेखणे हे जगातल्या चुकांचे कारण आहे.'

जिम् किम् च्या मते Zanmi fasante ला कोणत्यातरी संस्थेचा भक्कम आधार मिळाल्याखेरीज Zanmi fasante चालू राहणे कठीण होते. आणि तसा आधार मिळण्यासाठी Zanmi fasnte ह्या प्रकल्पाची प्रतिकृतियोग्यता (replicability) व चालू राहण्याची स्वाभाविक शक्ती, (sustainability) पटविल्याखेरीज

मोठा आधार मिळणे शक्य नव्हते.

ह्या चर्चेने थकून एकदा फार्मर म्हणाला, 'गरिबांची नम्रतेने सेवा करणे पुरेसे नाही का?' आमच्या तुटपुंज्या कार्याचा उदाहरण म्हणून बोलबाला करणे म्हणजे इतर त्यांच्या कर्तव्यात कमी पडताहेत असे सुचविणे होय. मला तसे करावयाचे नाही.'

किड्डर म्हणतो फार्मर म्हणजे जणू एक होकायंत्र आहे. त्याचा एक पाय पृथ्वीतलावर फिरत असतो तर दुसरा हैतीमध्ये रुजून राहिला आहे. एकदा शिणून थकून बॉस्टनला परतल्यावर तो ऑफिलिआला म्हणाला, 'मला एका कानाने मित्र, हितचिंतकांचा सल्ला ऐकू येतो : तू अधिक व्यापक दृष्टीने जगाच्या आरोग्य रक्षणावर लक्ष केंद्रित केले पाहिजे. तर दुसऱ्या कानाला ऐकू येते ती हैतीमधल्या एका कृष्णवर्णीय, दरिद्री आईची आर्त विनवणी - 'माझ्या मुलाला कोणी वाचवेल का हो?'

दुर्गम प्रदेशात जाऊन कुणाच्याही साक्षीशिवाय वैद्यकी करणे फार्मरला आवश्यक वाटते. असे केल्याने आपण सर्वप्रथम वैद्यकी करतो असे तो मानतो.

डॉ. पॉल फार्मर हा प्रथम वैद्य आणि नंतर मानववंशतज्ज्ञ आणि आरोग्यतज्ज्ञ आहे असे मानतो आणि त्याच्या मते असेच वागणे योग्य आहे.

डोंगरापल्याडचे डोंगर वाचल्यानंतर आपलेही जगातल्या समस्यांच्या एकूण आकलनाचे उन्नयन होते.

डॉ. फार्मर कुठल्याही धार्मिक, राजकीय प्रणालीने प्रेरित होऊन कार्य करीत नाही. एक दीनांचा कैवारी मनाचा कनवाळू असा हा माणूस. हा तर आज वावरणारा संत पॉल! (Saint Paul.)

[Tracy Kidder : Mountain Beyond Mountains : The quest of Dr. Palm Farmer : A man who would cure the world (२००३)]



**या ग्रंथात शेवटी चर्चेसाठी आवाहन करण्यात आलेले**

## अस्वस्थ करणारे काही प्रश्न

१. आपल्यापेक्षा अतिशय वेगळ्या परिस्थितीत वाढलेल्या पॉल फार्मरने हैतीतल्या लोकांशी संवाद कसा साधला? त्यासाठी त्याने ज्या पद्धती उपयोगात आणल्या, त्या आपण आणू शकू का?

२. पॉल फार्मरचा असा विश्वास आहे की 'ज्यावेळी तुम्ही स्वार्थत्याग करता, त्यावेळी तुम्ही स्वतःची मानसिक अस्वस्थता कमी करण्याचा प्रयत्न करता.' डॉ. फार्मरने स्वतःच्या जीवनात त्याग केले, त्या पद्धतीने त्याग करणे योग्य आहे असे तुम्हाला वाटते का? तुम्ही कुठल्या कारणांसाठी स्वार्थत्याग करावेत, व ते केव्हा करावेत असे तुम्हाला वाटते?

३. ट्रेसी किड्डर असे दाखवून देतो की, आज ज्या पद्धतीने पैशाचे व औषधांचे वितरण होत आहे, त्याविषयी पॉल फार्मर नाखूष होता. अशा पद्धतीच्या वितरणासंबंधी तुमचे काय मत आहे? तुम्हाला या परिस्थितीत काय बदल व्हावा असे वाटते, आणि तुम्ही तसा बदल करण्याचा प्रयत्न करता का?

४. हैतीमधल्या जनतेचा जादूटोण्यावर विश्वास आहे, (होता) परंतु जादूटोण्यामुळे बरा न होणारा त्यांचा क्षयरोग, डॉ. फार्मरच्या उपचारांनी बरा होत होता. त्यांचा जादूटोण्यावरील विश्वास आणि प्रत्यक्षात औषधांमुळे रोग बरे होण्याचा अनुभव या परस्परविरोधी गोष्टींची सांगड घालण्यासाठी डॉ. पॉल फार्मर यांनी एक अभ्यास आखला (designed) होता. या अभ्यासातून, खोलवर रुजलेल्या सांस्कृतिक श्रद्धा (cultural beliefs) आणि गरिबी व कुपोषणामुळे खंगलेले रोगी यांची सांगड त्यांनी कशी घातली? तुम्हाला असे वाटते का, की जगात सर्वत्र अशा परिस्थितीत सापडलेल्या लोकांना, अशा प्रकारची सांगड घातली तर उपयोग होईल?

५. या पुस्तकाचे शीर्षक एका हैती म्हणीपासून घेतलेले आहे. ती म्हण अशी आहे - 'डोंगरापलीकडे

अनुक्रमणिका

डोंगरच असतात.' ही म्हण हैती संस्कृतीतून आलेली आहे. त्यातून त्या संस्कृतीविषयी काय अर्थ ध्वनित होतो? आणि याच म्हणीचा डॉ. फार्मरच्या कामाविषयी काय अर्थ ध्वनित होतो? तुम्ही जर अशा परिस्थितीत सापडलात, खाजगी किंवा सामाजिक, तर ही म्हण त्यावेळी लागू होईल असे तुम्हाला वाटते का?

६. डॉ. पॉल फार्मरचे बालपण अतिशय कठीण परिस्थितीत, कठोर बापाच्या शिस्तीत गेले. तरीही त्यांनी मिळवलेली ज्ञानसंपदा अतुलनीय आहे. ज्या परिस्थितीत डॉ. फार्मर वाढले, त्या परिस्थितीमुळे त्यांनी अशा प्रकारचे जीवन स्वीकारले असावे असे तुम्हाला वाटते का? तुमची स्वतःची कौटुंबिक परिस्थिती, तुमच्या आजच्या आयुष्याविषयी व त्या आयुष्यात घेतलेल्या निर्णयांवर प्रभाव पाडते असे तुम्हाला वाटते का?

७. डॉ. पॉल फार्मर यांचा 'झामी लासांटे' हा प्रयोग आणि डॉ. बाबा आमटे यांचा 'आनंदवन' व 'हेमलकसा' हे प्रयोग यांची तुलना करावी. हे प्रयोग कशामुळे सुरू झाले आणि तेथील डॉक्टर व रोगी यांचे संबंध कसे आहेत, तसेच जागतिक स्तरावर त्यांची कशा प्रकारे दखल घेतली जाते याचे विवेचन करावे.

८. काही सुशिक्षित लोक (academics) डॉ. पॉल फार्मर आणि त्यांच्या सहकाऱ्यांना असा प्रश्न विचारतात की 'तुम्ही तुमच्या रोग्यांना गरीब का समजता? ते स्वतःला कधी गरीब समजत नाहीत.' या प्रश्नाचे उत्तर डॉ. फार्मर व त्यांचा प्रमुख सहकारी जिम किम प्रामाणिकपणे कसे देतात? ते एकमेकांशी प्रामाणिकपणे बोलतात का?

९. डॉ. पॉल फार्मरसा मदत करणाऱ्या दोन व्यक्ती ऑफेलिया धाल व थॉमस व्हाईट, यांचा या पुस्तकात वर उल्लेख येतो. त्या दोघांनीही डॉ. फार्मरना भरपूर मदत केली आहे. डॉ. फार्मरमध्ये व त्या दोघांमध्ये काय फरक आहे?

१०. ट्रेसी किड्डरने दुसऱ्या एका ठिकाणी असे लिहिले आहे की 'तुम्ही जो दृष्टिकोन स्वीकारता तो लेखकाच्या बाबतीत सर्वात महत्त्वाचा आहे. त्याशिवाय सत्य परिस्थिती विषयी काही लिहिणे अवघड आहे. आणि हा दृष्टिकोन लेखकाने त्या लिखाणात पूर्णपणे गढून गेल्यावर व त्या लिखाणावर सर्व बाजूंनी, प्रकाश टाकल्यावरच स्पष्ट होतो.

**अनुवाद : सुमन दाभोलकर**

❖ ❖ ❖

## विचारशील आणि समाजपरिवर्तन कृति-चर्चासत्र

वरील प्रश्न व या अंकात 'विचारशीलांचे उत्तरदायित्व' संदर्भात अधिक सहचिंतनात ज्यांना रस असेल त्यांचे एक कृति-चर्चासत्र ३० जानेवारी २००७ रोजी सकाळी १०.०० ते दुपारी ५.०० या वेळात सातारा येथे होईल. प्रत्यक्ष उपस्थित राहू इच्छिणाऱ्यांनी माझ्याशी संपर्क साधावा. ज्यांना उपस्थित राहणे शक्य नसेल त्यांनी विचारासाठी आपली टिपणे पाठवावीत.

यातही ज्यांना अडचण असेल त्यांनी दुपारी ३.०० ते ५.०० या वेळात माझ्याशी फोनवर संपर्क साधावा. आपला दूरध्वनी क्रमांक सांगून दूरध्वनी खाली ठेवावा. मी लगेच परत संपर्क साधेन.

या दिवसाखेरीजही केव्हा मला भेटावयास यावयाचे असल्यासही स्वागत आहे. निवास भोजनादी व्यवस्था असेल. पूर्वसूचना असावी.

**- देवदत्त दाभोलकर**



अनुक्रमणिका

# महाराष्ट्रातील आद्य शिक्षण संस्था : पूना कॉलेज १८२१

डॉ० नीळकंठ बापट

१८१८ साली पुण्यातील पेशवाईचा अस्त झाला आणि ब्रिटिश सरकारने पुण्यातील जनतेशी सुसंवाद व सौख्य राहण्याच्या उद्देशाने, पुण्यातील सुशिक्षित ब्राह्मण समाजाच्या शिक्षणाची संस्थात्मक व्यवस्था करण्यासाठी हिंदू कॉलेज तथा पूना कॉलेज १८२१ मध्ये सुरू केले. आता त्याला १८५ वर्षे झाली. संस्थात्मक शिक्षणाची ही सुरुवात होती. तिच्या व्यवस्थापनाविषयी अनेक प्रश्न निर्माण झाले. त्याची एक चिकित्सक मांडणी करण्याचा हा प्रयत्न. शैक्षणिक संस्थेच्या व्यवस्थापनात संस्थेचे प्रमुख - म्हणजे प्रिन्सिपल आणि शिक्षक हे दोन मुख्य आधारस्तंभ. त्यांच्या संदर्भात निर्माण झालेले प्रश्न व त्यांची सोडवणूक हा ह्या लेखाचा प्रमुख विषय.

मुंबई विद्यापीठ (१८५७) सुरू होण्यापूर्वी मुंबई प्रांतात शिक्षण कसे होते ह्याची सर्वांनाच उत्सुकता असते. ह्या लेखाने त्यावर थोडा प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला आहे.

## पूना कॉलेजचे प्रिन्सिपल

१८२१ मध्ये पुण्यातील विश्रामबागवाड्यात हिंदू कॉलेज तथा संस्कृत कॉलेज सुरू करण्याचे ठरले. त्यामागील प्रमुख उद्देश हिंदू लोकांची शास्त्रे शिकवण्याची व्यवस्था करणे हा होता. हिंदूंची सर्व शास्त्रे संस्कृतमध्ये होती. त्यामुळे कॉलेजला संस्कृत कॉलेज असेही म्हणू लागले. सुरुवातीचे प्रोफेसर व कॉलेजचे प्रमुख प्रिन्सिपल हे संस्कृतमध्ये ज्ञानी होते व विशिष्ठ शास्त्रांत ते पारंगत होते. कॉलेजची पहिली टीम संस्कृतज्ञानींची होती. आणि टीम लीडर हे न्यायशास्त्रात प्रवीण होते. राघवाचार्य रामानुज ह्यांना पहिल्या प्रिन्सिपलचा मान मिळाला. ते १७ वर्षे प्रिन्सिपल म्हणून कार्यरत होते. त्यांना द.म. दीडशे रुपये पगार मंजूर झाला. ते न्यायशास्त्राचे प्रोफेसर म्हणून काम करत. त्याचे त्यांना वेगळे रु. ९० मिळत.

प्रिन्सिपलवर कॉलेज व्यवस्थापनाची संपूर्ण जबाबदारी टाकण्यात आली. प्राध्यापक व विद्यार्थी ह्यांचे व्यवस्थापन, कॉलेजात सर्व व्यवहारात शिस्त बाळगणे त्यांच्याकडून अपेक्षित होते. विद्यार्थ्यांची प्रवेश परीक्षा घेणे, प्रवेश देणे, त्यांची हजेरी ठेवणे, वेळोवेळी परीक्षा घेणे, वार्षिक परीक्षा, विद्यावेतन व बक्षीसे जाहीर करणे विद्यार्थ्यांच्या प्रगतीची नोंद ठेवणे, इत्यादी कॉलेज व्यवस्थापनाची सर्व कामे प्रिन्सिपलला देण्यात आली. त्याचप्रमाणे कॉलेजमधील सर्व घटनांची सरकारला माहिती देणे, सरकारशी योग्य तो संपर्क ठेवणे हेही अपेक्षित होते. १८२१ ते १८३८ अशी कॉलेज जीवनातली पहिली १७ वर्षे त्यांनी काम केले. अधूनमधून ते रजेवर जात त्यावेळेस अन्य प्राध्यापकांची प्रिन्सिपल म्हणून नेमणूक होई.

१८३५ मध्ये ते रजेवर गेले असता प्रिन्सिपलचे पद त्यांच्या मुलाकडे देण्यात आले. नरसिंहाचार्य हे त्या काळात प्रिन्सिपल. १८३६ व १८३७ मध्ये ते रजेवर गेले असता कोणाला प्रिन्सिपल करावे हा प्रश्न निर्माण झाला. त्यांचा मुलगा नरसिंहाचार्य ह्याला प्रिन्सिपल म्हणून नेमावे अशी राघवाचार्यांची इच्छा होती. पण तसे काही झाले नाही. १८३६ मध्ये अनंताचार्य व १८३७ मध्ये नारायणाचार्य ह्यांच्या नेमणुका झाल्या. नारायणाचार्यांच्या काळात कॉलेजात बेशिस्त वर्तणुकीची प्रकरणे उद्‌भवली. प्रिन्सिपल नारायणाचार्य व इतर दोन प्राध्यापकांनी बंडखोरी केली. नव्याने सुपरिटेंडंट म्हणून नेमलेल्या मेजर कँडीबाबत यांचा विरोध होता. शेवटी १८३८ मध्ये नारायणाचार्य प्रिन्सिपल व इतर दोन सहप्राध्यापकांना नोकरीतून काढून टाकण्यात आले. प्रिन्सिपल नारायणाचार्य यांना निवृत्तिवेतनही देण्यात आले नाही. प्रिन्सिपल राघवाचार्य १८३८ मध्ये निधन पावले. त्यांच्या जागी कॉलेजातील एक संस्कृत पंडित विष्णूशास्त्री बापट ह्यांना तातडीने नेमले. ते काही काळ सुरतला आय.एस.लॉ या इंग्रज अधिकाऱ्याच्याकडे संस्कृत पंडित म्हणून काम करत होते. त्यांनी 'नीतीदर्पण' व इतर पुस्तकेही लिहिली होती. सुरुवातीला मेजर कँडी याचे










त्यांच्याविषयी मत चांगले होते. कॉलेजमध्ये अनेक सुधारणा करण्याच्या कँडीच्या योजना होत्या. त्यासाठी त्यांने बापटांना 'असिस्टंट सुपरिटेंडंट' म्हणून मुंबई शासनाकडून मुद्दाम मागून घेतले. बापटांनीही कँडीना ह्या सुधारणांबाबत मदत केली. विष्णूशास्त्री सुधारक गटातले होते. विधवा विवाह हा शास्त्रसंमत आहे असे त्यांचे मत होते व त्याचा त्यांनी हिरीरीने प्रचार केला. बापट हे स्वभावाने तापट होते. एका विद्यार्थ्याला त्यांनी छडीने मारले. त्यामुळे कॉलेज व्यवस्थापनाकडे अनेक तक्रारी आल्या. कँडीचे आणि त्यांचे मतभेद झाले. त्यांच्यावर ठपका ठेवून त्यांना काढण्यात आले व त्यांना त्यांचा पगारही दिला नाही.

बापटांच्या जागी मोरेश्वरशास्त्री साठे ह्यांना १८३९ साली प्रिन्सिपल म्हणून नेमण्यात आले. मोरेश्वरशास्त्री धर्मशास्त्राचे, अलंकारशास्त्राचे विद्वान पंडित म्हणून प्रसिद्ध होते. मोरेश्वर साठे यांना प्रिन्सिपल व प्राध्यापक म्हणून नेमण्यात आले. पण पूर्वी प्रिन्सिपलचा पगार १५० रु. होता. मोरेश्वर-शास्त्रींना १०० रु. पगार निश्चित केला. वाचवलेल्या दरमहा ५० रुपयांचा विनियोग छापखान्याच्या वाढीसाठी करण्यात आला. मोरेश्वरशास्त्री यांनी १८३९ ते १८५२ अशी १३ वर्षे प्रिन्सिपल म्हणून काम केले. १८५३ मध्ये त्यांना सुरतेला मुनसफ म्हणून नेमणूक मिळाल्याने त्यांनी प्रिन्सिपलपदाचा राजीनामा दिला आणि त्याचबरोबर १८२१ ते १८५२ ह्या तीन वर्षांच्या देशी प्रिन्सिपल परंपरेचा अंत झाला. ह्या काळात सहा प्रिन्सिपलनीं काम केले. अर्थात राघवाचार्य व मोरेश्वरशास्त्री यांनाच फक्त दीर्घकाळ प्रिन्सिपल म्हणून काम करता आले. बाकीच्यांना तात्पुरते-अल्पकाळासाठी काम करता आले. राघवा-चार्यांच्या काळात प्रिन्सिपल हाच सर्वाधिकारी होता. त्याच्यावर कलेक्टर कमिशनरचे अधिपत्य होते पण ते दुरूनच. दैनंदिन कारभारात त्यांची फारशी ढवळा-ढवळ नव्हती. कारण त्यांना इतर कामे बरीच होती. १८३८ मध्ये मेजर कँडी ह्या ब्रिटिश अधिकाऱ्यास सुपरिटेंडंट म्हणून नेमण्यात आले. त्या नेमणुकीचा स्पष्ट उद्देश हा कॉलेज व्यवस्थापन देशी माणसाकडून युरोपियन माणसाकडे ठेवणे हाच होता. कँडीने दैनंदिन कारभारात लक्ष घालू नये असे प्रिन्सिपल व प्राध्यापकांना वाटे. काही काळ त्यांनी असहकार केला पण ते धोरण यशस्वी झाले नाही.

तेव्हा कॉलेजचा सर्वाधिकारी कोण? प्रिन्सिपल का सुपरिटेंडंट हा कळीचा प्रश्न बनला. सत्ता-सिंहासन एक व राजे दोन ही व्यवस्था काही कायम चालू शकणारी नव्हती. त्याचा शेवट नेहमी होतो तसाच झाला. सुपरिटेंडंट कँडी स्वतःच प्रिन्सिपल झाला. कँडीला संस्कृतचे ज्ञान मर्यादित होते. तो विद्यापीठीय शिक्षण घेतलेला शिक्षित प्राध्यापक नव्हता. तो मूलतः लष्करी अधिकारी होता. पण त्याला शिक्षणात रस होता एवढेच. त्याने प्रयत्नपूर्वक मराठीत प्रतिष्ठा मिळवली. मोल्सवर्थबरोबर मराठी शब्दकोश तयार केला. मराठीत स्वतंत्र पुस्तके लिहिण्यास व इंग्रजी ग्रंथांचे भाषांतर करण्यास प्रोत्साहन दिले. संस्कृत भाषेचे आचार्य कँडीला वर्गात येऊ देत नसत. आलाच तर त्याला बूट काढायला लावत. त्याने विद्यार्थ्यांना प्रश्न विचारू नयेत, संस्कृत भाषा व ग्रंथ पवित्र आहेत व त्यांचे पठण परकीयांच्या देखत करणार नाही असा पवित्रा देशी प्राध्यापकांनी घेतल्याने कँडीस स्वतःच प्रिन्सिपल व्हावे लागले. अर्थात काही दिवसांनंतर काळ बदलला. जे प्राध्यापक त्याला वर्गात येऊ देत नव्हते, ते त्याचे स्वागत करू लागले. कँडी १८५३ ते ५७ ह्या काळात प्रिन्सिपल होता. १८५७ मध्ये तो रजेवर इंग्लंडला गेला. कँडीने कॉलेजात शिस्तीचे वातावरण निर्माण केले.

कँडी रजेवर गेल्यावर मुंबई येथील इंजिनीअरिंग कॉलेजातील प्राध्यापक मॅकडुगल ह्यांना हंगामी प्रिन्सिपल म्हणून नेमले. (१८५७ जाने १). वर्षाच्या शेवटी डिसेंबर १८५७ ला कायमस्वरूपी प्रिन्सिपलची नेमणूक करण्यात आली. ॲरनॉल्ड कामावर रुजू झाले. दोन वर्षांनी त्यानेही राजीनामा दिला व ऑक्सफर्ड विद्यापीठातून एम.ए. झालेले डब्लू. ए. रसेल ह्यांनी नोव्हेंबर १८६० मध्ये प्रिन्सिपल पदाचा पदभार स्वीकारला. पुढे १८६२ मध्ये वर्डस्वर्थ हे प्रिन्सिपल झाले. त्यांच्या कारकीर्दीत कॉलेजने खूपच शैक्षणिक प्रगती केली. पण १८६७ मध्ये कॉलेजचे नाव बदलण्यात आले व त्यानंतर डेक्कन कॉलेज म्हणून अस्तित्वात आले. ह्या कॉलेजातून टिळक, आगरकर, ह्यांसारखे प्रसिद्ध साहित्यिक, तत्त्ववेत्ते, राजकारणी, संशोधक शिक्षण घेऊन बाहेर पडले. १९३३ साली डेक्कन कॉलेज बंद करण्यात आले व १८२१ साली स्थापन झालेले हे कॉलेज १११ वर्षांनंतर बंद झाले व महाराष्ट्राच्या शिक्षणक्षेत्रातील हा वटवृक्ष जमीनदोस्त झाला.

अनुक्रमणिका

**पूना कॉलेजचे प्रिन्सिपल :**

१. राघवाचार्य रामानुज (१८२१ ते १८३८); २. नरसिंहाचार्य राघवाचार्य (१८३५, राघवाचार्यांच्या रजेच्या काळात); ३. अनंताचार्य (१८३६, राघवाचार्यांच्या रजेच्या काळात); ४. नारायणाचार्य (१८३७, ॲक्टिंग प्रिन्सिपल); ५. विष्णूशास्त्री बापट (१८३९, ॲक्टिंग प्रिन्सिपल); ६. मोरेश्वरशास्त्री साठे (१८३९ ते १८५२); ७. मेजर थॉमस कँडी (१८५३ ते १८५७); ८. मेजर कँडी रजेवर इंग्लंडला गेला (१८५७); ९. मॅकडुगल (१ जाने. १८५७ ते ७ डिसें. १८५७); १०. ॲरनॉल्ड एडविन (७ डिसें. १८५७ ते १८६०); ११. डब्लू. ए. रसेल (१८६० ते १८६२); १२. वर्डस्वर्थ (१८६२ ते १८६७); १३. 'पूना कॉलेज'चे नाव 'डेक्कन कॉलेज' झाले व त्याचे पहिले प्रिन्सिपल वर्डस्वर्थ होते. (१८६८); १४. १८३५ मध्ये कॉलेजवर युरोपिअन अधिकाऱ्याचे नियंत्रण असावे असे ठरल्यामुळे मेजर थॉमस कँडीस सुपरिटेंडंट म्हणून नेमले.

**पूना कॉलेज : शिक्षक व्यवस्थापन**

पूना कॉलेज स्थापन झाल्यावर महत्त्वाचा प्रश्न म्हणजे शिक्षक व्यवस्थापन. कोणत्या विषयासाठी शिक्षक नेमायचे, त्यांचे वेतन किती असेल, त्यांच्या जबाबदाऱ्या कोणत्या, शिस्तभंगाची कारवाई कशी असेल, त्यांची निवृत्ती व त्यांचे निवृत्तीवेतन ह्याविषयी शासनाला निर्णय घेणे जरूरीचे झाले.

कॉलेज व्यवस्थापनाची योजना सादर करताना कमिशनर प्रोफेसर, असिस्टंट प्रोफेसर, ह्या श्रेणी सुचवल्या गेल्या. मराठीत गुरू व उपगुरू अशी श्रेणींची नावे होती. शास्त्री, पंडित, आचार्य, वैदिक ही पदनामेही त्याच्या पत्रात आढळतात. आचार्य म्हणजे प्रोफेसर. शास्त्री हे पदनाम सर्वसाधारणपणे शिक्षक या अर्थाने वापरले आहे. न्याय, व्याकरण, वेदांत, धर्मशास्त्र, अलंकार ही शास्त्रे आणि ते शिकवणारा तो शास्त्री. पण त्यास पंडित ही उपाधी लावलेली आढळते. वेद शिकवणारा तो वैदिक. आचार्यांना दरमहा १०७ रु. व पंडितांना दरमहा ६० रु., ऋग्वेद शिक्षकांना ४१-१/४ रु. व यजुर्वेद शिकवणाऱ्यास रु. ३३-५ आणे असा पगार ठरविण्यात आला.

१८३८ मध्ये सुपरिटेंडंट मेजर कँडीने जी योजना सादर केली त्यात प्रोफेसर, असिस्टंट प्रोफेसर, ज्युनिअर प्रोफेसर व टीचर ही पदनामे वापरली आहे. हळूहळू देशी उपाध्या न वापरता इंग्रजी उपाध्या वापरण्यास सुरुवात झालेली दिसते. प्रोफेसरला द.म. रु. ६० व असिस्टंट प्रोफेसरला रु. ३० वेतन ठरले. ह्या सर्व पदांना शासनाची म्हणजे गव्हर्नरची परवानगी घ्यावी लागे. काही वेळा कलकत्त्याच्या सुप्रीम गव्हर्नमेंट वा अंतिमतः 'कोर्ट ऑफ डायरेक्टर्स, फॉर द अफेअर्स ऑफ द ऑनरेबल युनायटेड कंपनी ऑफ मर्चंट्स ऑफ इंग्लंड ट्रेडिंग टू द इस्ट इंडिज, लंडन' ह्यांची परवानगी लागे. (इस्ट इंडिया कंपनी).

नवीन पद निर्माण करणे किंवा पगार वाढवणे म्हणजे नवा खर्च. पण ह्यासाठी मुंबई सरकार वेगळी रक्कम उपलब्ध करून देत नसे. उदाहरणार्थ कॉलेज व्यवस्थापनेसाठी योजलेले पहिले अंदाजपत्रक पेशवेकाळापासून चालू असलेल्या दक्षिणा फंडातून निर्माण झाले. पन्नास हजार रुपये दक्षिणेच्या रकमेतील वीस हजार रुपये दक्षिणा म्हणून न वाटता दक्षिणा प्राईझ व पूना कॉलेजसाठी वापरण्यात आले. पुढे वेद शिकवण्यासाठी नेमलेल्या वैदिकांची पदे रद्द करण्यात आली आणि त्यात बचत झालेले पैसे अन्य शास्त्रांच्या प्राध्यापकांच्या वेतनांत वाढ करण्यासाठी वापरले. पूना कॉलेजमध्ये दिवाळी, गणपती, गुरुपूजा इत्यादी सण साजरे केले जात ते बंद करण्यात आले व बचत झालेले पैसे प्राध्यापकांचे पगार वाढविण्यासाठी वापरले. विद्यार्थ्यांना द्यावयाच्या विद्यावेतनांत अशाच प्रकारे बचत करण्यात आली. प्राध्यापकांचे पगार जसे ह्या पद्धतीने वाढवले तसेच छापखानाही अशाच तऱ्हेने बचत झालेल्या पैशातून उभारला गेला.

प्राध्यापकांना काही प्रमाणात निवृत्तीवेतनही देण्यात येत असे. उदाहरणार्थ पूना कॉलेज बंद करण्याचा प्रस्ताव मांडतानाही निवृत्तीवेतन देऊन प्राध्यापकांना कामावरून दूर करावे म्हणजे कॉलेज आपोआपच बंद होईल हा पर्याय विचारात घेतला गेला होता.

१८३८ मध्ये वेद शिकवणाऱ्या पाच प्राध्यापकांना निवृत्त करण्यात आले कारण वेद शिकवणे बंद करण्यात आले. ज्या प्राध्यापकांचा पगार ४१ रु. २ आणे होता त्यांना रु. १२ निवृत्तिवेतन देण्यात आले व त्याद्वारे महिना ७१ रुपयांची बचत झाली. ह्यातूनच दरमहा ६५ रुपये छापखान्यातील कामगारांच्या पगारासाठी वापरण्यात आले.

अनुक्रमणिका

**हिंदू कॉलेजातील प्राध्यापकांचे पगार :**

१८२० साली पुण्याचा कमिशनर विल्यम चॅपलिन याने हिंदू कॉलेजची जी योजना मांडली त्यात कॉलेजमध्ये कोणते विषय शिकवावेत, त्यासाठी किती प्राध्यापक नेमावेत, त्यांचे पदनाम व त्यांचा पगार काय असावा ह्याविषयीही शिफारस केली. प्राध्यापकांच्या पदानुसार वेतनाचा ढाचा ठरवण्यात आला.

१. आचार्य (न्याय, अलंकार वेदांत, धर्मशास्त्र, वैद्य व ज्योतिष) : १०० रु; २. वैदिक प्रत्येकी (सहा पंडित) : ६० रु.; ३. ऋग्वेद शिक्षक प्रत्येकी (दोन शिक्षक) : ४१ रु. ४ आणे; ४. यजुर्वेद शिक्षक (एक शिक्षक) : ३३ रु. ५ आणे; ५. सहाय्यक शिक्षक (एकूण ८) : २० रु; ६. विद्यार्थी (१००) : ५ रु.

**पूना कॉलेजातील कर्मचाऱ्यांची वेतनश्रेणी :**

१८३८ मध्ये मुंबई गव्हर्नर आर. ग्रँट याने पूना कॉलेजातील प्राध्यापक व अन्य कर्मचाऱ्यांनी वेतनश्रेणी निश्चित केली. ह्या वेतनश्रेणीप्रमाणे ठरलेले वेतन खालीलप्रमाणे होते.

१. प्रोफेसर (गुरू) : ६० रु.; २. असिस्टंट प्रोफेसर [उपगुरू (व्याकरण, ज्योतिष, धर्मशास्त्र, न्याय, अलंकार, वेदांत, वैद्यक ह्या शास्त्रातील प्राध्यापकांनाच फक्त ही श्रेणी उपलब्ध होती. वेदाच्या प्राध्यापकांना दुय्यम श्रेणी होती.)] : ३० रु.; ३. ऋग्वेद, यजुर्वेद व अयस्तंभ ह्यांच्यासाठी - प्रोफेसर (गुरू) : ४१ रु. ८ आणे, असि. प्रोफेसर (उपगुरू) : २० रु.; ४. प्रिन्सिपलना विशेष भत्ता : ९० रु.; ५. कारकून (१) : ३० रु.; ६. विद्यार्थ्यांना विद्यावेतन १०० विद्यार्थी : ५ रु.; ७. पुहुनिकुवस (४) : २२ रु.; ८. कामतस (२) : १० रु.; ९. मशालेकू : ८ रु.; १०. सादिलवार खुंच : २० रु.; ११. मराठी शाळेतील शिक्षक : २० रु.; १२. सादिलवार खर्च : २० रु.

प्रत्येक विषयासाठी सर्वसाधारणपणे एक प्रोफेसर व एक असिस्टंट प्रोफेसरची नेमणूक करण्यात आली. अलंकारशास्त्रात मात्र १ ज्युनिअर पद जादा देण्यात आले आणि त्यांचा पगारही ४० रु. ठरविला गेला.

प्राध्यापकांची कर्तव्येही ठरवण्यात आली. शिकवणे हे प्राध्यापकाचे प्रमुख काम. त्या काळात पाठांतरावर भर जास्त असे. तेव्हा चॅपलिन व कँडी ह्या दोघांच्याही सूचनात नुसत्या पाठांतरावर भर न देता विषयातील संकल्पना समजण्यावर अधिक भर दिलेला आढळतो. जे पाठ केले आहे त्याचा अर्थ समजला पाहिजे, शिकवण्याबरोबरच विद्यार्थ्यांना शिस्त लावणे अपेक्षित होते. शिवाय परीक्षा घेणे हेही शिक्षकाकडून अपेक्षित होते. परीक्षा वेळोवेळी तर घेतल्याच पाहिजेत पण वर्षाच्या शेवटी युरोपिअन अधिकाऱ्यांच्या समोर घ्याव्यात अशी अपेक्षा होती. सुरुवातीच्या काळात कलेक्टर, कमिशनर हे परीक्षेच्या वेळी हजर असत. पुढे सुपरिटेंडंट म्हणून थॉमस कँडीची कायमस्वरूपी नेमणूक झाल्यावर कँडी स्वत: परीक्षेच्या वेळी हजर राहत असे.

धर्मशास्त्रासारखे विषय कॉलेजात शिकवले जात असल्याने न्यायदानातही त्यांचा सहभाग अपेक्षित होता. न्यायालयाने जर शास्त्रार्थसंदर्भात धर्मशास्त्रांच्या प्राध्यापकांकडे विचारणा केली तर प्राध्यापकांनी योग्य तो सल्ला देणे अपेक्षित असल्याचे चॅपलिनने नोंदवले आहे.

शास्त्रींची नेमणूक ही त्यांच्या विशिष्ट शास्त्रातील कौशल्यावर अवलंबून होती. शास्त्रींनी प्राप्त केलेल्या कौशल्याची चाचणी घेतली जाई. १८४० साली ज्योतिष विषयासाठी प्राध्यापक नेमायचा होता. त्यासाठी अनेक उमेदवारांना मुलाखतीसाठी बोलावण्यात आले व त्यांची खुली परीक्षा घेण्यात आली. लॅन्सेलॉट विल्किन्सन, प्रोफेसर ओर्लेबार, मुंबई व इस्टेल, पुणे ह्यांना निवड समितीत घेऊन ज्योतिषशास्त्राची रिकामी जागा भरण्यात आली.

काही वेळा प्राध्यापकांवर शिस्तभंगाची कारवाई करावी लागली. पूना कॉलेजच्या सुरुवातीच्या काळात कॉलेजचे प्रिन्सिपल हेच सर्वाधिकारी होते. कॉलेजमधील विद्यार्थी व शिक्षक ह्या दोघांवर नियंत्रण ठेवणे, शिस्त राखणे हे काम व त्याचे अधिकार प्रिन्सिपलला होते. कमिशनर व नंतर कलेक्टर ह्यांच्या सर्वसाधारण अधिकारकक्षेत कॉलेज होते व त्यांचे नियंत्रण होते. कॉलेजचे पहिले प्रिन्सिपल राघवाचार्य हे एक संस्कृत पंडित होते व त्यांनी १८२१ ते १८३८ अशी १७ वर्षे कार्य केले. कॉलेजातील आचार्य मंडळी जुन्या मताची होती व ब्रिटिश अधिकाऱ्यांशी त्यांचा सुसंवाद नसे. उदाहरणार्थ ब्रिटिश अधिकाऱ्यांना बूट बाहेर काढल्या शिवाय वर्गात येऊ देत नसत. शिवाय सोवळेओवळे प्रकार तर होतेच, ब्रिटिशांनी दिलेली दक्षिणा पाण्याने धुवून घेणे, ब्रिटिशांच्या संपर्कात आल्यास घरी जाऊन आंघोळ करणे, इंग्रज अधिकाऱ्यांच्या देखत वेदपठण न करणे वा ते आल्यास आचार्यांनी शिकवणे बंद करणे, कारण संस्कृतमधील शब्द परकीयांच्या कानावर पडता कामा नयेत










इत्यादी. इंग्रज अधिकाऱ्यांना-राज्यकर्त्यांना हे पटणे कठीणच होते. त्यांनी वरिष्ठांकडे अनेकवेळा तक्रारी केल्या परंतु वरिष्ठांची भूमिका जमवून घेण्याकडे होती. प्राध्यापकांच्या व विद्यार्थ्यांच्या असहकारामुळे तथा बेशिस्तीमुळे कॉलेज बंद करावे अशीही कमिशनर, कलेक्टर यांनी शिफारस केली. परंतु प्रत्यक्षात तसे न घडता एवढे मान्य झाले की ह्या हिंदू कॉलेजवर युरोपिअन अधिकाऱ्याचे नियंत्रण असावे व कॅप्टन थॉमस कँडीची सुपरिटेंडंट म्हणून नेमणूक करण्यात आली. कॉलेजमधील प्राध्यापकांचे आणि कँडीचे वेळोवेळी खटके उडत असत व वातावरण असहकाराचे असे. कँडीच्या रूपाने अधिकाराचे व नियंत्रणाचे नवीन केंद्र निर्माण झाले. देशी प्रिन्सिपल व इंग्लिश सुपरिटेंडंट ही व्यवस्था चालवणे कठीण होते. कँडीचा पगार रु. १२० ठरला. तो प्रिन्सिपलपेक्षा जास्त होता. शिवाय हा पगार ब्राह्मणांना वाटायच्या दक्षिणा रकमेतून द्यायचा ठरला. ह्यालाही लोकांचा विरोध होता. काही शास्त्रींनी कँडीविरुद्ध वातावरण निर्माण केले व त्यांनी शिक्षकांच्या कामात ढवळाढवळ करू नये, अशी भूमिका घेतली. आमची शास्त्रे कशी शिकवावीत ते आम्ही आमचे पाहून घेऊ, कँडीने आचार्य शिकवत असताना येऊ नये, त्याला रीतिरिवाज माहीत नाहीत, त्याच्यामुळे आमच्या संस्कृतीचा अपमान होतो, इत्यादी.

एकदा कँडीने कॉलेजच्या दिवाणखान्यात आचार्यांना उपयोगी पडावे म्हणून टेबल पाठवले. परंतु आचार्यांनी ते स्वीकारण्यास नकार दिला व टेबलासारख्या इंग्रजी वस्तूंमुळे आमच्या सांस्कृतिक मूल्यांचा भंग होतो अशी शास्त्री मंडळींनी भूमिका घेतली. तेव्हा दिवाणखान्यात टेबल ठेवायचे की नाही हा दोन्ही गटांना मानबिंदू झाला. शेवटी कँडीने प्रिन्सिपल नारायणाचार्य व अन्य तीन शास्त्रींविरुद्ध शिस्तभंगाची कारवाई केली आणि त्यांना काढून टाकले. काही शास्त्रींनी मागून कँडीशी जुळवून घेतले व माफी मागितली. त्यामुळे त्यांच्याविषयी शिक्षा सौम्य करण्यात आली. अर्थात् त्यांना परत कामावर घेतले नाही. पण त्यांना निवृत्तिवेतन देण्यात आले. प्रिन्सिपल नारायणाचार्यांना मात्र नोकरी गमवावी लागली व निवृत्तिवेतनही देण्यात आले नाही. त्यांच्यानंतर विष्णूशास्त्री बापट ह्यांना प्रिन्सिपल म्हणून नेमण्यात आले. पण त्यांचेही कँडीशी जमले नाही.

**पुणे पाठशाळा व पूना कॉलेजमधील काही प्रसिद्ध प्राध्यापकांची यादी**

१. कृष्णशास्त्री चिपळूणकर (१८२४-१८७८), भाषांतरकर्ते, मराठी साहित्यिक; २. श्रीकृष्णशास्त्री तळेकर (१८२६-१८८०), कोशकार व व्याकरणकार, अलंकारशास्त्र; ३.कृष्णशास्त्री राजवाडे (१८२०-१९०५), अलंकार-विवेक, शाकुंतल नाटकाचे भाषांतर; ४. महादेवशास्त्री गोविंदशास्त्री कोल्हटकर (१८२२-१८६५), ज्योतिष व व्याकरण, मराठीचे प्राध्यापक; ५. कृष्णशास्त्री पांडुरंगशास्त्री गोडबोले, व्याकरण, गणित ज्योतिष; ६. परशुराम बल्लाळ गोडबोले (१७९९-१८७४), भाषांतरकर्ते; ७. विष्णूशास्त्री कृष्णशास्त्री चिपळूणकर (१८५०-१८८२), राजकीय पुढारी, निबंधमालेचे लेखक; ८. केरो लक्ष्मण छत्रे (१८२४-१८८४), गणित, ज्योतिष, सृष्टिविज्ञान, पंचांग, भूमापन विषयांवर पुस्तके; ९. रामकृष्ण गोपाळ भांडारकर (१८३७-१९२७), मुंबई विद्यापीठाचे पहिले पदवीधर, संस्कृत थोर अभ्यासक; १०. विष्णू मोरेश्वर भिडे (१८२७-१९०१), भाषांतरकार, इनाम कमिशनर; ११. रे. डॉ. मिचेल जे. मरे (१८१४-१९०४), मराठी व संस्कृत विभागाचे प्रमुख; १२. महादेव मोरेश्वर कुंटे, संस्कृत व मराठीचे प्राध्यापक; १३. एम. रुनन; १४. व्ही ग्रीन; १५. जॉर्ज मिलर; १६. जॉ. ब्युहलर, प्रोफेसर ऑफ ओरिएंटल लँग्वेजेस; १७. थॉमस कँडी, प्रिन्सिपॉल, भाषांतरकार, मराठी व्याकरणकार, कोशकार; १८. नारायणशास्त्री अभ्यंकर, संस्कृत व अलंकार प्रोफेसर; १९. विष्णुशास्त्री बापट, (१८०४-१८६५), प्रिन्सिपल, संस्कृत व्याकरण, न्याय, वेदांत; २०. प्रिन्सिपल वर्डस्वर्थ; २१. राघवाचार्य रामानुज, प्रिन्सिपल, न्यायशास्त्राचे प्रोफेसर; २२. नरसिंहाचार्य, प्रिन्सिपल; २३. मोरेश्वरशास्त्री साठे, अलंकाराचे प्रोफेसर व प्रिन्सिपल, धर्मशास्त्राचे प्रोफेसर; २४. मोरेश्वरशास्त्री जोशी, ज्योतिषशास्त्राचे प्रोफेसर; २५. अनंताचार्य, प्रिन्सिपल; २६. बाबाजी कृष्ण गोखले, पुढे स्वतःची शाळा सुरू केली; २७. डॉ. किलहॉर्न, पौर्वात्य भाषांचा प्रोफेसर.

संदर्भ : ज्ञानकोश, विश्वकोश, वाङ्मयकोश, संस्कृती कोश, विश्रामबागवाडा : गणेश त्र्यंबक बापट, मुंबई प्रांताच्या शिक्षण खात्यातील पत्रव्यवहार : आर. व्ही. परुळेकर.










# एका राजकीय कार्यकर्त्याची अस्वस्थता

शरद पवार

(श्री० यशवतराव चव्हाण यांना सदतीस वर्षांपूर्वी लिहिलेले पत्र.)

मार्च ३१, १९६९

मा. साहेब,

कृ.सा.न.वि.वि.

बरेच दिवसापासून आपणास पत्र लिहावयाचे ठरविले, परंतु राहून गेले. मध्यंतरी आपली घाईघाईने भेट झाली. माझ्या मनात असलेल्या अनेक गोष्टी, मते, अनुभव याबाबत बोलायचे होते; परंतु वेळेअभावी शक्य झाले नाही. मनामध्ये कोंडलेल्या भावना (कदाचित उद्रेग वा उद्वेगही) बाहेर पडून गेल्या व मुख्य बोलणे फारसे होऊ शकले नाही. आपणास दिलेल्या त्रासाबद्दल क्षमस्व.

राजकीय कार्यक्षेत्रामध्ये माझ्यासारख्या नवीन कार्यकर्त्याची अवस्था मोठी विचित्र झाली आहे. देशातील एकंदरीत राजकीय परिस्थिती, काँग्रेसची दिवसेंदिवस होणारी पडझड व या परिस्थितीचा यत्किंचितही परिणाम न होणारी अथवा करून घेणारी पक्षाची हायकमांड यामुळे चिंता वाटते. मन अत्यंत अस्वस्थ होत आहे व काही प्रमाणावर नैराश्य येऊ लागते. तरुण पिढीला, नवोदित सुशिक्षित वर्गाला काँग्रेसकडे आकृष्ट होण्यासाठी थोडेसुद्धा अनुकूल वातावरण नाही. याउलट काँग्रेस कार्यकर्ता पाहिला, की चीड येणारा तरुण वर्ग ठिकठिकाणी दिसतो. हा दोष मी या तरुण वर्गाचा आहे, असे मुळीच समजत नाही. आम्ही आमच्या वैयक्तिक स्वार्थामध्ये, गटबाजीमध्ये, सत्तास्पर्धेमध्ये इतक्या थराला गेलो आहोत, की आम्ही कोणाचे निश्चित प्रतिनिधित्व करतो, याचे आम्हास भान राहिले नाही. जनमानसातून आम्ही दूर जाऊ लागलो आहोत. सर्वसामान्य जनांना विविध प्रश्नांवर आपली मते, धोरणे सांगून राजकीय शिक्षण देण्याची प्रोसेस पूर्णत: बंद केलेली आहे. वैयक्तिक स्वार्थापायी आम्ही आदर्श मोडून दिले असल्याने नवोदित तरुण वर्ग आमच्या बाजूस फिरकतही नाही व अशा परिस्थितीमध्ये कार्यकर्त्यांनी कसे वागले पाहिजे याचा विचारही पक्ष नेत्यांकडून होत नाही, हे अतिशय खेदजनक आहे. कार्यकर्त्यांमध्ये सत्तास्पर्धेमुळे व वैयक्तिक स्वार्थापायी इतके मतभेद जाहीर होऊ लागले आहे, की विचारू नका. सार्वजनिक जीवनात चारित्र्य निष्कलंक ठेवणे हेच आम्ही पूर्णपणे विसरून गेलो आहोत व या वाईट प्रवृत्तीची वाढ होणाऱ्या कार्यकर्त्यांवर नेत्यांचा वचक न राहिल्याने ते बेताल बनू लागले व यामुळे सामान्य माणूस विटला गेला, मला असे वाटते. देशापुढील अनेक प्रश्न - मग ते म्हैसूर-महाराष्ट्र सीमा प्रश्न असो किंवा आंध्र-महाराष्ट्र पाणी वाटपाचे असोत, ते सोडविण्याची हिंमत (स्व.) पंतप्रधान पंडित जवाहर-लालजींच्या अंगी होती. त्यांच्या अत्यंत प्रभावी व्यक्तिमत्त्वामुळे त्यांनी घेतलेल्या निर्णयास विरोध करण्याची हिंमत नव्हती. तरीही त्यांनी असे अनेक प्रश्न जनमत पूर्णत: पाठीशी असूनही न सोडविल्यामुळे आजचे नेतृत्व हे प्रश्न सोडवू शकत नाही व त्यामुळे नवोदित वर्ग कदाचित इतिहासकार पं. जवाहरलालजी नेहरूंना दोष दिल्याशिवाय राहणार नाहीत. अशीच अवस्था पक्ष-संघटना व कार्यकर्त्यांबाबत महाराष्ट्रात आहे. राज्यातील काँग्रेस कार्यकर्ता वेडावाकडा वागत असेल, आपल्या जबाबदाऱ्या चांगल्या रीतीने पार पाडत नसेल तर त्याचा कान धरण्याचा अधिकार व मान्यता मराठी जनतेने आपणास दिली असताना आपण अशा वाईट प्रवृत्तींच्या कार्यकर्त्यांबाबत स्तब्ध राहिल्यास पुढेमागे महाराष्ट्रातील काँग्रेस संघटना क्षीण झाल्यास मराठी जन पं. जवाहर-लालजींप्रमाणे आपणासही दोष दिल्याशिवाय राहणार नाहीत. मला जे स्पष्टपणे वाटते, ते स्पष्टपणे लिहीत आहे, त्याबद्दल क्षमस्व.

शेवटी परिस्थिती कितीही बिकट होऊ लागली तरी निराश होऊन चालणार नाही. म्हणून जिद्दीने काम करण्याची माझी व माझ्यासारख्या असंख्य कार्यकर्त्यांची इच्छा आहे. त्या दृष्टीने आपल्या मर्यादित क्षेत्रात आमचे प्रयत्न चालू आहेत, चालू राहतील. आपल्या पाठींब्यानेच मला व माझ्या अनेक सहकारी मित्रांना काम करण्याची संधी मिळाली आहे, याची पूर्ण जाणीव आम्हास आहे व म्हणूनच सदैव कार्यप्रवण राहण्याचा आमचा मानस आहे. माझ्या







अनुक्रमणिका

दृष्टीने महाराष्ट्र काँग्रेसला पुढील काही प्रश्नांना तोंड द्यावे लागत आहे व लागणार आहे. राज्यातील प्रमुख असे तीन उपविभाग - विदर्भ, मराठवाडा, पश्चिम महाराष्ट्र हे आपण मान्य करतो. या तिन्ही विभागांतील ऐक्याची भावना कमी होऊ लागली आहे. दुर्दैवाने देशामध्ये अनेक ठिकाणी लहान राज्यांची कल्पना वाढू लागली आहे. त्याचे परिणाम आपणासही भोगावे लागतील असे दिसते. छोटी राज्ये, संकुचित प्रांतवाद पुढे करून जनमत मिळवणे शक्य होते असे दिसून आल्याने या प्रवृत्ती वाढीस लागत आहेत व प्रामुख्याने विदर्भामध्ये याचे परिणाम मोठ्या प्रमाणावर दिसतात. त्याचे महत्त्वाचे कारण, माझ्या मते विदर्भातील काँग्रेस नेतृत्व हे सर्वसामान्यांपासून, सुशिक्षित तरुण पिढीपासून, बहुजन समाजापासून दूर आहे. श्रीमंत जमीनदार, शेतकरी किंवा श्रीमंत मारवाडी यांचे आकर्षण बहुजन समाजातील तरुण पिढीस कधीही राहणार नाही, हे मी आपणास सांगण्याची आवश्यकता नाही. परंतु या सुशिक्षित नवोदित पिढीला काय हवे आहे, याची फारशी जाणीव दुर्दैवाने नेतृत्व करणारी मंडळी ठेवत नसल्याने हा फार मोठा असंतोष विदर्भातील तरुण वर्गात आहे व हा आपल्या विचाराशी जवळ असलेला वर्ग दूर जाऊ लागला आहे. त्यावर वेळीच उपाय करणे आवश्यक आहे.

मराठवाड्यामध्ये संकुचित विचारसरणीचा प्रश्न मोठ्या प्रमाणावर होत आहे. तेथील वृत्तपत्रे, कार्यकर्ते यांच्यामार्फत हा प्रचार होत आहे. वास्तविक हा प्रचार राज्याच्या ऐक्याला व पक्ष संघटनेला तडे घालणारा आहे. त्याचा विचार तेथील नेतृत्वाबद्दल होणे आवश्यक आहे. मराठवाड्यातील जनमानसात आपणावर अन्यायाची वागणूक दिली जाते, ही भावना रुजविण्याचे काम सुरू आहे. ते थांबविले पाहिजे.

पश्चिम महाराष्ट्रातील परिस्थिती काहीशी वेगळी आहे, असे मला वाटते. पश्चिम महाराष्ट्रातील तरुण पिढी व सामान्य जन जिल्हा परिषदा, सहकारी संस्था, यावर नियंत्रण ठेवणाऱ्या काँग्रेसमधील वर्गा संबंधी निराश आहे. या दोन्ही संस्थांमधील सत्तेचा, पैशाचा वापर व्यक्तिगत स्वार्थासाठी, अभिलाषेसाठी वापरण्याची प्रवृत्ती या कार्यकर्त्यांमध्ये मोठ्या प्रमाणावर दिसून येत आहे. आर्थिक सत्ता हाती आल्याने आपणाबरोबर न येणाऱ्या वर्गाची पिळवणूक या मंडळी-कडून होत आहे. त्यांच्या हातात सत्ता, संपत्तीचे बळ असल्याने त्यांची दहशत निर्माण होत आहे व ही प्रवृत्ती काँग्रेस संघटनेला अत्यंत मारक आहे. स्वार्थापुढे पक्षसंघटना अथवा पक्षाची मूलभूत तत्त्वे फेकून देण्याची प्रवृत्ती या वर्गात दिसून येत असल्यामुळे पश्चिम महाराष्ट्रातील काँग्रेस जनांतील या प्रवृत्ती न वाढू देण्याच्या दृष्टीने तातडीने प्रयत्न होणे आवश्यक आहे.

इतर अनेक प्रश्न आहेत. परंतु मला महत्त्वाचे जे वाटले ते आपणास लिहीत आहे. १९७२ च्या निवडणुकीत मतदारांमध्ये स्वातंत्र्योत्तर काळात जन्मास आलेले मतदार आहेत. स्वातंत्र्यप्राप्तीसाठी काँग्रेसजनांच्या प्रयत्नांचे चित्र त्यांच्या नजरेपुढे फारसे नाही. स्वच्छ चारित्र्यसंपन्न नेतृत्व, राष्ट्रवादी नेतृत्व, त्यांचे त्यांना आकर्षण दिसून येते. याचा विचार काँग्रेस संघटनेने करणे आवश्यक आहे. लहान राज्यांची मागणी व अति डाव्या विचारसरणीचे आकर्षण हे काँग्रेसला येत्या निवडणुकीतील आव्हान राहील असे वाटते. आर्थिक सत्तेमुळे समाजपरिवर्तन शक्य आहे, हे मान्य केल्यानंतर निश्चित विचारसरणी मग ती समाजवादी अर्थरचना का मिश्र अर्थरचना हे ठरविणे आवश्यक आहे व त्या दृष्टीने राज्याची सूत्रे हाकणे आवश्यक आहे व नक्की कोणाच्या हितसंबंधाचे रक्षण करायचे हेसुद्धा पक्के करणे आवश्यक आहे. (दुर्दैवाने तशी परिस्थिती दिसत नाही.)

पक्षसंघटनेच्या अवस्थेबद्दल लिहू इच्छित नाही. साधारण मनात असलेले विचार प्रश्न आपण आमचे नेते असल्याने व मनातील भावना कोठेतरी सोडणे आवश्यक आहे, त्यासाठी नेतृत्व विचारी हवे व या दृष्टीने फक्त आपणच समरस होऊ शकता म्हणून आपणास त्रास देत आहे.

माझे काम ठीक चालले आहे. बारामती ठीक आहे. काळजी नसावी. आपले उत्तर व चर्चेची संधी मिळावी ही आग्रहाची विनंती.

कळावे.
आपला नम्र,
शरद पवार.

**(सकाळ : पुणे रविवार, २ जुलै २००६ मधून साभार.)**








# हिंदुत्ववादी आणि सामाजिक समरसता

## देवदत्त दाभोलकर

श्रीगुरुजी जन्मशताब्दी समारोह समिति पश्चिम महाराष्ट्र समितीचे अध्यक्ष डॉ० आनंद यादव यांचे दि० २० जुलै २००६ चे 'परिसंवादा'साठी आमंत्रणपत्र आले. त्यांच्या आमंत्रणपत्रातील प्रमुख भाग असा होता :

"शिक्षण, समाजकारण, विज्ञान, तत्त्वज्ञान अशा विविध क्षेत्रांमध्ये विचारांचे आदान-प्रदान चालू असते. आपला सहभाग अशा उपक्रमामध्ये नेहमीच महत्त्वाचा मानला जातो. आपणास विनंती आहे की खालीलपैकी कोणत्याही एका विषयावर आपण निबंध लिहावा व तो परिसंवादात सादर करावा.

१. हिंदुत्व विचार - आजच्या संदर्भात

२. हिंदुत्व विचार आणि सामाजिक समरसता

आपला निबंध ६०० ते ७०० शब्दमर्यादेत असावा.

निबंध मराठी, हिंदी अथवा इंग्रजीत असावा.

निबंध जास्तीत जास्त २५ ऑगस्ट २००६ पर्यंत समितीच्या पुणे पत्त्यावर पोहोचावा.

समितीच्या वतीने सर्व निबंध पुस्तकरूपाने प्रसिद्ध केले जातील.

आपले बहुमूल्य सहकार्य या कार्यक्रमास लाभेल असा विश्वास वाटतो."



**माझे टिपण खालीलप्रमाणे होते :**

"तो माझ्या आयुष्यातील अतिशय आनंददायी आणि दुर्मिळ असा योग होता. श्रीगुरुजी आणि मी एकाच व्यसपीठावर होतो. मी श्रीगुरुजींच्या शेजारी त्यांच्या डाव्या बाजूला बसलो होतो. गांधीजींच्या जन्मशताब्दीचा दिवस होता. २ ऑक्टोबर १९६९. सांगलीला प्रचंड जनसमुदयासमोर ही सभा होती. श्रीगुरुजींचे भाषण प्रथम झाले. त्यांच्या पाठोपाठ माझे झाले. आम्हा दोघांच्याही भाषणाचे वृत्त सर्व दैनिकात होते. माझ्या भाषणावर काही चर्चाही झाला.

त्या स्वरूपाची चर्चा आजवरही चालत आलेली आहे. २००३ साली सातारा येथे 'समरसता' मंच चे वार्षिक अधिवेशन झाले. संयोजकांनी स्नेहपूर्वक आग्रहाने मला बोलावले. त्या भाषणावरही पुढे उलटसुलट प्रतिक्रिया आल्या. आजच्या या परिसंवादातील विषयाबद्दल मला नेहमीच अगत्य वाटत आलेले आहे. भारतापुढील हा एक आत्यंतिक महत्त्वाचा प्रश्न आहे असे मी मानतो. त्यामुळे या परिसंवादात भाग घेण्याचे आमंत्रण आले याचा मला आनंद झाला आणि आपण घालून दिलेल्या सहाशे ते सातशे शब्दांच्या मर्यादेत मी आपले टिपण पाठवीन व हवामानाने आणि प्रकृतीमानाने साथ दिली तर उपस्थितही राहीन असे मी संयोजकांना लगोलग कळवूनही टाकले.

मला प्रथम हे स्पष्ट केले पाहिजे, माझ्या भूमिकेवर विवेकानंद, गांधीजी, विनोबा यांच्या मांडणीचा प्रामुख्याने प्रभाव आहे. त्याचा तपशील यथाकाल देता येईल, त्यावर चर्चाही करता येईल. या ठिकाणी ती भूमिका संक्षेपाने मांडणे एवढेच शक्य आहे. ती भूमिका अशी आहे.

१. भारत आज अशा परिस्थितीत आहे की केवळ हिंसेवरच विश्वास ठेवणारे अतिकडवे डावे आणि अतिकडवे उजवे सोडले तर इतर सर्वांनी निदान एक दशक तरी एकजुटीने काम करणे आवश्यक आहे. असे झाले तरच हा देश आजच्या जागतिक संदर्भात तग धरू शकेल व स्वातंत्र्य समता व समृद्धी यासह एक समर्थ अग्रेसर राष्ट्र म्हणून उभा राहू शकेल.

२. भारतातील विविध धर्मीयांतील परस्पर संशयाचे व द्वेषाचे वातावरण नष्ट करणे ही या प्रक्रियेची पूर्वअट आहे.

३. ही अट मान्य झाली तरी प्रत्यक्ष कार्यक्रमात काही तपशीलाचे मतमेद येणे अटळ आहे. त्या त्या वेळी समंजसपणे सहसंमतीने काही व्यावहारिक उत्तरे शोधावी

लागतील. यात नेत्यांच्या खऱ्या नेतृत्वगुणाची कसोटी आहे. या गुणाचा प्रकर्ष इस्रायलच्या शेरॉन यांनी मागील सर्व पाश तोडून ज्यावेळी नवी भूमिका घेतली त्यावेळी जगाला अगदी अलीकडे अनुभवावयास मिळाला.

४. माझी व्यक्तिगत धारणा वेगळी व अनेकांना स्वाभाविकपणे विचित्र अशी वाटणारी असल्यामुळे मला कदाचित हे सोपे जात असावे. ती धारणा अशी :

'मी हिंदू आहे याचा मला अभिमान आहे. परंतु मी मुसलमान नाही, ख्रिश्चन नाही, यहुदी, पारसी, बौद्ध, जैन नाही याचे मला दुःख आहे. त्याचबरोबर हिंदू धर्मात अशा अनेक गोष्टी आहेत की ज्यासाठी त्या धर्मातील सुजाण धार्मिक व्यक्तींना खंत वाटावी व वाटते. हिंदू धर्माविषयीच्या जन्मजात जिव्हाळ्याच्या आपुलकीमुळे मी त्यातील उणिवांविषयी हे विधान करू शकतो. अन्य धर्मातील अशा व्यक्तींच्या बाबत माझ्या मनात सहानुभूतीची आणि सहकार्याची भावना असावयास हवी.

खरे तर प्रश्नाची ही दोन्ही अंगे अतिशय सिद्ध आहेत. ज्यांच्या पायाशी आपण नम्रपणे बसावे अशा अध्यात्मिक उंचीची आपापल्या धर्मावर गाढ श्रद्धा ठेवणारी माणसे मला सर्व धर्मांच्या इतिहासात दिसतात. त्याचप्रमाणे सर्व धर्मातील विकृतींचे दुष्परिणाम जगाच्या इतिहासात पानोपानी आहेत.

हा प्रयत्न सर्व धर्मीयांनी करावयास हवा. बहुसंख्यांक म्हणून भारतातील हिंदूंनी याचे समंजस नेतृत्व करावयास हवे.'

श्रीगुरुजींच्या जन्मशताब्दीच्या वर्षात अशा प्रकारच्या चिंतन-प्रक्रियेत सहभागी व्हावयास मला आनंदच होईल. आयोजकांनी आपण सहभागी होऊ असे आश्वासन दिल्यास महाराष्ट्रापुरतेच बोलावयाचे तर शाहूमहाराज, ज्योतिबा फुले, डॉ. आंबेडकर यांच्या विचारसरणीचे सर्वमान्य प्रवक्ते या संवादासाठी (परिसंवादासाठी नव्हे) आणण्याचा आवश्यक तो प्रयत्नही करण्यात मला रस आहे.

वेगळ्या क्षेत्रात अखिल भारतीय स्तरावर असा प्रयत्न गतशतकाच्या अखेरच्या दशकात केला होता. त्याचा अहवालही 'The Sardar Sarovar Debate : The Debate that wasn't' या शीर्षकाखाली मी प्रसिद्ध केला आहे. त्या अनुभवातून योग्य ते धडे घेऊन अशा कृति-चर्चासत्राचे आयोजन करण्यात मला रस आहे.

वेळ असल्यास या परिसंवादातही अनेक पूरक तपशील मांडता येतील."



०५-०९-२००६

येणे अनिश्चित.

मागील मजकूर कृपया वाचून दाखवावा व सहभागींना प्रसृत करावा.

आपल्याकडून सर्वांची टिपणे येतीलच.

विषय महत्त्वाचा आहे.

प्रकृतिच्या कारणामुळे उपस्थित राहू शकत नाही याबद्दल दिलगीर आहे.

परंतु माझ्या टिपणाच्या आधारे कोणा सहभागींना माझ्याशी तपशीलाने चर्चा करावयाची असेल तर तशी व्यवस्था करता येईल. सहभागींना मान्य असेल तर प्रसिद्ध करण्याचीही व्यवस्था करता येईल. संपर्कासाठी माझा फोन क्र. - (०२१६२) २२०३७८. मुदत डिसेंबर अखेर.

**- देवदत्त दाभोलकर**



या चर्चासत्रात सहभागी झालेल्यांशी अधिक चर्चा पुढील दोनतीन महिन्यांत करता येईल. तिचे इतिवृत्त 'नवभारत'च्या जानेवारीच्या अंकात दिले जाईल.

या चर्चासत्राशी संबंधित नसणाऱ्या परंतु या समस्येत रस असणाऱ्या अन्य सर्वांच्याही वैचारिक योगदानाचे स्वागत आहे.

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

## आनंद जीवनाचा

| | |
|---|---|
| आनंद जीवनाचा | पूजेत सर्व शक्ती |
| हा एक सत्य साच | सामर्थ्य आटवावे |
| साफल्य जीवनाचे | काही न ते उरावे |
| आहे अखेर हेच | विखरुनि सर्व द्यावे |
| | |
| माझ्या सुखाकडे का | घेता धुळीत अंती |
| कोणी कसे न पाही | विश्राम श्रांत जीवा |
| कण्हणे असे सदा हे | हासोत वा कुणीही |
| शोभा कुणा न देई | कोणी करोत हेवा |
| | |
| होते उदात्त ध्येय | आनंद जीवनाचा |
| ज़े पूजिले मनाने | हा एक सत्य साच |
| पूजा पुरी करावी | साफल्य जीवनाचे |
| केव्हा तरी कृतीने | आहे अखेर हेच |

- देवदत्त दाभोलकर
१९८०

स्फुरण :

This is the true joy of life - the being used for a purpose recognised by yourself as a mighty one; the being thoroughly worn out before you are thrown on the scrap heap; the being a force of Nature instead of being a feverish, selfish, little clod of ailments and grievances complaining that the world will not devote itself to making you happy.

- **George Bernard Shaw**

## लेखक परिचय :

या अंकातील लेखक 'नवभारत' च्या वाचकांना सुपरिचित आहेत.

नवस्वागत :

**सुलभा नाडकर्णी :**
चौफेर वाचन, Asiatic Bonsai Society च्या काही काळ उपाध्यक्षा.

**श्री० वि० सहस्रबुद्धे :**
सजग चौकस संग्राहक.

**डॉ० नीलकंठ बापट :**
निवृत्त प्राध्यापक, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद.

सर्व लेखक संपर्क :
द्वारा प्रा० देवदत्त दाभोलकर

## युनोचे (U.N.O.) आदिबीज (१८८६)

१८८६ मध्ये प्राच्य भाषा विशारदांची परिषद व्हिएन्ना येथे भरली होती. डॉ० रा० गो० भांडारकर आर्य शाखेचे प्रमुख होते. आपल्या भाषणाच्या अखेरीस त्यांनी विश्वशांतीसाठी प्रार्थना केली. ती अशी :

राष्ट्राणां स्नेहभावाय
विग्रहस्य शमाय च।
कल्प्यतामीदृशी संसद्
मनुजानां च भूतये।।

युनोचे आदिबीज म्हणून मान्यता मिळावी असे हे क्रान्तदर्शित्व आहे.

संग्राहक : श्रीधर विश्वनाथ सहस्रबुद्धे, पुणे

अनुक्रमणिका

“ कविता म्हणजे आकाशाची वीज आहे.
ती धरू पाहणारे शेकडा ९९
आपणास होरपळून मात्र घेतात.
मी अशा ९९ वां पैकीच आहे.

“ तुम्हांस जगाच्या अंधारात
आपल्या बुद्धीचा किरण पाडणे आहे काय ?
असेल तर तुमचे हृदय उललेले आहे काय ?
फाटले आहे काय ? म्हणून मी विचारतो.
कारण हृदयाच्या गाभाऱ्यात तेवत असणाऱ्या
नंदादीपाचा प्रकाश जेव्हा
फाटलेल्या हृदयाच्या फटीतून
अंतर्मुख झालेला दृष्टीस पडतो
आणि तो प्रकाश जेव्हा
बुद्धी परावृत्त करून जगावर पाडते तेव्हा
अंधारात चाचपडणारास वाट दिसू लागते.

कृ० के० दामले.
९ . २ . १९०५

सौजन्य :
कविता : कोकण मराठी साहित्य परिषद
छायाचित्र : श्री० दिलीप भोजने, सातारा

अनुक्रमणिका